# INTRODUCTION

When the late *Vidwad Ratna* Ramchandra Govind Kolangade approached me some time ago and informed me that he was contemplating to prepare in Marathi a book on the life and teachings of ZOROASTER, the great Prophet of Iran and Founder of the Zoroastrian Religion, I welcomed the idea and promised him all the help I could give in the great undertaking

Shri Kolangade was a man of great vision, and had planned to place before the Marathi speaking public a series of works on the life and teachings of great Founders of Religion and religious teachers in what he called the *Yogishwar Prakashan* the series included two works on Rigveda, two works on the life and teachings of Yajnavalkya, two works on Bhagwan Gautama Buddha and His Teachings a work on Yajurveda and lastly this work on Zoroaster He had also planned to edit two more books on Jesus Christ and on Prophet Hazrat Mahommad But it was perhaps destined that the work on Zoroaster be published as his posthumous work and the two other works will await the zeal of another enthusiastic student of religion for being available to Marathi readers

When the author s work on Zoroaster was presented to me I was much surprised at the deep study undertaken by the late author in collecting materials for the work and also at the clear and lucid way in which the matter was presented to the reader He must have very laboriously studied various books

on the life and teachings of Zoroaster, to enable him to produce the work in the present form It was fully realised that the work was undertaken by him in a proper spirit of impartially placing before his readers the salient points in the life and teachings of the Prophet of Ancient Iran

Zoroaster lived and preached the doctrines of his new revelation in such pre historic times that it is not possible to fix the era of his activities or give proper details of his life Shri Kolangade has made a fairly good attempt to produce a succinct picture of his life from various Pahlavi texts cited by him He has also drawn some materials from modern Persian and other sources to complete the picture Some of the incidents as narrated are highly controversial but one cannot reject them entirely This first Part (Pages 1 to 191) is devoted to this important part of the work

Shri Kolangade in pp 192 to 232 deals with what he calls Uttarardha' and in brief deals with the history of Iran after the passing away of the Prophet Here too reliance is placed on English works and on traditional data This part of the work ends with the coming of the Parsis in India and their obtaining shelter from the Rana of Sanjan, on their undertaking to treat India as their motherland, a pledge they have faithfully carried out for over one thousand years of their stay in this country

The last part of this interesting work is devoted to giving the reader an account of the precepts and

doctrines of the religion of Zoroaster It begins with the concept of Ahura Mazda as found in the religion The table given on pp 245–247 showing how the ideas in the Avesta are almost similar to those found in the Rigveda is of great importance and shows the author's intimate knowledge of both the sacred books It will be left to the reader to go through the rest of the pages of this interesting part of the work at the same time appreciating the pains taken by the author in preparing such an informative work The last few pages give us the religious customs of the Parsis and also their calender

If some of the proper names and technical terms are not in proper form as they are used ni Marathi by the author, and some other defects of the text which appear in the work are all overlooked as unavoidable, the work that is presented to the reader is on the whole a fairly good attempt at presenting in Marathi the life of the Prophet ( Maharshi as the author calls him ) Zoroaster

As already noted the Parsis when they came as imigrants to India landed at Sanjan, a city port of Gujarat at the time But within a few centuries thereafther they spread out to different places in Maharashtra There is a tradition that there was a *Parsi settlement* at Thana *early in the 15th Century* A. D. Due to the harsh treatment meted out to them by the Portuguese they had to leave the town and settle in Kalyan It was in 1640 that a Parsi, Dorabji Nanabhai first came to Bomay and settled there, to be followed by other Parsi families at

different times thereafter. In 1668 Dorabji Nanabhai. was given the work of collecting body/tax from the inhabitants of the island of Bombay by the English Government. Labour was supplied by a Parsi contractor in 1665 for erecting the Fort of Bombay. In subsequent years Parsis spread themselves in other towns and important places in Maharashtra like Poona, Sholapur, Aurangabad, Nagpur and others. Parsis were honoured at the Court of the Peshwas of those times. Parsis are known for their charity. During the last few centuries they donated large sums of money for founding hospitals, schools, colleges, dharmashalas, orphanages, etc. through-out Maharashtra. They were pioneers of industry in Bombay, a city which owes much of its greatness to them.

It is acknowledged that it is their religion which makes the Parsis charitable and industrious Shri Kolangde has rendered a great service to the People of Maharashtra by giving a biography of Prophet Zoroaster in Marathi and at the same time describing the important tenets of the Zoroastrian religion which go to explain the principal traits of the Parsis. They believe in leading an active life of service to humanity and there is no place for asceticism or running away from the temptations of this earthly life. Ahura Mazda created this earth and all good things in life for the benefit of man to be enjoyed by him as best he can. At the same time man has to fight evil in all its forms and keep himself pure in thought, word and deed.

Shri Kolangde did a great service to the Marath speaking Public by bringing out his various works on

great religious teachers The usefulness of these works is more enhanced in these days when our Government calls itself secular and schools are prevented from giving any kind of religious education. It is a great loss to Maharashtra that Shri Kolangde could not complete the series of works as planned by him it is to be hoped that some other enthusiastic soul will think it proper to carry on and complete the series with equal zeal for the study of world religions

Bombay,
23rd July, 1962

J. C. Tarapore,
M. A , LL B.

# प्रकाशकाचे दोन शब्द

धर्मा धर्मांची ओळख त्या त्या धर्मांच्या अनुयायाना झाली तरच अमरशांति सुख नि समाधान निर्माण होईल असा आमचा विश्वास आहे. आध्यात्मिक शिकवणुकीमुळेच विश्वशान्ती निर्माण होते तत्त्वज्ञानाच्या शिकवणुकीने व आचरणाने मानवधर्माची निर्मिती होऊन अखिल जगतात मंगल शांतीचे नंदनवन दिसून येईल यात शंका नाहीं. राष्ट्राराष्ट्रामध्ये चाललेले झगडे, द्वेष, असहतता, यादवी, सत्तास्पर्धा व सर्व नाशक साहित्य प्रदर्शन यांचे मूळ कारण अज्ञान, अहंकार नि क्षणिक सुखाची आसुरी हाव हीच आहे. आजच्या शिक्षणाने नैतिक क्रांती समाजात होणें शक्य नाहीं. नैतिक पातळीवरूनच राष्ट्राची श्रेष्ठता ओळखली जाते. ही समस्या नजरेसमोर ठेवून आम्ही गेली २७, २८ वर्षें निरलसपणे संशोधनपूर्वक समतोल दृष्टीने भारतीय नवे विश्वधर्म संस्कृतीचे ग्रंथ लेखन, प्रकाशन व प्रचाराचे कार्य करीत आहो. आम्ही आतापर्यंत नऊ ग्रंथ प्रसिद्ध केलें असून ते प्रिय महाराष्ट्रास सादर केले आहेत. आम्हीं हातीं घेतलेल्या कार्याची उपयुक्तता व आवश्यकतेची जाणीव होऊन अखिल महाराष्ट्रातून आम्हास मदत नि प्रोत्साहन मिळाले आहे. दिवसे दिवस कार्याचा प्रसार वाढत असता दुर्दैवाने आमचे परमपूज्य पिताजी, योगीश्वर प्रकाशनचे संस्थापक नि आधारस्तंभ, विद्वद्रत्न श्री. रामराव कोलगडे याचेवर निर्घृण काळाने झडप घालून ते देवाधीन झाले.यामुळे आम्हास जबरदस्त धक्का बसला असून कार्याची कल्पनातीत हानी झाली असून ती भरून निघणे शक्य नाहीं. त्यानी हाती घेतलेले कार्य शेवटास नेणे यातच त्यांच्या पवित्र आत्म्यास शांती मिळेल, हे जाणून त्याचे अर्धवट कार्य शेवटास नेण्याचा संकल्प आम्ही केला आहे.

तुलनात्मक दृष्टीने धर्मांधर्मांची ओळख व्हावी या दृष्टीने आम्ही आतापर्यंत वैदिक तत्त्वज्ञान, बुद्धतत्त्वज्ञान विषयक ग्रंथ प्रसिद्ध केले असून आज झोरोष्टर धर्माची ओळख करून देणारा मराठी भाषेतील पहिलाच

अमूल्य ग्रंथ आमच्या प्रेमळ महाराष्ट्रास सादर करीत असताना आम्हास अत्यानंद होतो आहे.

आतापर्यंत ज्या भावनेने व प्रेमाने, आमच्या कार्यास जनतेने मदत केली तीच भावना व प्रेम आमच्या पुढील कार्याविषयीं राहावी हीच विनंती आमच्या विचारवत व प्रिय महाराष्ट्रास करतो व पूर्वीप्रमाणेच आम्हास प्रोत्साहन मिळेल अशी आशा उराशी बाळगून पुढील कार्यास लागतो.

आता आभार मानावयाचे काम तेवढे राहिले. पहिल्याप्रथम भारत सरकारच्या शिक्षण खात्याच्या शास्त्रीय संशोधन व सांस्कृतिक विभागाचे आभार मानणे आमचे पवित्र कर्तव्य आहे. हा ग्रंथ छापावयास घेतो न घेतो तोच पार्शी पंचायत विश्वास्तानी आम्हास भरीव अशी मदत करून प्रोत्साहन दिल्याबद्दल त्याचे आभार मानणे जरूर आहे. या पवित्र कार्या-करिता गेली बारा वर्षे मुंबई सारख्या ठिकाणी विनामौल्य राहणेस जागा देऊन सर्वतोपरी मदत केल्याबद्दल श्रीमंत रा. रा. गणेश गोविंद उर्फ अण्णासाहेब नवरे शीव याचे आम्ही सदैव ऋणी आहोत या ग्रथाच्या लेखनकार्यास मुंबईच्या पार्शी समाजातील नामवंत व थोर साहित्यिक श्री. जे. सी. तारापोर एम्. ए. एलएल. बी ॲडव्होकेट यानी वेळोवेळी बहुमोल सल्ला देऊन व आपला अमूल्य वेळ खर्च करून या ग्रथास प्रस्तावना लिहून दिली त्याबद्दल त्याचे मानावे तितके आभार कमीच आहेत. तसेच बेळगावच्या " तरुणभारत " अर्ध साप्ताहिकाचे संपादक श्री. बाबूराव ठाकूर यानी आपुलकीने प्रूफ करेक्शन्स करून व सुंदर रीतीने छापून दिलेबद्दल आम्ही त्याचे सदैव ऋणी आहोत. या प्रकाशन कार्यास ज्यानी ज्यानी आम्हास मदत केली, त्या सर्वांचे व कळकळीने, स्वतः त्रास सहन करून बहुमोल मदत केली त्या डॉ. वसंतकुमार रामकृष्ण पंडित याचे आभार मानून लेखणीला विश्रांति देतो.

मा रा कोलंगडे

# विषयानुक्रमणिका

उत्तरार्ध –

महर्षि

# झो रो ष्ट र

## पूर्व-पीठिका

### अइर्यन वएज

आह्मा हिंदूंचा सृष्टि उत्पन्नकर्ता जसा ब्रह्मदेव तसाच इराणी (झोरोष्टर) लोकांचा अहुरमज्द हा होय त्यानें आपल्या आवडत्या लोकां करता ह्मणजे आर्यलोकांकरता राहण्यासाठी ह्मणून प्रथम या पृथ्वीवर जो सुंदर व सुपीक असा भूप्रदेश मानववस्तीला राहण्यास योग्य व सुखकर असा निर्माण केला, त्याला झोरोष्टरधर्मात अइर्यन वएज असें ह्मणतात 'अइर्यन वएज' ह्मणजे आर्यांचा देश येथील हवा समशीतोष्ण, निरोगी व हित कारक अशी असून, येथें दीर्घकाल वसंतऋतु बहरून असतो हिंवाळा अगदी अल्प व जमीन सुपीक अइर्यन वएज हा देश सर्वांत प्राचीन प्रमुख व पवित्र देश असून तो अहुरमज्दनं आर्यांस रहावयास दिला

(वादिदाद १-३)

या अइर्यन वअेज मध्येंच मानववंशाचा मूळ पुरुष जो गयोमर्द त्याचा जन्म झाला, आणि यांच्यापासूनच मानववंशाची उत्पत्ति होऊन पुढें त्याची वाढ झाली मनुष्यांचा पहिला राजा हा गयोमर्दच असून, अहुरमज्दचा पहिला शिष्यहि तोच होय अर्थात् मज्दधर्माची दीक्षा मिळाली ती प्रथम यालाच या गयोमर्दा नंतर मशी व मशीयानी हें पहिलें मानव स्त्रीपुरुष जोडपें निर्माण झालें व त्यांच्यापासून हा मानववंश पुढें वाढीस लागला हें जोडपेंहि अइर्यन वएज मध्येंच जन्मास आलें

ई मानव दाम्पत्य निर्माण झाल्यावर **अहुरमझ्द** त्याना उद्देशून म्हणाला– ' तुम्ही मानवाचे आद्य पितर आहा. मी तुम्हांस उच्च व उत्कृष्ट अशी बुद्धि दिली आहे. तिचा योग्य उपयोग करून, प्रत्येक गोष्टीचा सारासार विचार करून त्याप्रमाणें वर्तन करीत जा. म्हणजे तुमचें कल्याण होईल. तुमचे विचार सदैव चांगले असोत ! वाणी सत्य असो ! व वर्तन सरळ असो ! असा हा त्या **अहुरमझ्दचा** त्याना उपदेश होता.

( दिनकर्द )

हा '**अइर्यन वएज**' जो प्रदेश आहे, तो पृथ्वीच्या मध्यभागीं असून, त्याच्या मधोमध ' अलबुर्झ ' नावाचा पर्वत असून त्याच्या, शिखरावरच **अहुरमझ्दचें** निवासस्थान आहे. या **अइर्यन वएजचा** अत्यंत प्राचीनातला प्राचीन राजा म्हणजे **यिम** हा असून, अवेस्तामध्यें हा अत्यंत मोठा व पुण्यवान राजा म्हणून मानण्यात आला आहे. शिवाय तो महान धर्मगुरुहि होता त्याच्या कारकीर्दींत लोकाची मोठी भरभराट होऊन, ते मोठे सुखी व संपन्न झाले होते अत्यंत आनंदानें व सुखानें त्यानी कालक्रमणा केली. अर्थात् त्या कालाला सुवर्णयुगाची उपमा देण्यात आली असून त्यावेळीं तो त्यांचा स्वर्गच होता ! **झोरोष्टरच्या** पूर्वी **अहुरमझ्दनें** या **यिमाय** आपल्या धर्माचा प्रथम उपदेश दिला. ( वदिदाद २-२ )

याप्रमाणें लोक मोठ्या सुखानंदात व खुशालीखुशालीत नांदत असता **मधेंच अहुरमझ्दने यिमास** बोलावून घेऊन त्यास असें सांगितलें कीं आता लवकरच आमचा शत्रु जो **अंग्रमइन्यू** तो **अइर्यन वएजवर** स्वारी करणार असून, त्यावेळीं तो प्रचंड हिमवृष्टि करून सगळा प्रदेश हिममय करून टाकील आणि असें झालें म्हणजे सर्वत्र गारेगार असा हिवाळा पसरून त्यात सर्व प्राणिजात थंडीनें कुडकुडून व गारठून अखेर नामशेष होऊन जाईल ! इतकेंच काय, झाडझुडपें सुद्धा झडून व मरून जातील ! नावाला

म्हणून एकहि प्राणि जिवंत असा सापडावयाचा नाहीं. तो एक मोठा प्रळयकाळच होईल! तर वेळींच सावध होऊन काहीं वेंचक माणसें बरोबर घेऊन लवकरच स्थान–त्याग करण्याविषयी त्यास सूचना दिली.

त्याप्रमाणे **यिमराजानें** केलें. काही चागली चागली अशी वेंचक कुटुंबें, काहीं उपयुक्त पशु व पक्षी आणि तशींच उत्तमोत्तम फळझाडाची व फुलझाडाची ही बियाणें बरोबर घेऊन तो तेथून दक्षिणेकडे निघाला.

( वंदिदाद २,२२–३६ )

पुढें तेथून स्थलांतर केल्यावर एक चागली सुरक्षित जागा पाहून तेथें बरोबरच्या लोकांसह त्यानें तळ दिला व तेथें हिमाची बाधा व उपद्रव होऊनये म्हणून आपण राहिलेल्या प्रदेशासभोंवती मातीचे मजबूत असे भक्कम कुपण घातलें. अर्थात् तो **अइर्यन वएज** मधून बाहेर पडतो न पडतो तो इतक्यात **अहुरमझ्दननें** भाकित केल्याप्रमाणें **अंग्रमइन्यूनें** त्या प्रदेशावर स्वारी केलीच! त्या **अइर्यन वएजवर** जोराची हिमवृष्टि करून सगळा प्रदेश हिममय करून टाकला! जिकडे तिकडे बर्फच बर्फ! त्यात जे काय सापडलें त्या सर्वांचा नाश होऊन गेला! एकहि प्राणि जिवत असा राहिला नाहीं! विविध प्राणिसृष्टीनें गजबजलेला व सुंदर फुलपुष्पादि वृक्षवेलींनीं नटलेला तो सुदर व सुपीक प्रदेश अइर्यन वएज अल्पकाळातच निर्जीव व निर्बीज होऊन, स्मशानवत् भयाण बनला!! ( वंदिदाद २ )

हा जो हिमवृष्टीचा मजकूर वरीलप्रमाणे झोरोष्टर धर्मग्रंथात आढळतो तशाच अर्थाचा मजकूर योगीश्वर याज्ञवल्क्याच्या शतपथातहि पण किंचित् निराळ्या पर्यायानें पहावयास सापडतो. इराणी ग्रंथात हिमवृष्टीचा उल्लेख असून त्याऐवजीं शतपथात जलप्रळयाचा निर्देश आहे. त्याचप्रमाणें अहुरमझ्द हा यिमराजाला तो इशारा देतो तर शतपथात एका माशानें

तश इथारा विवस्वान मनूला दिलेला आहे. बाकी दोन्ही कथेतला मजकूर जवळ जवळ सारखाच आहे. ( शतपथ १-८-१-१ ) असो

या हिमाबरोबर जे लोक देशांतर करून दक्षिणेकडे उतरले होते ते रंगाने गोरे असून तेजस्वी व बळकट बांध्याचे निरोगी व सदृढ लोक होते हे आज जगात इकडे तिकडे पसरून राहिलेल्या आर्यवंशजाचें प्राचीन पूर्वज होत हे सर्व लोक आइर्यन घएज मधून बाहेर पडल्यावर पुढें काही काल्पर्यंत एकत्र राहून सुखानदात कालक्रमणा करीत आले असें होता होता त्याची वाढ व विकास होत जाऊन पुढें त्याची सख्या इतकी वाढली कीं पुढें तो देश त्याना अपुरा वाटू लागला तद्वातच त्याच्या त्याच्यात हळुहळु मतभेद व आचारभेद उत्पन्न होऊन समाजात फूट व चुरस व सघर्ष वाढत चालला

अर्थात् त्यातील एका पक्षानें भावी अनर्थ टाळण्यासाठी धाडस करून तेथून आपलें बिऱ्हाड हलवून, इतरत्र आपली आपली सोय पाहण्यासाठीं बाहेर पडण्याचें ठरवून त्याप्रमाणें तेथून निर्गमन केलें ही घटना दुसऱ्या हिमकालाच्या प्रारभी घडून आली या लोकांनी आपल्या मायसमाजातून फुटून दक्षिणेकडे व पश्चिमेकडे प्रयाण करून कॅस्पियन समुद्राच्या काठाकाठानें पुढे सरकत सरकत कॉकेसस पर्वताची राग ओलाडून पलीकडचा प्रात गाठला व तेथून टोळीटोळीनें चोहोकडे पसरून आपापल्या सुखसोयीप्रमाणें जुळेल तेथें वसहत करून राहिले हे लोक आज ' इंडोयुरोपियन् ' यानावानें ओळखले जातात व पुढें त्यांच्या वशजातहि कालातरानें देशभेद, भाषाभेद, सस्कृतिभेद व व्यवहारभेद उत्पन्न होऊन, त्याचे सेल्टिक, ग्रीक, लॅटिन, ट्यूटोनिक असे पुन निरनिराळे पोटभेद झाले

याचप्रमाणें दुसरा एक लोकप्रवाह दक्षिणेकडे निघून 'अलबुर्झ' पर्वताच्या रोखानें सरकत सरकत क्यास्पियन समुद्राच्या उत्तर कोपऱ्यास वळसा घालून पूर्वेकडून खाली वळला व हल्ली ज्याला अफगाणिस्तान म्हणतात तेथें येऊन त्यानें त्या प्रदेशात आपलें बिऱ्हाड कायम केलें हे लोकहि या प्रदेशात काहीं कालपर्यंत एकत्रच राहिले त्यावेळीं त्याची भाषा एक, धर्म एक, देव एक, आचार एक, विचार एक अशी सामाजिक स्थिति होती हा समाज 'इंडोपर्शियन्' म्हणजे 'पर्शुभारतीय' या नावानें आज इतिहासात ओळखला जातो

याप्रमाणें हा समाज काहीं काळ एकत्र राहिल्यावर पुढें पुढें त्याच्यातहि मतभेद पडून व वाढून त्यातला एक भाग हिंदुकुश ओलांडून पंजाबात शिरून तेथें स्थायिक झाला हेच पुढें वैदिक आर्य या नावानें प्रसिद्धि पावले व तसाच दुसरा एक समाज पश्चिमेकडे वळून इराणात जाऊन तेथें तो स्थिरस्थावर होऊन राहिला तो आज पारशी या नावानें ओळखला जातो असा हा प्राचीन आर्यांचा थोडक्यात पूर्वेतिहास आहे

हा अइर्यन वएज अहुरमझ्दनें आपल्या आवडत्या भक्तास दिला, असा जसा झेंदावेस्तामध्यें उल्लेख आहे तद्वतच वैदिक आर्यांच्या ऋग्वेदातहि इंद्रानें आर्यास भूमि दिली- 'अहं ( इंद्र ) भूमिमददामार्याय' ( ऋ ४-२६-२ ) असा उल्लेख आहे यावरून अवेस्तातला अहुरमझ्द म्हणजे ऋग्वेदातला इंद्रच असे अनुमान केल्यास तें काहीं वावगें होणार नाहीं याविषयी पुढें सविस्तर वर्णन येईलच असो

———

# विचित्र योगायोग !

इराणांत मिडिया प्रांतांत पण जरा दक्षिणेकडे 'रये' नांवाचें एक सुप्रसिद्ध शहर होतें. तें शहर **पेशदादिअन** घराण्यातील होशंग नांवाच्या प्रख्यात राजानें वसविलेलें असून, त्याकाळीं तें फार भरभराटींत व वैभवांत नांदत होतें. तेहरानच्या आग्नेय दिशेस हल्लीं जो ओसाड भाग आहे, तेथें तें असावें असा आधुनिक पाश्चात्य पंडितांचा तर्क आहे. असो. त्या 'रये' शहरांत **फ्राहिमरवा** नांवाचा कोणी एक सुखवस्तु गृहस्थ होता. त्याला **दोग्दो** नावांची एक सुंदर मुलगी होती. अत्यंत सुरूप व सुलक्षणी ! जणु कांहीं शुक्राची चमक चांदणीच ! तिच्या विषयीं एक विलक्षण आख्यायिका लोकांत प्रसृत झाली होती ती अशीः–

**अहुरमझ्देनें झोरोष्टर** जन्मावयाच्या पूर्वींच प्राथमिक तयारी चालविली होती. त्यानें स्वर्गांतला एक दिव्य किरण खालीं पृथ्वीवर पाठविला. तो ही **दोग्दो** जन्मावयाच्या पूर्वीं तिच्या घरीं शिरून पुढें ती जन्मली तेव्हां तिच्या शरीरांत प्रविष्ट होऊन बसला ! पुढें ती जसजशीं वाढत गेली, तसतशी तिची कांति उजळत चालली. ती इतकी कीं ती मुलगी जेव्हां पंधरा वर्षांची झाली तेव्हां तिच्या चेहऱ्यासभोंवती दिव्य तेजोवलय चमकूं लागलें व त्याचा प्रकाश चालतांना जमिनीवर पडूं लागला !

ही **दोग्दो** म्हणजे गौरी सारखी मोठी सुंदर मुलगी ! सुंदर म्हणजे काय ? सुंदरातली सुंदर ! जणुं कांहीं नुकतेंच उमललेलें मनोहर कमल ! तशांत नवतारुण्याचा मधुर मंगलोदय ! आणखी तशांतच मुखावर चमकणारी ती मनोहर दिव्य कांति ! मग आतां आणखी काय पाहिजे ? त्या सौंदर्याला उपमा काय द्यावयाची नि कसली द्यावयाची ! खरोखर उपमातीतच होतें तें सौंदर्य ! म्हणजे दोग्दो ! ! हेंच तिचें वर्णन ! ! !

तो अधश्रद्धेचा चालता काळ! तिचें तें अलौकिक सौंदर्य व दिव्य शरीर--कांति पाहून लोक कुजबुजूं लागले कीं तिला कसल्यातरी दुष्ट ग्रहानें पछाडलें असावें! किंवा कोणीतरी मांत्रिकानें जादू टोणा केला असावा! किंवा कसल्यातरी सैतानाची बाधा झाली असावी! एकूण काय पोरीचें लक्षण कांहीं ठीक नाहीं! पुढें तिच्या भोळ्या बापालासुद्धां त्या संशयपिशाच्चानें घेरलें व तो मनातून अस्वस्थ व साशंक होत चालला. पुढें पुढें तर त्याला राहावेचना म्हणून त्यानें त्या शास्त्रातील कुशल पंडिता-जवळ जाऊन, त्याबाबत त्याचा सल्ला विचारला.

ते पंडित त्याच्या घरी येऊन त्यानीं त्या मुलीला समक्ष पाहिली आणि आत सर्वजण एकत्र बसून दीर्घ विचार-विनिमय करून तिच्या बापास बोलावून त्यास सांगितलें कीं " ही जी मुलगी आहे ती सुंदर असली तरी अशुभलक्षणी आहे! तिच्यापासून तुला व तुझ्या घराण्याला मोठा धोका आहे! इतकेंच नव्हे, तर देशावरसुद्धा मागेंपुढें मोठा अनर्थ गुदरण्याची भीति आहे! आमच्या मतें तिला जिवंत ठेवून उपयोग नाहीं! ती आपत्ति टाळावयाची झाल्यास तिला रानात नेऊन जिवे मारून टाकणें याशिवाय दुसरा मार्ग नाहीं!! हा एवढाच मार्ग मोकळा आहे! मग तुझ्या मर्जीस येईल तसें कर!!

किती झालें तरी बापच तो! दोग्दो सारख्या सुंदर व सद्गुणी मुलीला अरण्यात नेऊन ठार मारून टाकणें हा सल्ला कोणत्या बापाला रुचेल! असा कोण निष्ठुर अंतःकरणाचा कठोर बाप आहे कीं, जो आपल्या पोटच्या गोळ्याला आपण होऊन ठार मारून टाकील! हें सर्व खरें. हा मायेचा पाश तसा बलवत्तर व प्रभावी असतो याविषयीं दुमत नाहीं तथापि मनुष्यात दुसरी एक भावना म्हणा अगर शक्ति म्हणा अशी आहे कीं, ती कव्हा केव्हा या मायेवरहि मात करूं शकते! ती म्हणजे

अंधश्रद्धा ! मानवी विचाराला पिळवटून खुरबडून सोडणारी ती ही अधश्रद्धा ! विवेकाला डुली करणारी अधश्रद्धा ! तिच्या तावडींत सापडलेला मनुष्य–तो किती का शहाणा असेना–अखेर हतबुद्ध होऊन माणुसकी विसरून काय वाटेल तें पाप करण्यास प्रवृत्त होतो ! आणि त्याप्रमाणें हा **फ़हिमरच्या** तिच्या आहारी जाऊन तिची (**दोग्दोची**) वाट लावण्यास तयार झाला !

पण तिच्या आईस हें वित्र वर्तमान कळताच तिनें जो आकाडताडव माडला तो सागून पुरवत नाहीं ! आपल्या सुदर लाडक्या मुलीला रानात नेऊन ठार मारण्याचा सकल्प जेव्हा तिच्या कानावर आला तेव्हा तिच्यावर आकाशच कोसळलें ! माय माऊली ती ! खरी मातृदेवता ! बाप निष्ठुर होईल, मुलगा निष्ठुर होईल, पण माता निष्ठुर झाली असा दाखला मानवी इतिहासात कोठें सापडावयाचा नाहीं ! म्हणून श्रीशंकराचार्यांनी म्हटलें आहे कीं ' कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ! ' खरोखर किती सार्थ व सत्य आहेत बोल हे ! त्या माउलीनें आता एकच टाहो फोडला ! तिचा जीव कळवळला ! तळमळला ! चडफडला ! तिचें काळीज पिळवटून निघाले ! तिनें त्यावेळीं जो आक्रोश माडला आकात केला, त्यानें तें सर्व घर दणाणून गेले तिनें नवऱ्याची मुलीचा जीव वाचविण्याची परोपरीनें विनती केली व शेवटी त्या माउलीचा आग्रह प्रभावी ठरून **दोग्दोला** अरण्यात नेऊन जिवानिशी न मारता तेथेंच तिला टाकून परत फिरण्याचें **फ़हिमरच्यानें** वचन दिलें ! व तो पुढें त्या वचनास जागलाहि

बिचारी **दोग्दो** ! काय तिचें नशीब पहा ! राजाची राणी व्हावयाची ती रानातली भटकी अनाथ पोरकी पोर झाली ! आता त्या एकट्या मुलीनें जावें कोठें, खावें काय, नि जगावें कसें ! अरण्यात ती एकटीच काय करणार ! नि कोठें जाणार ! वाचकहो ! तुम्हाला आम्हाला हा प्रश्नच

असला, तरी भवितव्यतेचें धोरण काहीं निराळेंच असते ! तुम्हा आम्हाला ती पोरकी दिसली तरी वस्तुत ती तशी नव्हती ! परमेश्वराची अदृश्य शक्ति तिच्या पाठीशी राहून तिला जपत होती ! अहुरमज्दची कृपादृष्टि तिच्यावर पाखर घालीत होती ! मग कसें तिचें बरें वाईट होणार ? परमेश्वर ज्याचा पाठराखा आहे--वाली आहे--त्याचें कोण काय वाकडें करणार ? कसारी माता दोन दिवसाच्या कोवळ्या अर्भकाला -बाळ पिप्प लाला--अरण्यात सोडून गेल्यावर त्या बालकाचें रक्षण कोणी केलें ? बाळ प्रल्हादाला सळसळणाऱ्या तप्त तेलाच्या कढईत बुडविण्यात आलें, तेव्हा तो बाळ कसा जगला ? चंद्रहासावर देवळात मारेकरी घालण्यात आले, त्यावेळीं त्याचें रक्षण कोणी केलें ? ती अदृश्य दिव्य शक्ति ! मग तुम्ही त्या शक्तीला नारायण म्हणा, अहुरमझ्द म्हणा, यहोवा म्हणा अथवा अल्ला म्हणा, सर्वांचा अर्थ एकच ! ती सूक्ष्म व दिव्य--अगाध व अचिंत्य--महाशक्ति ! येथेंहि त्या दोग्दोच्या मागें तीच शक्ति पाठराखीण होऊन, तिचा साभाळ करण्यास प्रवृत्त झाली, असें झटल्यास त्याला काय झणून नाक मुरडावें ? असेल त्या शक्तीवर विश्वास तर तें माना, नसेल तर सोडा ! पण दोग्दो त्या अरण्यात जगली, वाचली व राहिली हें मात्र खास !! कर्म तें मानवबुद्धीला समजणें शक्य नाहीं !! असो

बाप तिला रानात सोडून गेल्यावर ती एकटीच भटकत थाटकत फिरत चालली भूक लागली तर झाडावरची फळें खा, तहान लागली तर झऱ्याचें अगर तळ्याचें पाणी पी, रात्र झाली तर तेथेंच कोठेतरी आडोशाची जागा पाहून निजून काढ, याप्रमाणे करीत करीत ती एके दिवशी सहज पैतरस्पाच्या खेतवाडीत शिरली आता सुदैव तिचें उभे राहिलें कीं त्या जमीनीचा मालक पैतरस्प तिला तेथें भेटला तिला एकटी लाच तेथें पाहून तो तिच्या जवळ आला व तिची विचारपूस केली तिची

सगळी हकीकत ऐकून घेतल्यावर त्यं मुलीला पाहून त्याला सविषाद आश्चर्य वाटलें देव त्याच्या पोटात शिरला व आनदानें तिला बरोबर आणून घरी ठेऊन घेतलें आणि पुढें मोठ्या प्रेमानें तिचा साभाळ केला 'अरक्षित तिष्ठति दैवरक्षित ' ह्मणतात तें असें

( दिनकर्द ७ )

पुढें त्या **दोग्दोचें** गूण व सौंदर्य पाहून तिचें आपल्या मुलाशी–ह्मणजे **पौरुपस्पाशी**–लग्न करून तिला आपली सून करून घेतली ! अर्थात् ती आता एका खानदानी गृहस्थाची सून झाली ! अर्थात् तिच्या दुर्दैवानें आता आपला पाय मागें घेतला !

**दोग्दोचें** लग्न झाल्यावर पुढे **अहुरमझ्दनें** आपल्यातलाच एक अश घेऊन तो मिडीयातील रानात एका झाडास लावून ठेविला अर्थात् तें आत्मचैतन्य सरक्त सरकत त्या झाडाच्या पानाचा आश्रय करून राहिलें, तें पान वाळून पुढें जमिनीवर पडलें आणि तें **पौरुपस्पाच्या** एका गायीनें रानात चरावयास गेल्यावेळीं खाऊन टाकलें नतर तें चैतन्य गाईच्या पोटातील दुधात शिरून बसलें सध्याकाळीं गाय चरून घरीं आल्यावर तिचें दूध काढण्यात येऊन तें दूध नित्याप्रमाणें त्या **पौरुपस्पास** प्यावयास दिलें अर्थात् त्या दुधाच्याद्वारा तें तेजस्वी आत्मचैतन्य त्या **पौरुपस्पाच्या** शरीरात प्रविष्ट झालें याप्रमाणें त्या दोन जिवाच्या–पौरुप्प व दोग्दो या प्रेमळ जोडप्याच्या–प्रेमगर्भ सगमानें जगविख्यात अशी अलौकिक विभूति उत्पन्न होण्याची त्या सर्व दयाघन अहुरमझ्दनें ही अशी प्राथमिक तयारी ठेवली ! हें आत्मचैतन्य प्राणिमानात कसें शिरतें याविषयी उपनिषदात ततोतत हेच विचार दृष्टोत्पत्तीस येत नाहींत काय ?

( दिनकर्द, ७ )

---

# स्वप्नांतील एक विलक्षण प्रसंग !

पुढें पौरुषस्प व दोग्दो या प्रेमळ जोडप्याचा गुलाबी संसार सुखात व आनंदात चालला असता निसर्गदेवतेची त्या दोग्दोवर कृपादृष्टि होऊन ती सती गरोदर झाली ! आणि तो गर्भ म्हणजेच इराणाला नवा प्रकाश देणारा महात्मा झोरोष्टर होय ! ! दोग्दोही गरोदर झालेली पाहून घरात सर्वांना मोठा आनंद झाला. तशात त्या नवगर्भवती दोग्दोच्या हर्षानंदाला तर सीमाच नव्हती ! तेथें स्वर्गदेखील ठेंगणाच झाला ! जसजशी ती दिवसात भरत चालली तसतसे तिचे चोचले व डोहाळे मोठ्या संभ्रमानें व थाटानें पुरविण्यात आले.

याप्रमाणें तिचें गरोदरपण सुखसोहाळ्यात चाललें असता एके दिवशीं रात्रीं ती झोंपल्यावेळीं एक स्वप्न पडलें तें असें:- तिला स्वप्नात आकाशातून काहीं ढग आपल्याकडेच येत असलेले दिसले. किती काळेकुट्ट होते तें ! किती विशाल नि किती विचित्र ! ते जवळ येतात न येतात, तों त्यातून काहीं उग्र व क्रूर श्वापदें तिच्याकडेच धावत निघालीं ! त्यातील एकानें तर तिच्याशीं लगट करून तिचा गर्भाशय फाडून त्यातून तो गर्भ बाहेर ओढून काढला !

इतक्यात एक वीज चमकून त्या विजेतून एक दिव्य पुरुष खाली उतरून तिच्याजवळ येऊन उभा राहिला. त्याच्या एका हातात राजदंड व एका हातात पुस्तक होतें. त्यानें तें पुस्तक त्या श्वापदावर टाकताच तीं भेदरून तेथून सैरावैरा पळत सुटलीं ! नंतर त्या पुरुषानें तो गर्भ हातात घेऊन तो जसाचा तसा व जेथला तेथें अगदी हलुवार व अचूक ठेवून, देऊन, झालेली जखम बरी केली ! व नंतर तो आला तसा परत निघून

गेला इतक्यात तिला जाग आली व ती चटकन् उठून बसली मात्र त्या विचित्र स्वप्नापासून तिच्या काळजात धडकी बसली ती जबरच !

( दिनकर्द ७-२-५३ )

दुसरे दिवशी सकाळी हा स्वप्नातला मजकूर तिनें आपल्या पतीस कळविला तो ऐकून घेतल्यावर पौरुषस्पानें दोनप्रहरी स्वप्न सांगणाऱ्या पंडितास बोलावून आणून त्यास रात्रीचें स्वप्न सांगितलें आणि त्याची फलश्रुति विचारली त्या पंडितानी एकत्र जमून त्या स्वप्नाचा सूक्ष्म नि दीर्घ विचार करून अखेर पौरुषस्पास सांगितलें कीं, स्वप्न दिसावयास जरी भयंकर आहे तरी त्याची फलश्रुति मोठी गोष्ट आहे ! दोग्दोच्या पोटी जन्मणारे मूल मागेंपुढें मोठा धर्मसंस्थापक होईल ! व दुष्ट लोक त्याला छळू पाहतील ! त्याच्या प्राणावरहि उठतील ! पण त्यांचें काही चालणार नाही ! व तें बाळ अखेर विजयी होईल ! दुष्टांचा पराभव होऊन त्याचा लौकिक जगभर वाढेल !! ही फलश्रुति ऐकून सर्वांना मोठा आनंद झाला, हें निराळें सांगावयास नकोच

( लाइफ अँड एथिक्स ऑफ झोरोस्टर, (अलेक्झांडर कृत) पृ १ )

---

## दिव्य तारा चमकला !

वर्षाचा तो वसंत काल ! नटनकुशल सृष्टिसुंदरीनें जिकडे तिकडे आपलें नयनमनोहर असें दिव्य लावण्य सर्वत्र उधळलेंं ! पहावें तिकडे डोळ्याला आनंददायक असा सुरम्य देखावाच देखावा ! झाडें नवपल्लवानी बहरून नटलेली ! वेली नवविलासात फुलून वाऱ्याच्या मंद लहरीबरोबर मधुर

नृत्य करू लागलेल्या ! पक्षीगण झाडावर बसून विविध स्वरात कर्णमधुर कूजन करीत असलेला ! नदीनाले स्वच्छ व गार उदकानें झुळुझुळु वाहत असलेले ! शीतल वायु मंद मंद वाहत जगाला सुखवीत असलेला ! काय तो नीलवर्ण आकाशातील चांदण्या रात्रीचा अपूर्व थाट ! आल्हादकर रजनीनाथाचें तें शुभ्र, शांत व शीतल चांदणें आणि दिव्य कांतीनें चमकणाऱ्या त्या तारकांचा मनोहर मेळावा ! एकदरींत दिवसा काय किंवा रात्री काय, वसंतराजाच्या वैभवशाली कारकीर्दीत सर्वत्र नटलेले व खुललेले तें सृष्टिदेवतेचे नयनमनोहर प्रदर्शन पाहून स्वर्गीय आनंद क्षणभर तरी लुटण्यास मिळाला, तरी तें एक भाग्यच नव्हे काय ?

या वसंत कालातच **दोग्दोला** नवमास संपून दहावा लागला आणि पुढें इराणी पंचांगाप्रमाणें वर्षाच्या पहिल्या म्हणजे '**फरवर्दीन**' महिन्यातील सहाव्या दिवशी म्हणजे '**खोरदाद**' या दिवशी सुखरूप बाळंत झाली तिच्या उदरीं दिव्य पुत्ररत्न जन्मास आलें त्यावेळीं त्या घराभोंवती सुंदर प्रकाश सर्वत्र उजळून राहिला होता मुलें जन्मल्याबरोबर रडतात पण हें बाळ बाहेर येताक्षणींच न रडता खदखदा हसू लागलें ( दिनकर्द ७-३-२ ) **दोग्दो** माऊली धन्य झाली ! व धर्मभास्कर उदय पावला ! ! त्यादिवशी तो सबंध गावचा गाव प्रकाशमय झाला

( दिनकर्द ७-२-५६ ) व ( झातस्परम, १३-४ )

---

## भविष्य-कथन

सामान्यत मुलें जन्मल्याबरोबर रडतात पण हें **दोग्दोचे** मूल रडें न करतां हसत होतें ! शिवाय आणखी, तें जन्मलें त्यावेळीं घरभर

सगळा प्रकाशच प्रकाश उजळला होता! हा विलक्षण प्रकार पाहून त्या **पौरुषस्पाला** जरा चमत्कारिकच वाटलें तो मनात कचरल्यासारखा होऊन, किंचित अस्वस्थ झाला त्याचा पुढें करमेना मन संशयात पडलें आणि बुद्धि काहीशी गांगरल्यासारखी झाली उघडच आहे कीं असा प्रकार आतापर्यंत कोठें पाहण्यात वा ऐकण्यात आला नव्हता

तो स्वभावानें जरा भोळसर असून मांत्रिकावर त्याची फार श्रद्धा होती तेव्हा हें प्रकरण काय आहे, हें त्याना विचारून त्याच्याकडून संशयाची फोड करून घ्यावी, असें मनात ठरवून, तो मांत्रिकाकडे आला हे मांत्रिक लोक म्हणजे त्यावेळी मंत्रतंत्रहि करीत व भविष्यहि सांगत स्वप्नाचे अर्थ लावीत व ग्रहादिकाचे गुणदोषहि पहात अशा मांत्रिकात त्यावेळीं त्याच्या वळणाचा **'दोरासरून'** नावाचा एक मोठा प्रसिद्ध मांत्रिक होता त्याच्या जवळ जाऊन, मुलाची जन्मकथा सांगून, त्याच्या जन्माची फलश्रुति विचारली

हा **दोरासरून** म्हणजे मोठा पट्टीचा पंडित असलेला मांत्रिक व निष्णात ज्योतिषी पण मोठा धूर्त व मतलबी! त्याला **पिमाचा** इशारा व बैलाचें भविष्य हें पूर्ण माहीत होतें हें मूल पाहताच त्याच्या लक्षणावरून त्याला त्या भविष्याची अचूक आठवण झाली व लांडग्याला पाहून कोंकरू जसें गांगरतें तशी त्याची त्या मुलाकडे पाहून स्थिति झाली! त्या बाळाचें तें दिव्य तेज पाहून व चेहरा ओळखून तो मनात चमकला, चरकला व चपापला मनातल्या मनात त्यानें पूर्ण जाणलें कीं, मूल मोठें झाल्यावर तें खास आपल्या मुळावर उठणार! सर्व सनातनी कवि व करप पंडितावर हीड उठविणार! परपरागत धर्मावर कठोर प्रहार करणार! व जुन्या चालीरुढीवर व आचारविचारावर प्रखर टीकास्त्र रोखणार! अर्थात् सनातन धर्माला खो घालून सर्वत्र अनाचार व भ्रष्टाचार माजणार! आणि हें

भावी संकट जर टाळावयाचें तर आताच काही तरी भलेबुरे उपाय योजून, त्याची विल्हेवाट लावली पाहिजे ! त्याला जगातून नाहींसा केला पाहिजे !! असा विचार करून आपलें मनोगत बाहेर न फोडता तो **पौरुषस्पाला** बाहेर घेऊन आला

बाहेर आल्यावर जवळपास कोणी नाहीं असें पाहून तो त्यास म्हणाला—पौरुषस्पा ! तुझें मूल पाहिलें आता तुला खरेंखुरें सांगावयाचें म्हटलें तर तें तुला कसें वाटेल कोण जाणे ! पण तुझ्या हितासाठीं स्पष्ट बोलणें मला भाग आहे हें पहा, मूल सगळें तसें चांगलें आहे जणु-काही नक्षत्रच ! पण लक्षण काही ठीक नाहीं ! तें तुला जय देणार नाहीं ! जसजसें वाढत जाईल तसतशी तुझी ग्रहदशा उलटत जाईल ! तुझ्या जिवाला धक्का पोंचेल ! व घराण्याचा सगळा सत्यानाश होईल ! हा असा तुझ्या मुलाचा जन्मगुण आहे ! मोहाला बळी पडलास तर पश्चात्ताप पावशील ! शाहणा असशील तर वेळींच सावध हो ! मग आता तुला बुद्धि होईल तसें कर ! सावध करण्याचें काम तेव्हढें माझें तें मी केलें पुढील बऱ्यावाईट गोष्टींचा मालक आता तुझा तूच ! इतकें सांगून तो तेथून निघून गेला

त्या **दोरासरूनच्या** तोंडातून निघालेलें हें भाषण ऐकून बिचारा **पौरुषस्प** मनातल्या मनात फार खजिल झाल्यासारखा झाला ! त्याचप्रमाणें थोडासा चपापलाही ! पण त्यावेळीं विशेष काही केलें नाहीं मात्र तेव्हा पासून तो चिंताक्रांतच दिसत होता स्वास्थ्य असें त्याचें निघून गेलें !

इकडे **दोरासरून** जो तेथुन निघाला तो सरळ आपला स्नेही व साथीदार जो **बर्तरुश** त्याच्याजवळ आला हा बर्तरुश झाला तरी तितकाच मोठा नामांकित पंडित ! प्रसिद्ध करप घराण्यातील जे काही नामांकित

पडित होते, त्यातलाच हाहि एक होय ! पण स्वभावानें मात्र तितका सरळ व सरस नव्हता ! ज्योतिष विद्येंत मान त्याचा हुकमी हातखंडा आणि त्याची ख्याति तशीच मोठी होती ! त्या वैलाचें भविष्य सतत त्याच्या डोळ्यापुढे असून ती काल आता अगदी नजीक आला होता हें त्यास समजून चुकलें होतें पण ते मूल कोठें जन्मतें व केव्हा जन्मतें, याची मात्र त्याला असावी तितकी नक्की माहिती नव्हती तथापि ही ती वेळ आता आली आहे याची त्यास पूर्ण कल्पना होती **दौरासरूनच्या** तोंडून त्या मुलाची सगळी हकीकत ऐकल्यावर त्यानें मनात पक्की गाठ मारून ठेविली कीं हेंच तें मूल ! त्या वैलानें भविष्य वर्तविलेलें हेंच तें मूल !

आता त्या **बर्तरुशालाहि** थोडी धास्ति बसली तो मनात चपापला ! त्याला वाटलें कीं, आता आपले बारा वाजण्याचा काळ समीप आला ! तें मूल खानीनें आपला धुव्वा उडवील ! धर्माला ग्रहण लागेल व विचारात क्रांति होईल ! हा सर्व अनर्थ आता लवकरच घडून येईल ! ! या सर्व अनिष्टाचें ढोबळ चित्र आता त्याच्या डोळ्यापुढें चकचकीत उभें राहिलें व ते पाहून त्याच्या सर्वांगातून एक भीतीची लहर सहज उसळून गेली ! कांहीशी विचित्र स्थिति झाली त्याची ! त्या **बर्तरुश** महापंडिताची ! !

---

## खलपुरुषांचा दुष्टावा !

पंडित खरे पण स्वभावाने दुष्ट, धर्मज्ञ खरे पण अधश्रद्धेच्या आहारी गेलेले, विचारवंत खरे पण स्वार्थाने लडबडलेले, असे हे कवि व करप पंडित होते तशात **दोरासरून** व **बर्तरश** ही जोडी तर अति दुष्ट, धूर्त व पाताळयंत्री ! स्वार्थापर सकात नसते असें दिसलें कीं, वाटेल तें पाप करावयास तयार ! ते आता दोघेच दोरे बसून एकातात विचार करू लागले त्यानी त्या मुलाची मोठी धास्ति घेतली होती तें मोठें झाल्यावर आपल्या धर्मावर व लौकिकावर अचूक झडप घालून खास आपणास शह देऊन निर्माल्य व निनार्म करणार व आपल्या वृत्तीवर नेमका टोला मारणार याची त्याना पक्की खात्री पटली !

मग आता काय ? स्वस्थ बसून कसें चालेल ? हें विषबीज लवकरच नाहिसे केलें नाहीं तर जगात आपल्याला अब्रूनें मिरविण्यास जागा राहणार नाहीं, हें भविष्यहि त्याना कळून चुकलें आता त्या मुलाची गय करणें म्हणजे रोगाला वाढू देणें होय, असा विचार करून, कोणत्या ना कोणत्या तरी उपायाने तो काटा शस्य तितक्या लवकर काढून टाकला पाहिजे, असा त्यानी डाव घातला व त्यारोखानें पुढील मसलत चालविली **पौरुषस्प हा** भोळसर व भाविक असल्यामुळें त्याच्या भोळसरपणाचा फायदा घेऊन त्याला नसती भीति घालून, त्या मुलाविषयीं त्याचें मन कलुषित होईल हा प्रथम प्रयत्न करून, मग आपला कार्यभाग साधावा, असा त्यानी आता घाट घातला व तो त्याना पुढें लवकरच साध्यहि झाला !

**दोरासरूनचें** भाषण ऐकल्यापासून पुढें दिने दिने त्या **पौरुषस्पाची** स्थिति जरा चमत्कारिक होत चालली पुढें त्याला रहावेचना म्हणून तो पुन त्या धूर्त **दोरासरूनकडे** येऊन आपल्यावरील संकट कसें टळेल व

आपली भीति कशी नाहींशी होईल, याविषयीं त्याला उपाय विचारू लागला त्याची त्या मान्त्रिकावर पूर्ण निष्ठा व श्रद्धा होती तो मनतत्र विद्येंत मोठा प्रवीण असून, आपल्यावरील अरिष्ट टाळण्याचा उपाय तो पूर्ण जाणू शकतो व म्हणून या आपत्तीतून पार पाडण्यास तो समर्थ आहे, अशी त्या भोळसर बापाची दृढ भावना होती काय उपाय योजल्यास आपलें बरें होईल आणि आपत्ति टळेल, हें विचारण्यासाठीं म्हणून या खेपेस तो त्याच्याकडे आला होता

त्या धूर्त **दोरासरूनला** हेंच पाहिजे होते त्यानें त्या बावळट बापाच्या भोळसटपणाचा फायदा घेण्याचें आणि नसती भीति घालून त्याला अधिकच भेदरविण्याचें व भडकावण्याचें ठरवून, त्याप्रमाणें त्यानें आपली भूमिका रगविली त्या **पौरुपस्पास** त्यानें या खेपेस स्पष्टच सागितलें कीं, तें मूल जगेल तर तुझी धडगत नाहीं ! आणि तें त्या भावड्या पौरुपस्पास खरेंच वाटलें ! ! कसेंहि करून त्या सकटातून आपणास मुक्त करावें, अशी त्यानें त्याची मोठ्या काकुळतेनें विनवणी केली

**पौरुपस्प** आपल्या कह्यात आला आहे हें पाहून तो त्यास म्हणाला—**पौरुपस्पा** ! तुझें सकट मोठें आहे खरें पण तें टाळणें हें तुझ्या धैर्यावर व शहाणपणावर अवलबून आहे तुला जीव पाहिजे असला, तुला जगावेसें वाटत असलें, तर तुला मुलाची आशा सोडावी लागेल नव्हे सोडलीच पाहिजे ! तुम्ही दोघेहि एकाच वेळी जगू शकणार नाहीं ! दोघात कोणीतरी एक जगेल मूल जगेल–तू मरशील ! तूं जगशील–मूल मरेल ! पण तुम्ही दोघेहि जगण्याचा योगायोग नाहीं ! तुला जीव पाहिजे असला व मरण टाळावयाचें असलें, तर मी तुला उपाय सागेन पण प्रथम तें तुझें मूल पाहू दे मला आणि मग उपाय सागेन तुला पुढचा

**पॉरपस्पानें** ती गोष्ट मान्य करून, त्याला घरी आणून बाळ पाळण्यात निजलें होतें, तेथें नेऊन त्याला तें दाखविलें अहाहा ! किती सुदर बाळ तें ! किती गोड ! किती गोंडस ! किती नाजूक ! किती कोमल ! किती सुलक्षण ! खरोखर सौंदर्याचा मूर्तिमंत पुतळाच ! तें बाळ-तें बाळ **झोरोष्टर**! पण त्या दुष्ट **दोरासरूनला** तें काय होय? तो बस तें बाळ पाहून आनंदण्यास आला नव्हता, तर त्यास मारण्यास आला होता ! माजराची पिलें पाहून बोका जसा चवताळतो व खवळतो तशी त्या दुष्टाची त्या बाळाला पाहून स्थिति झाली ! त्या मुलाला पाहून त्याची खात्री झाली कीं, हाच तो आपला धर्म बुडवून नवा धर्म स्थापू पाहणारा काळपुरुष ! वैलाचें भविष्य सत्यसृष्टीत आणू पाहणारा दुष्टपुरुष ! !

त्यानें **पॉरपस्पास** काही आणण्यास म्हणून बाहेर पाठवून दिलें. दोग्दो ही आत घरात काही कामात गुतली होती जवळपास कोणी नव्हतें या संधीचा फायदा घेऊन, त्याच्या दुष्टबुद्धीनें एकदम उसळी मारली त्या आवेशातच तो पाळण्यापाशीं आला बाळ पाळण्यात हातपाय नाचवीत व मधुनमधून मूठ वळवीत खेळत होतें आपापल्यातच हसत होतें ! गोड खिदळत होतें ! मोठ्या रंगात आलें होतें ! ते तान्हें गोंडस बाळ ! अशा त्या सुकुमार राजहंसाचा तेथल्या तेथें गळा दाबून त्यास चीत करावें, या दुष्ट उद्देशानें त्या दुष्टानें आपला पातकी हात त्या बाळाच्या नरडीजवळ नेला !

तो काय चमत्कार ! तो हात जेथल्या तेथेंच आखडून लाकडा प्रमाणें ताठून टणक झाला ! पुढें जाईना, मागें येईना, खाली जाईना, वर चढेना ! मुसळाप्रमाणे जेथल्यातेथें ताठून राहिला ! त्या हातातील रक्तच गोठून बर्फाप्रमाणें गारेगार झालें ! त्याची पाचावर धारण बसली ! तो गोंधळला, गडबडला, घाबरला, त्याला काही सुचेनासें झालें ! सटकन्

तेथून निघून बाहेर आला तो इतक्यात माउली भोळाजवळ आली मूल याचलें व दुष्टाची मसल्त फसली ! ।

( ज्ञात स्मरम, १६, २ ३ )

ही फजीति त्यानें बाहेर दुसऱ्याजवळ बोडून दारावीली नाहीं मनातल्या मनातच दाबून ठेविली मात्र इतकें खरें कीं, झालेला प्रकार पाहून त्याचें अंत करण हादरून गेलें। पण त्याची दुष्टबुद्धि काही नरमली नाहीं उलट तिला अधिकच चेव आला ! आपला डाव अशा चमत्कारिक रीतीनें हुकला, हें पाहून तो मनात मनस्वी खजिल झाला या चमत्कारानें त्याची पूर्ण खात्री झाली कीं, बैलाने वर्तविलेलें भविष्यातील बाळ म्हणजे तें हेंच ! !

या गोष्टीस पुढें काही दिवस गेले नंतर तो पौरुषस्प पुन त्याच्याकडे आला व पुढील उपाय विचारू लागला तेव्हा तो साव पणाचा मोठा आव आणून त्यास म्हणाला, बाबा ! ती गोष्ट फार नाजूक आहे ती तुजकडून होईल कीं नाहीं याची मला शंका वाटते पण पेंच मात्र कठीण आहे ! तुला जगावेसें वाटत असल्यास मुलाची आशा सोड ! बापाचें काळीज आम्ही जाणतो आम्ही सांगू तो उपाय तुझ्यानें करवणार नाहीं आमच्या स्वाधीन तें मूल कर ! त्याची आशा सोडूनच कर ! म्हणजे आम्ही तुला वाचविण्याचे हरप्रयत्न करून तुला वाचवू ! आणखी हेंहि सांगतो कीं, आम्ही त्या मुलाचें बरेंवाइट काहीहि करू, त्याला तुझी सम्मति पाहिजे तसें असेल तर सांग !

या आशाजनक भाषणानें त्या बापाला जरा हायसें वाटलें आपण जगतो या आशेनें त्याला जरा धीर आला बाप झाला म्हणून काय झालें ! जीव कोणाला नकोसा झाला आहे ? मूल मेलें तर मरू दे ! पुन

दुसरे होईल! पण आपण मेलो तर! तर काय, सगळाच ग्रंथ आटपला! आपला जीव गेला तर तो काय पुनः असा थोडाच मिळणार आहे! मुलाकरता आपण मरणें हा कोठला न्याय! असा विचार करून आपला जीव वाचविण्यासाठीं मुलाच्या जिवावर पाणी सोडण्यास तो तयार झाला व तें मूल, त्याचें बरेंवाईट करण्यास त्या राक्षिकाच्या स्वाधीन करण्यास त्यानें अखेर आपली सम्मति दिली!

मग आता विलंब कसला! पुन एकदा संधि साधून तो सत्पुरुष **पौरुषस्पाच्या** घरी आला. बाळ पाळण्यात निजलें होतें त्याला पाहून तो परसात गेला व तेथें एका कोपऱ्यात अग्नि पेटविला तो चांगला पेटल्यावर बाळाजवळ येऊन इकडे तिकडे न्याहाळून पाहून बाळास हळूच उचलून घेऊन परसात अग्निजवळ आला व तो त्या बाळाला अग्नींत टाकताच चमत्कार असा झाला कीं अग्नि विझून गारेगार झाला. हा चमत्कार पाहून पुन. त्यानें तें बाळ उचलून घेऊन पाळण्यात जशाचें तसें ठेवून दिलें. व तेथून निघून गेला

**दोरासरूनला** आता मोठी काळजी येऊन पडली. मनुष्याचा प्रयत्न चालत नाहीं व अग्नीची मात्रा लागू पडत नाहीं, मग त्यास काळजी न पडेल तर काय होईल? त्याचें अंत करण आता खालीवर होऊ लागलें व धीर खचत चालला! त्याला आता मोठी पंचाईत येऊन पडली! तथापि तो काहीं अगदीच निराश झाला नाहीं त्यानें केलेलीं दुष्कृत्यें गुप्तरीतीनें केल्यामुळें **पौरुषस्पाच्या** घरातील मंडळीस कोणालाच ती कळून आलीं नव्हतीं मात्र त्या दुष्टानें इतका घरोबा वाढविला होता कीं मुलाला तो अधुनमधुन बाहेर घेऊन जात असे. पुनः आणून सोडीत असे. यामुळें त्याचा कोणाला संशय आला नव्हता म्हणून त्याला कोणी हरकत करीत नव्हत.

वरील गोष्टीला काही दिवस लोटल्यावर त्यानें **पौरुषस्पाकडून** तें मूल घेऊन बाहेर गेला व गाईगुरें सध्याकाळी रानातून परत घरीं येण्याच्यावेळीं तें मूल त्यानें भर वाटेवर ठेवून दिलें! उद्देश हा कीं गाईगुरें तरी भरधाव घराकडे धावत येताना, त्याला पायाखालीं तुडवून त्याचा चेंदामेंदा करतील. पण **अहुरमझ्दची** कृपादृष्टी सतत त्या बाळावर पाखर घालीत असता कशानें तें मरणार? नि कोण त्याला मारणार? वरील दोन चमत्कार पाहूनहि तो शुद्धीवर आला नाहीं हें मात्र आश्चर्य! किंवा आश्चर्य तरी कसलें? द्वेष नि मत्सर यानी ग्रस्त झालेला मनुष्य केव्हाहि आंधळाच असणार! हा जगाचा नियमच आहे! असो

( झात-स्परम, १६-१ व ६ )

मुलाला रस्त्यावर ठेवून आपण बाजूस जाऊन उभा राहिला न राहिला तों इतक्यात दौडर्शे गाईबैलांचा कळप रस्त्यावरून धावतच तेथें आला. तें पाहून त्या दुष्टाला थोडेसें बरेंहि वाटलें आता मूल खचीत मरणार, या आशेनें तो मनात हुरळून गेला. पण पण काय? तेथें चमत्कार असा झाला कीं, त्या बाळाजवळ येताच पुढें धावत येणारी एक गाय चटकन् तेथें थांबून, तिनें त्याला आपल्या पोटाखालीं घेतलें! आणि आपले चारहि पाय त्याला इजा न करता त्याच्या चारहि बाजूस रोवून, ती तेथें घट्ट उभी राहिली! तो गाईंचा सबध कळप बाळास इजा न करता सरळ बाजूबाजूने तेथून पुढें निघून गेला! आणि बाळ सुरक्षित वाचलें!! नंतर त्यानें तें बाळ उचलून घरीं आणून पोंचविलें

( झात स्परम–१६, ५ )

याहि गोष्टीला काही दिवस लोटले पण त्या **दोरासरूनचे** मन त्याला स्वस्थ बसू देईना. पुन. त्याच्या मनानें उचल खाल्ली व पुन. तसाच एक प्रयोग चवथ्यांदा करून पाहिला या खेपेस गाई ऐवजी

घोड्याचा प्रयोग होता तो. घोडे हिंडण्याफिरण्याचा रस्त्यावर बाळ नेऊन ठेवलें. पण तोहि प्रयोग दुर्दैवानें फसला गायीप्रमाणेंच त्या घोड्यानी कमाई केली. एक घोडा त्या मुलाला पोटाखाली घेऊन उभा राहिला व बाकीचे घोडे आजूबाजूला होऊन सरळ पुढें निघून गेले. त्या बाळाच्या केसालाहि धक्का लागला नाहीं! 'देव तारी त्यास कोण मारी' अशातला प्रकार झाला तो!

(ज्ञात स्वरम १६-६)

आता मात्र दुष्ट दोरासरूनची स्थिति मोठी चमत्कारिक झाली! जवळ जवळ त्याचें अवसानच खचलें! आता तो फार घाबरला! सहजच आहे, एक नव्हे, दोन नव्हे, खसखशीत चार प्रयत्न करून पाहिले. पण एकालाहि यश नाहीं! याचा अर्थ काय? हात धजत नाहीं, अग्नि जाळीत नाहीं, गाई तुडवीत नाहींत व घोडे शिवत नाहींत! मग याचा अर्थ काय? त्या बैलाच्या भविष्याप्रमाणें तो त्यास देवाचा प्रेषित असावा, याबद्दल आता त्याची पक्की खात्री होऊन चुकली.

तो आता आपल्या सोबत्यास-म्हणजे थर्तदशास जाऊन भेटला व त्याला सर्व हकीकत सांगून पुढें काय याविषयीं त्याचा त्यानें सल्ला विचारला. त्या थर्तदशासहि हा सगळा प्रकार ऐकून मोठें आश्चर्य वाटलें. तोहि मनात कचकलाच! शेवटी दोघानी मिळून असें ठरविलें कीं आता शेवटचा प्रयत्न म्हणून त्याला लांडग्याच्या तोंडी नेऊन देऊन टाकायचें! तो प्रयत्न यशस्वी होणें करता लांडग्याला राग व चेव यावा, म्हणून त्यांची पिलें मारून बाळ झोरोस्टरला तेथें मधें निजवून सभोंवती तीं मारलेलीं पिलें पसरून ठेवण्यात आलीं. अशानें तरी पिलांच्या माता चवताळून त्या बाळाला फाडफाडून खाऊन टाकतील.

याप्रमाणें व्यवस्था केल्यावर पुढें थोड्याच वेळानें त्या पिलाच्या आया तेथें आल्या व आपली पिलें मरून पडलेली पाहून त्या बाळावर धतापून व चवताळून झडप घालणार तो इतक्यात त्यांचे पाय जमीनीत रुतून बसले ! पुढे जाता येईना व मागें वळता येईना ! त्यातल्या त्यात गम्मत ही की पुढें क्षणभराने त्या लांडग्या निश्पाय होऊन परत गेल्यावर एक शेळी तेथें येऊन त्या बाळास दूध पाजीत उभी होती ! पुढें तें बाळ रानात आईबापाना सुरक्षित सापडलें !

( दिनकर्द, ७ ३ ते १९ ) ( ज्ञात स्मरम १६-८ )

याप्रमाणें **झोरोष्टर** हा अगदी लहान असतानाच त्याला जगातून नाहींसा करण्याचे चागले चार पाच प्रयत्न करण्यात आले पण ते सर्वीहि एकजात फसले ! या दोरासरूनचा छळ पाहून आम्हा भारतीयाना हिरण्य-कशिपु आणि बाळ प्रल्हाद याची आठवण होत नाहीं काय ? हा दोरासरून म्हणजे इराणातला हिरण्यकशिपुचा अवतारच म्हटले तरी चालेल कृष्णास मारू पाहणारा कंस—किंवा बाळ येशूला मारू पाहणारा पापी हेरोद म्हटले तरी चालेल ! असो

पुढें असा चमत्कार झाला कीं, बाळ जसें जसें पुढें वाढत चाललें तसें तसें **पौरुषस्पाचे** अहित न होता उलट दिवसे दिवस त्याचें कल्याणच होत चालले ! आणि त्यामानाने **दोरासरूनचे** भविष्य लटकें पडत चाललें ! बाळ झोरोष्टरची ती चिमुकली सुंदर हसरी मूर्ति पाहून पौरुषस्पाचें अंतःकरण निवळत चालले व तेथें त्या पुत्रवात्सल्याचा जोमदार अंकुर फुटला ! तो आता त्याच्यावर प्रेम करू लागला, त्याला जिवापाड जपू लागला व त्याची रात्रंदिवस काळजी घेऊ लागला ! त्याने आता त्या दुष्ट दोरासरूनचा नाद सोडून दिला, हें सांगण्याचें कारणच नाहीं !

## तरुण विश्तास्प

इराणात अगदी पूर्वेस पूर्वी ब्याक्टिरिया नावाचा एक देश होता. तेथें कवि घराण्यातला **लोहरस्प** नावाचा राजा त्याकाळीं-ह्मणजे या चरित्र ग्रंथाच्या इतिहासकाळीं **बल्ख** येथें राज्य करीत होता. तो मोठा शूर व उदार राजा असून, जवळ जवळ त्याची कारकीर्द एकशेवीस वर्षांची होती असा इतिहासाचा दाखला आहे. बल्ख राजधानी त्यानेंच वसवून ती मोठ्या वैभवास व नावलौकिकास आणली. त्याला **विश्तास्प** व **झरीर** असे दोन मुलगे असून, त्यात **विश्तास्प** हा वडील होता. तो मोठा शूर, धाडशी व विद्वान असून, भर तारुण्यात आला होता. बाप ह्मातारा-ह्मणजे जवळ जवळ शंभरी उलटलेला-असल्यामुळें तो थकला भागला होता, हें जरी खरें असलें तरी राज्यकारभाराची हाव व हौस मात्र त्याची त्यामानानें काहीं कमी झाली नव्हती. ' जिवनाशा धनाशाच जीर्यतोऽपिनजीर्यते ' ही सुभाषितोक्ति खोटी कशी होणार ! ज्याला त्याला संपत्तीची व अधिकाराची हौस व लालसा असणारच आणि तो सामान्य मनुष्याचा स्वाभाविक धर्मच आहे !

तरुण विश्तास्पाला काय वाटलें कोण जाणें, त्यानें एके दिवशी बापाजवळ जाऊन आपणास गादीवर बसविण्याची गोष्ट काढली. पण त्या ह्मातार्‍या **लोहरस्पानें** त्यास सरळ उत्तर न देता अळटळची भाषा वापरली. ती त्या मानी व नवरक्ताच्या जवान तरुणाला रुचली व मानवली नाहीं ह्मणून तो रागारागानें घरातून बाहेर पडला आणि सरळ त्यानें हिंदुस्थानची वाट धरली. पण मधेंच त्याला काय वाटलें कोण जाणें, तो नाद सोडून देऊन तो पश्चिमेकडे रूम शहराकडे वळला. वाटेंत त्याला एक **हयशोई** नावाचा गृहस्थ भेटला. त्याच्या मदतीनें त्यानें अखेर तें रूम शहर गाठलें.

तेथें तो सुरक्षित जाऊन पोंचला. पण पुढें काय ? दोनप्रहरची वाट काय ? येथें काही तो युवराज नव्हता ! चक्क कोरा करकरीत नवखा व परका मनुष्य ! कोण त्याला ओळखणार व कोण सरबराई करणार ! आता आली की पंचाईत ! भीक मागावी तर तें कसें जमणार व रुचणार ? हाडपेराचा पक्का राजबिंडा मग अन्नानें तेथें दिवस कसे काढायचे ? अखेर त्यानें लेखकाचा-पेशा पत्करून त्यावर चरितार्थ चालवावा असें मनात ठरवून, नोकरी करता फिरत फिरत तो राजाच्या कचेरीत आला. पण तेथें लेखकाची जागा त्यावेळी खाली नसल्यामुळें त्याला तेथून बाहेर पडावें लागलें ! हा बेत त्याचा फसला. त्याबाबतींत निराश झाल्यावर, तो घोड्यावर बसणारा खदा स्वार असल्यामुळें राजाच्या पागेंत जाऊन पागेदाराची भेट घेतली. पण दुर्दैवानें तेथेंहि त्याची सोय लागली नाहीं ! नंतर तो साडणीस्वाराकडे गेला, तेथेंहि निराशाच झाली. मग तो लोहाराकडे आला पण दुर्दैव हात धुऊन त्याच्या मागें लागलें होतें की काय कोण जाणें, तेथेंहि थारा मिळाला नाहीं

आता पुढें ? जावें कोठें व करावें काय याचा मनात विचार करीत करीत वाटेवरून चालला असता एक शेतकरी त्याग भेटला त्याच्या जवळ आपली त्या शहरातील नोकरीची हकीकत सा॰ निरुपाय म्हणून काहीं दिवस आश्रय देण्याची गोष्ट काढली व त्या सज्जन शेतकऱ्यानें त्याच्या विनंतीस मान देऊन, आपल्या घरीं त्यास आश्रय दिला. अशापरीनें राजवाड्यात राहणाऱ्या त्या राजपुत्रावर रूम येथें एका शेतकऱ्याच्या झोपडींत राहण्याचा प्रसग आला.

या सुमारास रूमच्या कैसरची 'कतायुन' नावाची ज्येष्ठ मुलगी उपवर झाली असून तिचें स्वयवर पद्धतीनें लग्न लावून देण्यानें ठरवून, त्याप्रमाणें कैसरनें आपल्या राज्यातील मोठमोठे घरंदाज व विद्वान तरुणाचे

एक सम्मेलन भरवून, त्यात कोणाला तरी एकाला पसंत करण्याचें त्यानें आपल्या मुलीला सांगितलें. तेव्हा ती आपल्या दासींना बरोबर घेऊन त्या सभेंत येऊन एकेकाकडे नजर फिरवीत फिरवीत सर्व सभेंत फिरली. पण मौज ही कीं एकहि तरुण तिच्या पसंतीस उतरला नाहीं ! नंतर आंत जाऊन तिनें बापास ही हकीकत सांगितली. बापास आश्चर्य वाटलें, पण तो काही बोलला नाहीं.

या गोष्टीला काही दिवस लोटल्यानंतर पुनः त्यानें तसेंच दुसरें आणखी एक सम्मेलन भरविलें. मात्र या खेपेस फरक इतकाच होता कीं, त्या सम्मेलनातील तरुण श्रीमंत घराण्यातील नसून, फक्त मध्यमवर्गीयातले होते. सम्मेलन भरल्यावर केसरनें आपल्या मुलीस बोलावून पहिल्याप्रमाणें त्यातील कोणास तरी पसंत करावयास सांगितलें. तेव्हा ती त्या सभेतून फिरत फिरत एका तरुणाजवळ येऊन, त्याच्या डोक्यावर तिनें आपल्या हातातील मुगुट ठेविला ! अर्थात् तिनें त्यास पसंत केलें ! हा तरुण तसा म्हणजे मोठा देखणा व अत्यंत तेजस्वी होता. त्याच्या सारखा सुंदर व पाणीदार तरुण त्या दोन्ही सम्मेलनात दुसरा कोणी दिसला नाहीं. पण खेदाची गोष्ट इतकीच कीं, तो जनसामान्यातला होता. राजानें त्याकडे पाहिलें व मुलीची निवड त्यास शहाणपणाचीहि वाटली. पण तो घरंदाज व श्रीमंत कुलातला नसल्यामुळें ती निवड त्यास तितकी रुचली नाहीं. किती झालें तरी सामान्य माणूस ! तो राजघराण्याला शोभणार कसा ? पण आता काय करता येण्याजोगें होतें ? शब्द गेला होता म्हणून निरुपायानें त्याला जामात करून घेणें भाग पडलें. पण लग्न झाल्यावर मुलीला वस्त्रालंकार, व इतर चीजवस्त न देता सडीच तिला त्याच्याबरोबर पाठवून दिली. या तरुणानें आपलें नाव त्यावेळीं 'फारूकशाद' असें सांगितलें.

**फरूकझाद** आपल्या नवपत्नीला बरोबर घेऊन आपल्या आश्रयदात्याच्या घरीं आल्यावर त्या आश्रयदात्याला तें नवें जोडपें पाहून आनंद झाला व त्यांना स्वतंत्र राहण्यासाठीं एक निराळें घर बांधून देऊन तेथें संसार थाटण्याची त्यानें सोय करून दिली. अर्थात् तें नवें जोडपें आपला नवा संसार थाटून सुखानें नांदूं लागलें. आता हा **फरूकझाद** कोण याविषयीं वाचकांस बुचकळ्यांत न ठेवतां तो बल्खचा युवराज **विश्तास्प** होय असें एकदमच सांगून हें प्रकरण आटोपतें घेतो.

( शहानामा (अलेक्झांडर कृत) पृ २८० )

---

## बालपण व शिक्षण

मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं जे मोठे लोक असतात, त्यांच्या भावी मोठेपणाचीं—विभूतिमत्त्वाचीं—पूर्वचिन्हें बालवयांतच दिसूं लागतात, अशी इतिहासाची साक्ष आहे, उदाहरणार्थ, भगवान गौतमबुद्ध, भगवान श्रीकृष्ण, प्रभु येशु ख्रिस्त, महात्मा झोरोष्टर इत्यादि मानववंशांत जे संस्मरणीय अवतारी महात्मे होऊन गेले, त्यांच्या भावी पौरुषत्वाची दिव्य छटा त्यांच्या बालवयांतच उमटलेली दिसून येत होती, ही गोष्ट प्राचीन ग्रंथांत स्पष्ट नमूद करून ठेवण्यांत आली आहे, ही गोष्ट इतिहासशास्त्र कांही अपरिचित नाहीं

फार लांब कशाला ? प्रस्तुतचे आमचे चरित्र—नायकच पहा, ल्हानपणापासूनच त्यांच्या भावी मोठे पणाचें प्रतिबिंब त्यांच्या आचार विचारांत ठळकपणें उमटलेलें स्पष्ट दिसत होतें आठदहा वर्षांचा असतानाच

त्याच्या मायाळुपणाची व उदार वृत्तीची मधुर छटा त्याच्या मोहक चेहऱ्यावर व बालवर्तनावर चांगली उठून दिसत होती. जे जे म्हणून त्याच्याजवळ येत व त्याच्याशी बोलत, ते ते त्याच्या अर्थगर्भ गोड भाषणानें व प्रेमळ वर्तनानें मुग्ध होऊन त्याचें मोठें कौतुक करीत. अन् का नाहीं करणार ! होतेंच त्याचें वर्तन तसें गोड !

त्याचा मायाळुपणा व दयाळुपणा खरोखर मोठा वाखाणण्यासारखा होता जेवताना एखादें मांजर जवळ आलें, तर त्याला प्रेमानें 'माउ माउ' करून हाक मारून आपलें भरलेलें ताटाचें ताट तो त्याच्यापुढें सारी! खात असताना कुत्रा दिसला तर त्याला 'च्यू च्यू' करून हाक मारून आपल्या हातातील खाद्य त्याच्या पुढें धरून त्याला खाऊ घाली ! दारावरून गाय गेली तर परसात धावत जाऊन चारा आणून तिच्या तोंडात देई ! बाहेर कोणी भिकारी दिसला, तर त्याला हाक मारून, घरातून भिक्षा आणून घाली ! इतका दयाळु, इतका कनवाळु, इतका मायाळु होता तो ! तो बाळ शोरोमणी ! काय जवळ असेल नसेल, तें सर्व मुक्या जनावराना व गोरगरिबाना मोठ्या हौसेनें व प्रेमानें देऊन टाकून त्यात मोठा आनंद मानी ! घरातील माणसं काय म्हणतील याचा विचारच नव्हता त्याला ! दुसऱ्याची गरीबी-दैन्य-दारिद्र-पाहून त्याचें अंतःकरण कळवळत असे त्या तेवढ्या लहान वयातच ! गरीब रडताना पाहून त्याच्या अंतःकरणात आनंदाच्या गुदगुल्या होत व त्यानें दुःख पाहून तो फार कष्टी होई ! जसजसा तो वाढत चालला तसतशी त्याची दयार्द्रवृत्ति, मायाळुपणा, परोपकारबुद्धि वाढतच गेली ! हा त्याचा बालवयातील गोड, उदार व उमदा स्वभाव पाहून घरातीलच नव्हे तर शेजारीपाजारी व येगारेजागारे देखील त्या बालमूर्तीवर बेहद्द खुष असत, यात नवल तें काय !

( ज्ञातस्मरण २०, ४ ते ६, १० ते ११, १४ ते १६ )

तो सात आठ वर्षांचा झाला तेव्हा त्याच्या बापानें त्याच्या शिक्ष णासाठीं म्हणून '**बुरझिन कुरश**' नावाचा एक चांगला विद्वान व अनुभवी शिक्षक ठेवला तो विद्वान होता खरा. पण त्याची विद्या म्हणजे सनातन पद्धतीची अर्थात् पोपटी पळणाची व ठराविक ठशाची! तत्कालीन पद्धतीच्याबाहेर डोकावयाचेंच नाहीं! पण झोरो- ष्टर म्हणजे जसा बुद्धिमान तसाच स्वतंत्र विचाराचा विद्यार्थी! तो एक पाठी असल्यामुळें याज्ञवल्क्याप्रमाणें त्याचें शिक्षण वायुगतीनें प्रगत होत चाललें गुरुजींच्या तोंडातून पाठ बाहेर पडायचाच अव- काश, बसलाच जाऊन सरळ बुद्धींत! पुन: सांगण्याचा गुरुजींना तसदी पडतच नसे! आणि एकदां जाऊन बुद्धींत ठसून बसलेली विद्या कधीकाळीं विस्मरण पावली याचें नाव नको!

अर्थात् बुद्धींत जें काय जाऊन शिरलें व रुजलें तें जणु काहीं वज्रलेपच! या त्याच्या तीक्ष्ण व कुशाग्र बुद्धीमुळें व प्रसर- ग्रहण व स्मरणशक्तीमुळें अल्प अवकाशातच गुरुजींची विद्या-शिदोरी सगळी संपून खलास झाली! पुढें पुढें तो झोरोष्टर आपल्या चिकि- त्सक बुद्धीनें नवेनवे प्रश्न टाकून, तो गुरुजींना पदोपदीं अडवू लागला आणि त्याची समजूत करताकरता त्या गुरुजींच्या नाकी नव येत! तो बारा तेरा वर्षांचा झाला न झाला तों त्या गुरुजींचें होतें नव्हतें सर्व ज्ञान भांडार संपून ठणठणपाळें झालें!! असो

या पृथ्वीतलावर सस्मरणीय अशा ज्या काहीं महान् विभूति चमकून गेल्या, त्यांचें लोकोत्तर चरित्र खरोखर अद्भुतरम्य असेंच असल्याचें कोठे झाले तरी आढळून येतें सामान्य मनुष्याची गोष्ट त्याना बिल्कूल लागू पडत नाहीं त्याची जन्मजात दृष्टिच निराळी! विचार निराळे! आणि

धर्मनहि पण निराळेंच ! मोठेपणीं त्यानें मराठेंच काहीं निराळें ! त्याचा आचार विचार सगळा जगविलक्षण व सामान्य बुद्धीला अगम्य असाच असता आपल्या विलक्षण बुद्धिवैभवानें व विविध आचरणानें सामान्य जनतेला दिपवून, लोकांना जगज्जनक जगदीश्वराची कल्पना व ओळख अचूक करून देणारे हे चालते बोलते प्रत्यक्ष भूदेवच होत !! अज्ञान-महासागरांतले जणु काही दीपस्तंभच का म्हणाना !

फार लांब कशाला प्रस्तुत ग्रंथाचा चरित्रनायक यांचेंच उदाहरण आमच्या विधानाची सत्यता पटविण्यास पुरेसें आहे केवळ लहान वयानच-फक्त बारातेरा वर्षांचा असतानाच त्यानें दाखविलेली स्वतंत्रविचाराची व निर्भयवृत्तीची अपूर्व चुणुक त्याच्या भावीथोरपणाची स्पष्ट साक्ष देण्यास पूर्ण समर्थ आहे तो चौदाएक वर्षांचा असेल नसेल तेवढ्याशा लहान वयातच एक प्रसंग घडला तो येथें सांगितल्यास थोर महात्मे लहानपणीच कसे चमत्कार असतात, हें कोणालाहि सहज समजून येणार आहे

तो प्रसंग म्हणजे असा —झोरोष्टरचा बाप **पौरुषस्प** हा सनातन वृत्तीचा एक भोळा भाविक होता असें मागें सांगण्यात आलेंच आहे त्याच्या त्या भोळसरपणांत व भाविकवृत्तींत अद्यापपावेतों काहीच फरक झालेला नव्हता त्याची मूर्तिपूजेवर पूर्ण श्रद्धा असून शिवाय जारणमारण, मंत्रतंत्र, जादूटोणा, भुतपिशाच या गोष्टींवरहि त्याचा विश्वास होता व म्हणून त्या विद्येचे जे विश्वस्त पंडित त्यांच्यावरहि भरीव निष्ठा होती हें निराळें सांगणें नकोच

एकदा त्यानें आपल्या घरीं एक मोठी समाराधना करून, त्यात मोठमोठ्या पंडितांना व मांत्रिकांना भोजनास आमंत्रण दिलें त्याप्रसंगीं त्याचे आप्तइष्ट, स्नेहीसोबती व शेजारीपाजारी यांसहि आमंत्रण होतें. भोजनसमारंभ आटपल्यावर तत्कालीन पद्धतीप्रमाणें मंत्रविद्येचे काहीं

दार प्रयोग करून मंडळीची क्षणभर करमणूक व मनरंजन करण्यास मंत्रविद्याविशारद अशा **बर्तंदश** या करप पंडिताला त्यानें विनंती केली. व त्या पंडितानें ती मान्य करून आपले मंत्रकौशल्य त्या मंडळीपुढें दाखवून त्यांना आश्चर्यचकित करून सोडण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें तो कामास लागला. सर्व मंडळी दिवाणखान्यांत येऊन बसली व प्रयोगास प्रारंभ झाला.

इतक्यांत झोरोष्टरास बापानें ती गम्मत व तो चमत्कार पहावयास म्हणून बोलावल्यावरून तो तेथें आला. व तेथें आल्यावर त्यानें तो सर्व प्रकार पाहून तोंड आंबट करून पित्याला उद्देशून त्या सभेंत म्हणाला— पिताजी! आपण हें काय करीत आहां! या असल्या मायावी मांत्रिक विद्येला आपण महत्व व आश्रय द्यावा हें मला खरोखर कसेंसेंच दिसतें! असल्या गोष्टी मला पसंत नाहींत! या विद्येपासून कधीं कोणाचें कल्याण झालें आहे काय? नीतीला उजाळा मिळाला आहे काय? सत्यज्ञान होण्याची आशा आहे काय? सदाचारास वळण लागण्याचा संभव आहे काय? सांगा पिताजी! यांत एक तरी गोष्ट साधण्याची आशा आहे काय! मग या अशा वेगडी चमत्काराचा काय उपयोग? जनहित व जनसुख साधण्याचे हे असले खरे उपाय नव्हेत! तसें म्हटलें तर सद्विचार व सदाचरण हेंच सद्धर्माचें मंगल राजमार्ग होत! अशा गोष्टी करण्याचें सोडून देऊन, या लबाड मांत्रिकांचे दांभिक मार्ग व चेटकी विद्या यांना नसतें महत्व देऊन, अज्ञ लोकांना आडमार्गावर नेण्यास मदत करणें हें माझ्यामतें महत्पातकच आहे! त्या विद्येचा मी सर्वथैव निषेधच करतो. हा **बर्तंदश** म्हणजे माझ्या मतें महापापीच आहे! व त्याचे प्रयोग हे नरकाचें साधन आहे! त्या मांत्रिकांचा मी निषेध करतो. पिताजी! मी सत्पुरुषाला मानतो! गरीबाला मानतो! पण अशा दुष्ट व दांभिक

लोकाचा मात्र मी सर्वथैव निषेधच करतो व करणार !! या त्याच्या निर्भीड व सडेतोड भाषणानें ती सभा सगळी विस्मयचकित होऊन क्षणभर शरमेनें थिजून गेल्यासारखी झाली !

त्या लहान पोरानें त्या वयोवृद्ध मंडळींत केलेलें हें निंदाप्रचुर तिखट पण सत्य व स्पष्ट भाषण ऐकून, त्या वर्तदशाच्या काळजाला मिरच्या झोंबल्यासारखें झालें ! तो मनात फार शरमला, खवळला नि तडफडला ! एवढेसें पोर तें काय आणि तें बापाची सभेंत हुनेरी घेतें व आपला पाणउतारा करतें, म्हणजे काय ? हा वर्तदश म्हणजे काही लहानसहान प्रस्थ नव्हतें ! देशातील ख्यातनाम मंत्रविशारद ! तसाच मोठा महामहोपाध्याय ! मंत्रविद्या व तंत्रविद्या दोहीतहि सारखाच निष्णात ! पट्टीचा पंडित व सरस्वतीचा कंठमणि ! आपल्या पांडित्यावर व इभ्रतीवर त्यानें उडविलेले हे शितोडे मोठ्या थोरल्या पंडितालाहि उडविता आले नसते ! पण करणार काय ? त्याला मनस्वी राग आला त्या भाषणानें त्याला चांगलें डिवचल्यासारखें झालें ! त्याचा पारा चढला व त्या भरात त्यानें त्यास चांगलें हासडून टाकलें

तेव्हा तो झोरोष्टर शांत व गंभीरपणे त्याला म्हणाला —पंडितजी ! तुमचा राग अनाठायी आहे ! धर्माच्या नावाखाली तुमचे हे चाललेले अमंगळ चाळे व वेगडी मार्ग व ठराविक ठशाचे पढीव पांडित्य हें जनहितास सर्वथैव निरुपयोगी आहे ! पवित्र धर्माच्या नावाने मी त्याचा सर्वथैव धिक्कार करतो ! मला तुमचें पोपटी पांडित्य व मंत्रविद्या बिल्कूल पसत नाहींत ! आता तुम्ही जीभ विटाळून मला जो दोष दिलात त्याला मी मुळींच पात्र नाहीं ! उलट तो अहेर तुम्हालाच शोभतो ! त्या पायुन माझें काही एक वाकडे न होता उलट तुमचा लौकिक मात्र घसरला !

जें सत्य तेंच मी बोललो व बोलून दाखवितो, परमेश्वर कृपेने तुम्हाला त्याची लवकरच प्रचीति येईल ! असें म्हणून तो तेथून निघून चालता झाला

( दिनकर्द, ७-३-२२ ते ४२ )

---

## विश्तास्पाची करामत !

रूम शहरात विश्तास्प हा त्यावेळी 'फरुखझाद' या नावानें ओळखला जात असला, तरी आता आपणास त्याचा विश्तास्प या नावानें उल्लेख करण्यास काय हरकत आहे ? म्हणून आम्हीं त्याचा या प्रकरणात त्याच नावानें उल्लेख करतो कारण या ग्रंथात पुढें विश्तास्प हेंच नाव अधिक वळणाचें आहे लग्न झाल्यावर विश्तास्प हा नोकरीच्या भानगडींत न पडता स्वतंत्र शिकार करून त्यावर आपला रोजगार चालवू लागला

अर्थात् तो उत्तम शिकारी असल्यामुळें त्याची त्याविषयीं रूमशहरात लवकरच फार मोठी प्रसिद्धि झाली पुढें एक मनुष्य येऊन आपल्या रानात एक लांडगा फार माजला असून, तो आपणास फार त्रास देत आहे, करीता कृपाकरून आपल्याबरोबर येऊन त्यास ठार मारून आपला जाच चुकवावा अशी त्यास विनंति करू लागला विश्तास्प हा मनाचा उदार व दयाळु असल्यामुळें त्यानें त्या मनुष्याची विनंति मान्य केली व त्याच्या-बरोबर जाऊन त्या माजलेल्या मस्त लांडग्यास मोठ्या शिताफीनें पहिल्याच सपाट्यास ठार मारलें व त्या मनुष्याचा जाच चुकविला ! या औदार्यानें तर त्याची शहरात फारच वाहवा झाली

या लाडग्याच्या मागें थोडासा इतिहास होता तो असाः— ज्याच्याकरता **विस्तास्पानें** तो लाडगा मारला होता, त्याचें नाव **मिरीन** असें होतें. या **मिरीननें** **केसरजवळ** जाऊन त्याच्या दुसऱ्या मुलीची मागणी केली होती. तेव्हा केसरनें त्यास **फास्कून** रानातील धुमाकूळ घालणाऱ्या लाडग्याला मारून आणल्यास आपण त्याची इच्छा पूर्ण करू असें सांगितलें होतें. त्याप्रमाणें त्यानें विस्तास्पाचें सहाय्य घेऊन तें कार्य पार पाडलें. नंतर केसरजवळ जाऊन त्याला त्या लाडग्याचें कातडें दाखवून खात्री करून देऊन राजकन्येची मागणी केली. व केसरनें वचन दिल्याप्रमाणें आपल्या दुसऱ्या मुलीचें त्याच्याशीं लग्न करून दिलें !

यानतर पुढें कांहीं दिवसानीं **अहरेन** याच्या विनतीवरून **सकिला** डोंगरातील ( dragon ) सपक्ष सर्प मारून त्या उदार **विस्तास्पानें** त्याचेंहि कल्याण केलें. कल्याण केलें असें ह्मटलें याचें कारण पुढें त्या अहरेननें तो डोंगरातील ( dragon ) सपक्ष सर्प आपण मारला असें सांगून केसरची तिसरी मुलगी उपटली !

हें घडल्यावर पुढें एक प्रसंग असा आला कीं केसरनें मर्दानी खेळाचे सामने, शर्यती, रेस वगैरे करविण्याचें ठरवून त्याप्रमाणें देशातील सर्व प्रसिद्ध प्रसिद्ध खेळाडूंना व कलावंताना त्यात भाग घेऊन कार्यक्रम यशस्वी करण्याची विनंति केली. त्याप्रमाणें देशातील सर्व नामांकित खेळाडू रूम शहरात जमले. त्यात **विस्तास्पानेंहि** भाग घेतला होता. त्या सर्व सामन्यात व खेळात त्यानें आपले क्रीडापटुत्व व शस्त्रास्त्र नैपुण्य दाखवून सर्वांत उच्चांक मिळविला. त्याची चमक व क्रीडापटुत्व पाहून केसरला भारी आनंद झाला. व आपल्या राज्यातील सर्व लोकांना त्याचा हुकुम पाळण्याची आज्ञा केली. केसर त्याला **फरकझाद** या नावानेंच ओळखत होता. त्याची खरी हकीकत त्यास अजून माहीत नव्हती

पुढें लवकरच त्याने केसरच्या '**पल्यास**' यास खंडणी देण्यास लिहून, तसें न केल्यास त्यावर **फरुकझाद** यास त्यास पकडून आणण्याची धमकी दिली. पण **पल्यासनें** तसें करण्यास नाकारल्यावरून केसरनें ती वसूल करण्याच्या कामगिरीवर **फरुकझादची** नेमणूक करून, त्याजकडे पाठवून दिले दोघाची चकमक शडून त्यात एल्यासचा पराभव करून त्याला पकडून त्यानें केसरपुढें हजर केलें ही कामगिरी चोरव बजावल्यामुळें केसरला भारी आनद झाला व एक मोठा दरबार भरवून त्यात त्याचा त्यानें चागला गौरव केला. या विजयानें व गौरवानें फरुकझादची कीर्ती सर्वत्र पसरली

पुढें केसरनें इराणला **लोहररूपास** खडणी देण्याविषयीं पत्र लिहीलें व तें आपल्या सरदाराकडून बल्ख येथें पाठविलें व तसें करण्यास चुकल्यास फरुकझादशी गाठ आहे अशी त्यास धमकी दिली या दरम्यान **फरुकझादची** कीर्ति तेथें जाऊन पोंचली होती, शिवाय त्या सरदारानेंहि त्याची तेथील दरबारात फार तारीफ केली होती तेव्हा हा **फरुकझाद** आहे तरी कोण याविषयीं प्रत्यक्ष माहिती घेऊन येण्याविषयीं **झरीरला** रुमकडे पाठविण्यात आलें **झरीर** त्याप्रमाणें काहीं सरदार बरोबर घेऊन रुम येथें आला व केसरच्या दरबारात या **फरुकझादची** भेट घेतली

त्याला पाहताच **झरीरला** आपल्या भावाची ओळख पटली पण तो तेथें काहीं बोलला नाहीं मात्र इतकेंच तो म्हणाला कीं **लोहरस्प** खडणी देऊ इच्छित नाहीं आणि प्रसग पडल्यास आलेल्या आपत्तीला तोंड देण्यास तो तयार आहे या भाषणाने केसरला राग आला पण त्यावेळीं तो **झरीर** हा वकील या नात्यानें आला असल्यामुळें त्याचा अपमान अगर इजा न करता त्याला केसरनें तसेंच परत जाऊ दिलें.

शरीर तेथून निघून गेल्यावर फऋकझादनें इराणच्या राजाचें अखेर म्हणणें तरी काय आहे हें पुनः एकदा नीट समजून घेऊन येण्यासाठीं त्याच्या वकीलाकडे जाण्याची केसरकडून परवानगी घेऊन तो शरीराच्या मुकामात आला. तेथें आल्यावर शरीरानें त्याचें मोठ्या प्रेमानें स्वागत करून, त्यास कडकडून आलिंगन दिलें. त्यावेळीं त्या बंधुद्वयास जो आनंद झाला तो सांगून पुरवत नाहीं.

नंतर फरुकझादनें तेथें बसूनच केसरयास पत्र लिहून लोहरस्पाचा वकील आपल्याशीं सलोख्याचा तह करण्यास तयार आहे, तर आपण इकडे निघून यावें असें कळविलें. त्याप्रमाणें केसर तेथें आला. व तेथें आल्यावर फरुकझाद हा कोण, ही सारी हकीकत त्यास कळविण्यांत आली. तेव्हां फरुकझाद हा सामान्य माणूस नसून लोहरस्पाचा युवराज विदतास्प हा आहे असें त्यास समजून घेऊन त्यास आनंदाश्चर्य वाटलें. नंतर त्यानें आपली मुलगी जी कतायून तिला व जामाताला वस्त्रालंकार व इतर मौल्यवान् वस्तु नजर करून त्याचा मोठा गौरव केला.

पुढें शरीराच्या विनंतीवरून विदतास्प हा त्याच्या बरोबर सह-कुटुंब बल्खकडे निघाला. लोहरस्पानें त्याचें शहरात स्वागत करून आपली गादी त्यास मोठ्या आनंदानें सोडून दिली ! आणि असा हा विश्तास्पाच्या वनवासाचा शेवट गोड झाला ! अर्थात् युवराजाचा आता राजा विश्तास्प झाला !! ( शाहनामा ( अलेक्झांडर कृत ) P. 281 )

---

## झोरष्टरचें ओझरत कुलवृत्त

भरतखंडात जशी गंगा, प्यालस्टाइनमध्यें जशी जार्दन ,तशीच इराणात दरेज नदी होय. या नद्याचें पावित्र्य व महात्म्य त्या त्या देशातील धर्मात फार मोठें आहे. तेथील लोक त्या नद्याचें ,पवित्र नांव मोठ्या आवडीनें व भक्तिभावानें घेत असतात. कारण तशाच महत्वाचा संस्मरणीय इतिहास त्याच्या मागें निगडित झालेला आहे.

इराणात पश्चिमेकडे मिडिया देश असून, त्याच्या पश्चिमेस आझरबइजान नावाचा एक प्रसिद्ध देश होता तो अइर्यनवएजचा एक भाग होता अशी इराणी लोकाची कल्पना होती. त्या आझरबेजानात दरेजा नावाची एक प्रसिद्ध नदी वाहत असून, त्या नदीकाठीं 'उर्मिह' नावाचा एक गाव होता. तेथें प्रसिद्ध स्पितामा घराण्यातील पइतरस्प नावाचा एक खानदानीचा सुखवस्तु गृहस्थ राहत असून, त्याला **पौरुषस्प** व **आरास्प** असे दोन मुलगे होते त्यातील वडील जो **पौरुषस्प** त्याच्या पोटींच आमच्या चरित्र--नायकाचा जन्म झाला.

या चरित्रनायकाचें नाव झरथुस्त्र असें ठेवण्यात आलें. शिवाय त्याला स्पितामा झरथुष्ट्र असेंहि कोठें कोठें ह्मटलें आहे. झरथुस्त्र याचा अर्थ ज्याचा उंट म्हातारा आहे किंवा ज्याचा उंट रागीट आहे असा होता झरत् म्हणजे म्हातारा आणि उष्ट्र म्हणजे उंट या संस्कृत शब्दापासून झरथुस्त्र हा बहुव्रीहि सामासिक शब्द झाला आहे. झरथुस्त्र हें अवेस्तातील नाव असून त्याचाच ल्याटिन भाषेंत अपभ्रंश होऊन झोरोष्टर असें झालें आहे शिवाय पहलवी भाषेंत झरतुश्त असें नाव असून इतर पारशी भाषेंत 'झर्दुष्ट' 'झरदुष्ट' 'झरादुष्ट' 'झरदहोष्ट' अशीं निरनिराळीं नांवें असलेलीं आढळतात.

बाकऱ्याची नांवें ' नोतरिगा ' व ' निवातुश ' अशी होती. या सर्वांची थोडक्यात पण स्पष्ट कल्पना यावी म्हणून त्याची तीन पिढ्यांची वंशावळ खालीलप्रमाणें आहे.




झरथुश्त्राला तीन बायका होत्या असें काहींचें म्हणणें आहे व कोणी कोणी त्याला एकच बायको होती असें मत व्यक्त करतात हे मत आधुनिक पारशी विद्वानांचें आहे. त्याच्या पहिल्या दोन बायकांचें नाव कोठेंच आढळत नाहीं तिसऱ्या बायकोचें नाव हवोवी असें असून ती विश्तास्पाच्या मंत्र्याची म्हणजे फरशोस्तरची मुलगी होती ही बायकांची गोष्ट कशी जरी असली तरी त्याला तीन मुलगे व तीन मुली होत्या ही गोष्ट मात्र सर्वमान्य आहे त्यांचीं नांवें अनुक्रमें हीं अशीं आहेत १) यसद्वास्त्र २) पइतरस्प ३) उरवततुनर ४) फ्रेनी ५) खोरशेद्‌चहर व ६) थ्रीति याप्रमाणे थोडक्यात झोरोष्टरच्या घराण्याची कुळकथा आहे

---

## एकांतवास

ज्याला धर्माचें सत्य व सूक्ष्मज्ञान करून घ्यावयाचें आहे, त्याला एकांतवास पत्करणें भागच आहे आणि तें अरण्याशिवाय गिरिकंदराशिवाय सुखावह व श्रेयस्कर असें इतरत्र कोठें आढळणार ! सत्पुरुषाची व साधुपुरुषाची तपोभूमि म्हणजे हें अरण्यच ! सामान्य माणसाला अरण्याचें नाव म्हणजे भेडसावणारें व बुजविणारें आहे, ही गोष्ट खरी असली, तरी ज्याना विश्वाची बीजशक्ति शोधून काढण्याची तळमळ लागली आहे, ज्याना सृष्टीचें गूढ उकलण्याचा नाद लागला आहे व जे सत्यशोधण्याच्या मार्गास लागले आहेत, अशा सर्व महापुरुषानीं एकांतवासासाठीं हें अरण्यच गिरीकंदरवासच-पसंत केला, हें काय आजच नव्यानें सांगावयास पाहिजे !

योगीश्वर याज्ञवल्क्यानी सूर्यनारायणाची तपश्चर्या करून शुक्ल यजुर्वेद मिळविला, तो या अरण्यातच ! भगवान बुद्धदेवानीं संबोधि प्राप्त करून घेतली, ती या अरण्यातच ! विश्वामित्र झाले काय, व्यासपुत्र शुकाचार्य झाले काय या ज्ञानवीरानी व देवभक्तानी दिव्य ज्ञान प्राप्त्यर्थ एकांतवास पत्करला, तो या अरण्यातच ! प्रभु येशू ख्रिस्त झाले काय अगर हजरत महमद पैगंबर झाले काय अथवा मोसेस काय, यांना दिव्य ज्ञानाची स्फूर्ति लाभली व मधुन मधुन देवदर्शन झालें, तें या अरण्यातच ! प्राचीन वैदिक ऋषींचे प्रसिद्ध व पवित्र आश्रम यांले होते ते देखील अरण्यातच ! तपोवनातच ! सत्यशोधक तपस्व्याचें हें माहेर घरच !

अर्थात् हें अरण्य-हा गिरिकंदरवास-म्हणजे ज्ञानोपासकाची प्रत्यक्ष कामधेनु ! येथें येऊन व राहून जगातील असंख्य ज्ञानोपासकानी व देवभक्तानी तसेच साधुपुरुषानीं व संतमहंतानी आपणास काय हवें होतें, तें सर्व मिळवून आपला दुर्लभ मानव जन्म धन्य व सुफल केला

व जगाला ज्ञानदीप होऊन व श्रेष्ठ कल्याण मार्ग दाखवून, इतिहासात अजरामर होऊन गेले, ही गोष्ट जगाला मशहूर आहेच की नाही ?

याचें कारण असें की, येथील पुण्य व पवित्र स्थान स्वार्थी व लोभी मनुष्याच्या प्रापंचिक व व्यावहारिक खळबळी व दगदगीपासून अगदी अलिप्त असतें येथें नितांत शांतता व गंभीर स्तब्धता अखंड नांदत असून, नटन कुशल सृष्टि सुंदरीचें रमणीय लावण्य सर्वत्र खुलून व मोहरून राहिलेलें असतें शिवाय मग त्र देवदेवतादिकांचा शुभप्रद संचार व विहार येथें मधुन मधून चालू असतो त्याचप्रमाणें विश्वात्म्याची गूढ व सूक्ष्म शक्ति अज्ञ व अल्प अशा या जीवात्म्याशी हितगुज करावयास व त्यास अलौकिक ज्ञान व अद्भुत सामर्थ्य देऊन, सामान्य जनतेचा त्यास देव बनविण्यास सदैव तत्पर असते !

अरण्यातील गिरिशिखरावरील वास म्हणजे इहलोकातला प्रत्यक्ष स्वर्गवासच तो ! शुद्ध व स्वच्छ हवा, पवित्र व शांत वातावरण, मधुर व निर्मल उदक, निरभ्र आकाश, पीठ चांदणें, तेजस्वी तारामंडळ, गगन–चुंबित वृक्षराजि, फलपुष्पादिकांनी नटलेल्या विविध वृक्षवेली, फुलांशी मधुर क्रिडा करणारी सुंदर फुल्पाखरें, झाडावर बसून मंजुळ कूजन करणारे विविध पक्षीगण, गगनचुंबित पर्वत, पाताळाला जाऊन भिडलेल्या खोलच खोल दऱ्या, शिवाय या सर्वांना निर्माण करणाऱ्या त्या परमात्म्याचें अगाध सामर्थ्य, अनुपम कौशल्य, अपार चातुर्य, अनंत ऐश्वर्य व अचिंत्य ज्ञान इत्यादि मनाला मोहविणारें, अंतःकरणाला खुलविणारें, बुद्धीला रमविणारें तें अपूर्व सौंदर्य व आश्चर्यकारक कलाकृति पाहून, मनुष्याच्या अंतरंगात स्फुरण पावणारी आत्मज्योत आनंदानें फुलून, नागाप्रमाणें डोलणार नाही तर काय करील ?

आता त्या विश्वकर्त्या जगदीश्वराची मंगल मूर्ति मनुष्याच्या या चर्मचक्षूला प्रत्यक्ष दिसत नसली, तरी या विश्वकोशात प्रतीत होणारें त्याचें विशाल स्वरूप, अगाध सामर्थ्य, प्रचंड बुद्धिमत्ता, अलौकिक सौंदर्य, दिव्य रचना, अगाध योजना, अढळ व्यवस्था नि उदंड दक्षता इत्यादि विस्मयकारक गोष्टींचा तीक्ष्ण बुद्धीला साक्षात्कार झाला नाहीं, तर तो मग मनुष्य कसला ! साखरेची गोडी जशी सांगून समजणार नाहीं, तद्वत् त्या अनंत कोटि ब्रम्हांड नायकाचें वास्तव स्वरूप किती लिहून कसें समजावयाचें ! छे: तें शक्यच नाहीं ! ज्यानें त्यानेंच तें आपल्या कल्पनाशक्तीनें जाणलें पाहिजे !

त्याच वेळेस हेंहि सांगणें जरूर आहे की प्रपंचात रमलेल्या विषयमूढ मानवाला तें सूक्ष्म व दिव्य ज्ञान गहन व अचिंत्य असलें, तरी तेंच अरण्यात जाऊन एकांतात वास करणाऱ्या तपोनिष्ठ ज्ञानोपासकाना–ऋषि-मुनींना–योगावस्थेंत सहज स्फुरते असा ज्ञानी व तपस्वी लोकाचा गोड अनुभव आहे ! तात्पर्य विश्वात्मक परमेश्वराचें मंगल ज्ञानप्राप्तीचें एकमेव पवित्र क्षेत्र म्हणजेच हें अरण्य ! अर्थात् तेथील एकांतवास ! व अनन्य तपश्चर्या !

सृष्टिज्ञानाच्या भुकेलेला व दिव्य ज्ञानाचा तहानलेला जिज्ञासु झोरोष्टर हा तीसाव्या वर्षीच–ऐन तारुण्यभरातच–घरदार, स्त्रीपुत्र, आप्तइष्ट, स्नेहसोबती या सर्वांना सोडून या विशाल विश्वाचें स्थूल व सूक्ष्म आणि तसेंच सत्य व यथार्थ ज्ञान करून घेण्याच्या उद्देशानें एकांतवास पत्करून उशिदरेन पर्वतावर एकटाच जाऊन राहिला येथें आल्यावर त्यानें दिवसा डोंगराच्या आसपास पसरलेल्या वृक्षराजींत शिरून तेथील सृष्पदार्थांचे परीक्षण व रात्री अंतरिक्षाचें निरीक्षण करण्यास सुरवात केली तेथील झाड-वेली, फुलें-फळें, पशु-पक्षी, नदी-नाले, डोंगर-दरी, ही सृष्टीदेवतेची

सुंदर, अद्भुत, विशाल, विचित्र, व विविध रूपसौंदर्य व आकाशांतील ग्रह, नक्षत्रे, चंद्र इत्यादि पाहून व अभ्यासून त्यांच्या विचार-प्रवाहाला नवीन वळण लागत चाललें. निरीक्षक दृष्टि उजळत चालली. मन निवळत चाललें. बुद्धि सूक्ष्म व खोल, उदात्त व विशाल बनत चालली !

आणि कां नाहीं बनणार? अनन्य व उदंड ज्ञानोपासनेचा प्रभावच आहे तो! त्या डोंगराच्या आसमंतातील विविध झाडवेली, रंगीबेरंगी फुलें, नानाविध फळें, विचित्र पशुपक्षी, निरभ्र आकाशांतील ग्रहतारे, सूर्यचंद्र हे सर्व दररोज नवीन नवीन पाठ शिकविणारे त्याचे गुरुदेव बनल्यावर मग कां नाहीं मनुष्याचें अंतरंग बदलणार नि उजळणार? झाडाच्या पानावर, फुलांच्या पाकळ्यावर, पांखरांच्या पंखावर, पक्ष्यांच्या रंगावर, पर्वतांच्या शिखरावर, गवताच्या अग्रांवर, दंवाच्या बिंदूवर, जावें तेथें व पहावें तिकडे सृष्टिकर्त्याचा अदृश्य पण कुशल हात हळुवार सर्वत्र खेळत असलेला त्याच्या अंतर्दृष्टीला स्पष्ट दिसूं लागून, त्याचा अंतरात्मा त्यामानानें खुलत चालला असला तर त्यांत आश्चर्य तें काय? जागृत झालेल्या जिवात्म्यांचा तो सहज स्वभावच आहे! सूर्याच्या किरणांत, चंद्राच्या चांदण्यांत, नक्षत्राच्या लुकलुकण्यांत, वायूच्या लहरींत, विजेच्या कोरींत, मेघाच्या गर्जनेंत, पावसाच्या सरींत व सृष्टिदेवतेच्या विविध व विलक्षण वस्तु जातांत परमेश्वराचें गुप्त अस्तित्व, त्याचें अपूर्व कौशल्य व अद्भुत सामर्थ्य यांची जाणीव त्याच्या जिज्ञासु मनाला हरघडी चाटून जाऊं लागली!

पुढें पुढें तर तो त्या निर्जन प्रदेशांतच दिव्य वनश्रीच्या मनोहर परिसरांतच इतका रमला व तल्लिन झाला कीं त्यास तहान-भूक, निद्रा-विश्रांति, थंडी-ऊन, वारा-पाऊस, रात्र-दिवस यांचें देहभान राहीनासें झालें! रात्रीच्या रात्री त्यानें जागून काढल्या व दिवसाचे दिवस तहानभूक न म्हणतां घालविले! एखाद्या वस्तूवर मन वेधलें म्हणजे जवळ जवळ ती

समाधिच ! रात्रीं आकाशाकडे दृष्टि लागली म्हणजे सूर्योदय झाला तरी पत्ता नाहीं ! दिवसा सृष्टिदेवतेच्या कोठल्यारी वस्तुरूपाकडे मन मग्न झालें म्हणजे तहानभुकेचें मग तेथें नाव नाहीं ! इतका तो त्या अरण्यातील निसर्गनिरीक्षणात व परीक्षणात अहोरात्र गढून व रमून गेला ! एकांत-वासाचें मधुर फल काय तें हें ! हें सुंदर व सूक्ष्म सृष्टिज्ञान !

परमेश्वरानें परम कौशल्यानें निर्माण केलेल्या निसर्गदेवतेच्या पवित्र मंदिरात-त्या घनदाट झाडीमधल्या 'उशिदरेन' पर्वताच्या निर्जन पण रमणीय अशा मंगल एकांतवासात त्याला अपूर्व स्फूर्ति लाभून बुद्धींत दिवसेंदिवस नवचैतन्य तेजाळत चाल्ल्यास त्यात आश्चर्य नाहीं ! होय, झोरोष्टर आता पूर्वीचा झोरोष्टर-विषयमुग्ध झोरोष्टर राहिला नाहीं ! गावात, घरात, प्रपंचात, स्त्रीसहवासात, स्नेह्यासोबत्यात जें त्याला लाभलें नाहीं, तें ज्ञान, तो आनंद, ती शांति, तें समाधान, ती स्फूर्ति त्याला या निर्जन अरण्यात एकांतवासात सहज व न कळत लाभत चालली !

येथें एकांत वासात येऊन राहिल्यावर त्यानें केवळ सृष्टिनिरीक्षणातच आपला सगळा वेळ घालविला असा मात्र याचा अर्थ करावयाचा नाहीं सृष्टीचें स्वरूप, तिची वाढ व विकास व त्याबरोबरच तिचा स्वभाव, तिचे नियम, तिचा क्रम व तिचें कार्य या सर्वांचा परिचय करून घेण्यात त्याला मौज व गोडी वाटत असे ही गोष्ट खरी, पण तेवढ्यावरच समाधान मानून तो स्वस्थ बसला असा मात्र त्याचा अर्थ नव्हे त्याच्याहि पुढें जाऊन तिचा कारागीर असा कोणी तरी निराळा असला पाहिजे आणि तो जर तसा असला तर तो कोठें व कसा असावा, याचाहि शोध घेणें अर्थात त्याला ओळखणें व त्याचें दर्शन घेणें हेंहि तितकेंच अगत्याचें आहे असें त्याची मनोदेवता त्याला आतून सांगूं लागली याच हेतूनें तो कधीं अत्यंत सश्रद्धदृष्टीनें व चिकित्सक मनानें सृष्टीकडे पहात असे पण त्या सूक्ष्म

शक्तीचें—जगत्कर्त्या परमेश्वरानें—व्हावें तसें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें त्याची व्हावी तशी तृप्ति व लाभावी तशी शांति अद्याप त्याला लाभली नव्हती. मात्र परमेश्वरी सत्तेची अंधुक अंधुक झुळूक त्यास मधुन मधुन चाटून जात होती यात सत्य असलें तरी तो काही पूर्ण ज्ञानी झाला नव्हता, यात काही संशय नाहीं अर्थात या दृष्टीनें तो अजून अपूर्णच होता, याचा निराळा निर्देश करावयास नकोच.

---

## दिव्य दर्शन !

झोरोस्टर हा डोंगरावर एकांतवासात राहिला होता तरी तो सदैव तेथेंच दडी मारून होता—घराकडे मुळींच फिरकत नव्हता—असा त्याचा अर्थ नव्हे. मधुन मधुन लहर आल्यावेळीं तो घराकडेहि येत जात असे, मायबोपांशी उदार करी, व मुलाबाळांची काळजी घेई एका दृष्टीनें तो संसारीहि होता तथापि त्याची गणना प्रापंचिकांत करणें हें युक्त होणार नाहीं. त्याचा बहुतेक काळ एकान्तवासांत जात असे. याप्रमाणें त्यानें आठ दहा वर्षें घालवलीं त्या अवधींत ज्ञानांत व अनुभवांत त्याची वरीच प्रगति झाली होती. फार काय, अरण्यांतील

एकांतवासामुळें व तेथील अनुभवामुळें त्याचें समग्र जीवनचारित्र्यच पार बदलून गेलें होतें, असें म्हटल्यास त्यात अतिशयोक्ति होणार नाहीं, अर्थात् तो आता पूर्वींचा प्रापंचिक व जागतिक विषयरत झोरोष्टर राहिला नसून ज्ञानी व तपस्वी महर्षि बनला होता !

आता त्याची एकांतवासाची दहा वर्षें संपली होती वसंतसंपातचा सण जवळ आल्यामुळें त्यानिमित्त घरीं जाण्याची त्याला इच्छा झाली म्हणून तो घराकडे निघाला वाटेंत त्यास काहीं सोबती भेटले त्यासह तो घराची वाट सुधारत असता वाटेंत त्यास समुद्र लागला तो ओलांडून गेल्याशिवाय पुढील पायवाट लागण्यासारखी नव्हती तो तरून जाणें दुर्घट असल्यामुळें जवळपास होडीचा तपास चालविला पण ती काहीं कोठें आढळली नाहीं मग आता ? परतून दुसऱ्या वाटेनें जावें तर वेळेवर घरीं पोचणें शक्य नव्हतें थोडावेळ काठावरच उभारून डोळे झाकून विचार करीत असता चमत्कार असा झाला कीं त्या समुद्रावर पाणी गोठून पुलासारखा रस्ता तयार झाल्याचें त्यास दिसलें त्यावर एक पाय ठेवून पाहतो तों ठणक जमीनच झाली होती ती ! त्यावरून तो चालत जाऊन पुढें अइर्यन वएजकडे निघाला हा जो समुद्रावरचा चमत्कार झाला तसाच चमत्कार झालेला आपल्या ऋग्वेदातहि आढळून येतो सुदास राज्याच्या यज्ञातील दक्षिणा व इतर पुरोहित भाग गाडीवर लादून विश्वामित्र ह्वाविपाश व सतलज नदीवर आल्यावेळीं त्या नद्यानी त्याचा रस्ता अडविला होता पुढें विश्वामित्रानीं प्रार्थना केल्यावर त्यानी त्यास नम्र होऊन पायवाट करून दिली त्याचप्रमाणें वसुदेवानें कृष्णाला गोकुळाकडे नेत असता तुडुंबवाहणाऱ्या यमुनेनेहि त्यास पात्रातून जाण्यास पायरस्ता करून दिला या पुराणातील गोष्टी तर असोत, भगवान बुद्ध झाले तरी

गगा तरून गेलेच कीं नाही ? आणि प्रभु येशू ख्रिस्त तरी काय, तेहि पायानी समुद्रावरून चालतच गेले कीं ! अशी उदाहरणें सर्व धर्मांत कमी अधिक आढळतातच मग झोरोष्टरच्या या गोष्टीवरच गैरविश्वास का करा ? परमेश्वराच्या मनात आलें तर काय वाटेलते होऊ शकते ! ही गोष्ट आम्हा भारतीयाना तरी पूर्ण पटून गेली आहे असो

आता येथून **झोरोष्टरच्या** अलौकिक व अद्भुत चरित्रास प्रारभ झाला, असें म्हटल्यास हरकत नाहीं असो तो इराणी पचागाप्रमाणें अशविहिष्ट महिन्याचा पधरावा दिवस अर्थात् मे महिन्याची पधरावी तारीख प्रख्यात **दाइति** नदीचें पवित्र तीर त्या नदीला चार फाटे असून त्यांपैकी **'अध्वताक'** फाट्याचा तो पवित्र काठ आणि अगदी पहाटेची वेळ अशा प्रसन्न व प्रशात सुप्रभात समयीं उठून त्या नदीच्या पात्रात उतरून सोमरस तयार करण्यासाठीं म्हणून तेथून पाणी घेऊन परत येत असता त्याला एका तेजस्वी आकृतीचा अधुक अधुक असा भास झाल्यासारखा झाला ! ती मनुष्याकृति असून दक्षिणेकडून त्याच्याकडे येत असलेली त्याला दिसली !

**झोरोष्टरनें** प्रथम तिकडे द्यावे तितकें लक्ष दिलें नाहीं तो काही तरी भास असला पाहिजे अशानर तिकडे कानाडोळा करून तो आपली पुढची वाट चालू लागला पुढें जाता जाता त्या **दाइति** नदीचा चौथा फाटा की जो **अरिकदानुष्द** या नावानें प्रसिद्ध होता, त्या फाट्याजवळ आला तेव्हा ती आकृति स्पष्ट दिसू लागून तिचें देवदूतात रूपातर झालें ! तो देवदूत मनुष्याच्या नऊपट उच असून मोठा भव्य, देखणा व अत्यत तेजस्वी होता ! ती अपूर्व भव्य मूर्ति पाहून तो मनात प्रथम जरा दचकला

त्या दिव्य विभुधार्ने–देवदूतानें–ही त्याची घाबरट वृत्ति पाहून सौम्य व गोड आवाजात त्यास म्हणाला झोरोष्टर ( झरथुष्ट्र ) ! मला पाहून तू म्यालास काय ! पण तसें घाबरण्याचें कारण नाहीं तुला ! त्या परम श्रेष्ठ अहुरमज्द परमेश्वराकडून मी तुझ्याकडे आलो असून, त्याचा मी प्रतिनिधि –दिव्य दूत–आहे तुला तिकडे घेऊन येण्याची मला आज्ञा झाली असून त्यासाठीं मी येथें आलो आहे मग तुला आता भिण्याचें कारण काय ? ती सर्व भीती आता टाकून दे आणि मजबरोबर स्वर्गास चल ! पण हें सागतो कीं तुला हें शरीर बरोबर घेऊन तेथें येता येणार नाहीं म्हणून हें इथेंच ठेवून तुला सूक्ष्म देहासह आलें पाहिजे तुझा सूक्ष्म देह तेवढा मजबरोबर येऊ दे ! मी त्याला अहुरमज्दजवळ घेऊन जातो ! असें तो दिव्य पुरुष बोलतो न बोलतो तों त्या **झोरोष्टरास** गाढ समाधि लागली !

तो दिव्य पुरुष म्हणजे देवदूत असून, अहुरमज्दचा प्रमुख प्रतिनिधि **'वोहुमनो'** हा होय हें आमच्या भारतीय भाषेंत सागावयाचें म्हणजे सद्विचाराचा–पवित्र ज्ञानाचा–तो अधिदेव होय ! झोरोष्टर धर्मांत याचें महत्व फार आहे अहुरमज्दचे विश्वावर सत्ता चालविणारे व देखरेख करणारे असे सहा अधिकारी असून, त्यात हा वोहुमनो सर्वांतला प्रथम व प्रमुख अधिकारी होय या 'वोहुमनो' बरोबर झोरोष्टर आता लिंगदेहानें स्वर्गाकडे गेला. ( झात स्परम २१, ४—८ )

अहुर मज्दचें निवासस्थान म्हणजे स्वर्ग ! सकल सौंदर्याचें व सकल वैभवाचें दिव्य निधान ! जिकडे तिकडे ऐश्वर्यच ऐश्वर्य ! व सौंदर्यच सौंदर्य ! पहावें तेथें चकचकाट नि झगझगाट ! सर्व सुखाचें, सर्व ज्ञानाचें, सर्व शक्तीचें, सर्व आनंदाचें, सर्व संपत्तीचें, सर्व सौंदर्याचें, सर्व शांतीचें, सर्व तृप्तीचें तें महा व मूळपीठ ! ! तो अहुरमज्दचा स्वर्ग ! तेथील वर्णन आम्ही अल्प मानवानी काय करावें ! नि किती करावें ? तें व्यासाच्या

लेखणीला व ब्रम्हदेवाच्या वाणीलासुद्धा भारी आहे! मग आमची बापडी लेखणी तेथें *लुडबुडून काय दिवे लावणार!!* अर्थात् *नुसत्या* कल्पनेवरच ती तहान भागविली पाहिजे! त्याशिवाय दुसरा मार्ग नाही.

देवदूत म्हणजे जसा सद्विचाराचा अधिपति तसाच तो सकल प्राणिमात्राचा संरक्षणार्कर्ता होय अहुरमज्दनिर्मित सकल जीवजातांचें संरक्षण, संवर्धन व संपोषण करण्याची-अर्थात् त्याची काळजीपूर्वक जोपासना करण्याची-कामगिरी याचेकडे सोंपविण्यात आली असून जगातील प्राणिमात्राचा तो संरक्षक असा मुख्य अधिकारी आहे अर्थात् या **वोहुमनो** व झोरोष्टर याची जी भेट झाली या भेटींत सकल प्राणिमात्राची काळजीपूर्वक जोपासना करण्याचा त्यानें झोरोष्टरास उपदेश केला अर्थात् ही जी भेट झाली ती क्यास्पियन समुद्राच्या दक्षिण भागात अल्बुर्झ पर्वतावर-घडून आली या भेटींत मनुष्याला पशूचा- विशेषत अश्वगवादि ग्राम्य पशूचा-जीवन-सौकर्यात किती उपयोग आहे व त्यांचें संरक्षण करण्यात मनुष्याचें हित व कल्याण किती व कसें आहे, या संबधी संपूर्ण ज्ञान देऊन तो तेथून निघून गेला

याचा परिणाम असा झाला कीं झोरोष्टरास पशुसृष्टीचें-विशेषत ग्राम्य पशूचें-महत्व कळून येऊन, त्यानें पुढें आपल्या धर्मात गाय, बैल, घोडे इत्यादि उपयुक्त पशूचे काळजीपूर्वक संपोषण व संवर्धन करणें हें झोरोष्टरी गृहस्थाचें एक प्रमुख कर्तव्य होय, असा नियम करून ठेविला आणि आपण स्वत जिवत असेतोपर्यंत त्यानें हा नियम चोख पाळून इतरास धडा घालून दिला तात्पर्य या दिव्य साक्षात्काराची फलश्रुति म्हणजे त्यास पशूचें पूर्ण ज्ञान होऊन, त्याचें महत्व काय व किती आहे हें चांगलें कळून आलें

ही घटना घडून आल्यावर पुढें कांहीं दिवसानी त्यास पुन तसाच आणखी एक साक्षात्कार घडून आला यावेळेस त्यास जो देवदूत भेटला तो वोहुमनो हा नसून, अहुरमज्दचा दुसरा जो **'अशावहिस्त'** नावाना

होता, त्याची व या झोरोष्टरची भेट झाली या भेटीत **अशावहिस्तने** अग्नीचें महत्व व उपयुक्तता याचें शास्त्रशुद्ध ज्ञान देऊन, त्या अग्निनारायणाची नित्य सेवा व जोपासना काळजीपूर्वक करण्याचा उपदेश केला ही भेट कास्पियन समुद्राच्या दक्षिणेस **टोजन** नदीच्या पूर्वेस झाली '**अशावहिस्त**' हा देवदूत अग्नीचा अधिष्ठाता प्रतिनिधि असल्यामुळें त्यानें अग्नीचें महत्व झोरोष्टरास पटवून देऊन त्याची दैनदिन उपासना करणें ही झोरोष्टर धर्मातील मुख्य बाब म्हणून निर्बंध करणेचा सल्ला दिला हें यथायोग्यच झालें

पहिला जो साक्षात्कार झाला त्यात अहुर मझ्दच्या अतर्क्य दिव्य ज्ञानाची व त्याच्या अद्भुत व अचिंत्य शक्तीची साक्ष पटून झोरोष्टरची भक्ती व श्रद्धा त्या जगदीश्वरावर दृढ व स्थिर बनून तेव्हा पासून तो त्या प्रभुरायाचा अनन्य भक्त झाला अर्थात् अहुरमझ्द त्याची उपास्य देवता बनला दुसऱ्या साक्षात्कारात **वोहुमनो** कडून सद्विचारांचें महत्व व सुपरिणाम व त्याच प्रमाणें पशुपालनाची महति व आवश्यकता हें त्यास कळून आलें तिसऱ्या साक्षात्कारात **अशवहीस्त** याजकडून अग्नीचें महत्व व प्रभाव याचें सम्यग्ज्ञान होऊन झोरोष्टरच्या आचार विचारात आमूलाग्र यारेपालट झाला अशवहिस्त विश्वधर्मरूप असून विश्वाची उत्पत्ति स्थिति व लय करीं होते हे त्याच्या स्तिकवणींत सांगितलें आहे अर्थात् हा अशवहिस्त म्हणजे आम्हा हिंदूचा हा प्रत्यक्ष सूर्यनारायणच ! व झोरोष्टर धर्मात जी ईश्वराची नामावळी आहे त्यात अशवहिस्त याचा क्रमांक चौथा आहे आणि अग्नि हा प्रत्यक्ष सूर्याचा भूमीवरला प्रतीक असल्यामुळें तो अहुरमझ्दचा प्रतिनिधि आहे असो या अशवहिस्ताच्या भेटीमुळे त्याला शास्त्रीय ज्ञानाची नवी दृष्टी लाभली, नवे विचार सुचले नवें ज्ञान स्फुरलें व नवा धर्म दिसला

तथापि तो तेवढ्यावरच पूर्ण ज्ञानी झाला, असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. अद्याप त्यास सर्व सृष्टिज्ञानाचें संपूर्ण ज्ञान झालें नव्हतें. झालेल्या साक्षात्कारा संबधानें विचार करीत काल कंठीत असता पुढें काही दिवसानीं त्याला आणखी एक म्हणजे देव दूताचा तिसरा साक्षात्कार झाला. अहुरमझ्दचा तिसरा प्रतिनिधि जो **क्षत्रवइर्य** याची व त्याची गाठ पडली या भेटींत क्षत्रवइर्य यांनं झोरोष्ट्रास खनिज धातूचें काळजीपुर्वक रक्षण करण्याचा उपदेश दिला. कारण तो सर्व धातूचा अधिष्ठाता अधिकारी होता. या त्याच्या उपदेशानें त्याला धातूचें महत्व व उपयुक्तता हीं कळून आली. या भेटीला ' **सराई** ' ची भेट असें म्हणतात.

( झातस्परम, २२–८ व जाकसन कृत झोरोष्टर, )

हा साक्षात्कार झाल्यावर पुढें काही काल लोटल्यावर अहुरमझ्दचा चौथा प्रतिनिधि स्पेंटा **अरमायिति** याची व झोरोष्टरची गाठ पडली आणि तो चौथा साक्षात्कार **अस्नवत** पर्वता पासून निघणाऱ्या एका नदीकाठावर झाला. ही लहान नदी असून पुढें ती **दइति** नदीस जाऊन मिळते, ( झात स्परम ४–९ )

सद्भावा व शेवटचा साक्षात्कार हा 'अमेरेतात्' या अहुरमझ्दच्या सद्भाव्या प्रतिनिधीकडून झाला. तो वनस्पतीचा मुख्य अधिकारी असून त्यानें झोरोस्टरला वनस्पतीवर्गाचें-म्हणजे वृक्षलतादिकांचें व धान्यादि कृषीचें—उत्तम ज्ञान करून दिलें म्हणून झोरोस्टरनें आपल्या धर्मात कृषिकर्माला श्रेष्ठस्थान दिलें आहे हा साक्षात्कार एकाच ठिकाणी झाला नसून 'दरोजा' नदीवर पण निरनिराळ्या स्थळीं झाला ही 'दरोजा' नदी झोरोस्टर घराण्याची कुलनदी असें समजण्यात येतें

(ज्ञातस्परम २२-१२, जाक्सन कृत झोरोस्टर)

याप्रमाणें हे सातहि साक्षात्कार वेगवेगळ्या ठिकाणीं व वेगवेगळ्या प्रसंगी पण सर्वहि वेगवेगळ्या हिवाळ्यातच झाले या सर्व साक्षात्कारास एकंदर दहा वर्षांचा काळ लागला आणि त्या साक्षात्कारापासून झोरोस्टरला या जगाचें, परलोकाचें, सद्धर्माचें, मानवी कर्तव्याचे, सृष्टीच्या गूढ शक्तीचें, पञ्चमहाभूताच्या सूक्ष्म व्यापाराचें व इतर अनेक विषयाचें संपूर्ण ज्ञान होऊन तो पूर्णप्रज्ञ बनला व अहुरमझ्दचा प्रेषित म्हणून जगाला नवीन धर्मोपदेश करण्याची पात्रता व योग्यता त्याच्यात आली शिवाय अहुरमझ्दकडून काही अलौकिक दिव्य शक्तिहि त्यास लाभून जगद्गुरु म्हणविण्याची पात्रताहि त्याच्यात आली त्याची दीर्घकालीन तपश्चर्या आता संपली व नवयुगास प्रारंभ झाला. यावेळीं त्याचं वय चाळीस वर्षांचें होतें

---

## कलिपुरुषाचा कुटिल डाव !

झोरोष्टरची तपश्चर्या आता पूर्ण झाली ! परम मंगल अहुरमझ्दचें पवित्र दर्शन घडून, तो धन्य व कृतकृत्य झाला ! लोकोद्धारक नवीन धर्मसंस्थापनेची पूर्ण तयारी सिद्ध झाली ! ज्ञानोपासनेचा साधनकाल संपला, सत्यज्ञानाची तहान शमन पावली, बुद्धींत अवेस्ताधर्माचा नवीन प्रकाश उजळला, मन उत्साहभरित होऊन प्रसन्न झालें ! अंतःकरण ज्ञानगंगेत बुडून पवित्र झालें, मझ्दधर्माचा लोकांत फिरून प्रसार करण्याचा दिव्य संदेशहि पदरी पडला ! अर्थात् त्याचा एकांतवास आता संपून, प्रपंच सुखार्थ धडपडणाऱ्या व्यावहारिक जगांत उडी मारण्याचा काळ समीपला व अज्ञानांत बुडून दुःखांत धडपडणाऱ्या जगाचा उद्धार करण्याची तळमळ लागून जगदुद्धारार्थ तो आता आपल्या घराकडे निघाला.

हा सर्व प्रकार इकडे चालला असतां दुसरीकडे निराळीच घटना घडत होती धर्म द्वेष्टया पापी खलपुरुषाचें तें कुटिल कारस्थान होतें ! ज्ञानाचा शत्रु व सज्जनाचा वैरी असा जो राक्षसाग्रणी अंग्रमइन्यु त्याची ही कथा आहे. महात्मा झोरोष्टर हा अहुरमझ्दकडून पवित्र ज्ञान संपादन करून, त्याचा जगांत प्रसार करण्यास निघाला आहे हें पाहून, त्या दुष्ट राक्षसाच्या पोटांत तिडीक उत्पन्न झाली ! त्याला अमंगल विचार सुचूं लागले ! आपल्या पोळीवर पडणारें तूप महात्मा झोरोष्टर लाटविणार या विचारानें त्याच्या मनानें भडका घेतला ! आपली शमरी आता लवकरच भरणार याची कडवट स्वप्नें त्यास तेव्हा पासूनच पडूं लागली ! त्याची शांति ढळली व मन अस्वस्थ बनलें कसेंहि करून झोरोष्टरला आता जगांतून हलविला पाहिजे, हा विचार उसळी मारून त्याला सारखा बेचैन करूं लागला, अर्थात् त्याची झोंप गेली व अन्न तुटलें !

या गोष्टीचा काहीं तरी निकाल लावला पाहिजे अशा विचारानें त्यानें आपल्या राक्षसगणाची एक सभा बोलाविली त्या सभेंत सर्वानुमतें असें ठरविण्यात आलें कीं झोरोष्टरास आता अधिक वेळ न घालविता शक्य तितक्या लवकर ठार मारण्यात यावें ! आणि त्याप्रमाणें त्या कामगिरीवर **बूइयास** नावाच्या एका बलाढ्य मायावी राक्षसाची नेमणूक करण्यात यावी ! हा झोरोष्टर धर्मातला **बूइयास** ह्मणजे हिंदूधर्मातला प्रत्यक्ष मृत्युराजच ! मनुष्याचा कर्दनकाळ यमच का ह्मणाना !

याप्रमाणें त्या **बुइयासाची** झोरोष्टरला ठार मारण्याच्या कामगिरीवर नेमणूक झाल्यावर त्या महाराक्षसानें आनंदाची एक मोठी डरकाळी फोडली व मोठ्या आवेशानें तेथून निघून, आरोळ्या ठोकीत त्याच्यावर धावून आला त्याची तशी खात्रीच होती कीं आता आपण लवकरच त्याची चटणी करू ! हा हा म्हणता अहुरमझ्दच्या चेल्याचा फडशा पाडू ! पण खरे सांगावयाचें म्हणजे त्या राक्षसाचा तो भ्रम होता ! झोरोष्टरची योग्यता व सामर्थ्य याची त्याला नीटशी कल्पना नव्हती तो एक मनुष्यासारखा मनुष्य आहे या विचारावर तो गेला आणि अखेर बिचारा सपशेल फसला !

तो बुइयास राक्षस आपल्यावर चालून येत आहे हें त्या ज्ञाणाश्च महात्म्यानें वेळीच ताडलें व आपल्या बचावाची सिद्धता केली तो राक्षस धावत येऊन आपल्यावर आता झडप घालणार इतक्यात त्यानें '**अहुन वइर्य**' या महामंत्राचें पठण करण्यास सुरवात केली दाहती नदीच्या पवित्र पान्याचें पूजन करून अहुरमझ्दच्या अवेस्ताग्रंथातील दिव्य मंत्राचा मुखावाटें उच्च घोष चालविला त्या मंत्राचा घोष ऐकून त्या राक्षसाच्या छातींत धस्स झालें ! व अंत करणात आग भडकली ! !

राक्षस ही जात अशी की ती जगातलि कसल्याहि शक्तीला दाद देणारी नव्हे पचमहाभूताना देखील ती भारीच आहे ! पण याच वेळी हेंहि सागितलें पाहिजे कीं दैवीशक्तीनें स्फुरणाऱ्या दिव्य मत्राच्या अमोघ शक्तीपुढे मात्र त्याची मात्रा चालण्यासारखी नाही ! तेथें त्याना नागी टाकावीच लागते ! आपल्या वेदातहि असे मत्र आहेत त्या मत्रोच्चारानेच राक्षस पळून जातात अशी भावना आहे तसाच प्रकार झोरोष्टर धर्मातहि आढळतो तो अहुन वइर्याचा प्रभावी मत्रोच्चार त्या प्रबल मायावी राक्षसाच्या कानीं पडताच त्याच्यावर मोठ्या दगडाचा प्रहार होऊन तो मर्मी लागल्याचा त्यास भास झाला त्याला त्यापासून मरणान्तिक वेदना होऊ लागल्या ! तो घाबरला, दचकला आणि पुढें न येता जागच्या जागींच खिळून राहिला ! महात्मा झोरोष्टरची त्यावेळची ती धीरगभीर प्रखर मुद्रा पाहून त्याची छाती पार दडपून गेली ! व एक मोठी कर्कश किंकाळी फोडून भीतीनें थरथर कापत मागचा पाय मागे घेऊन, हें यमराज तेथून पसार झाले !

पुढे तो घाबरट स्थितीतच त्या **अग्रमइन्यु** जवळ धावत येऊन त्यास म्हणाला-- हे अग्रमइन्यो ! माफ कर ! बाबा ! माफ कर ! तुझी कामगिरी मजकडून तडीस नेणें शक्य नाही ! काय सागू बाबा ! त्या महात्म्याचा प्रभाव ! त्याचें तें तेज, तो मत्र, ती मुद्रा, तो महिमा, सगळेंच काही विलक्षण ! मी तर तसा मनुष्य पाहिलाच नाही ! त्याचा प्रभाव एवढा दाडगा आहे कीं माझे तर तेथें पायच लटपटले ! भारी आहे **स्पतामा झोरोष्टर तो** ! दिसायला मनुष्य दिसतो पण पराक्रमात कर्दन काळ ! खरच सागतो तुला कीं त्याला वस मारावे, वरान मारावे याची मला भ्रातच पडली ! छे ! ती गोष्ट बोलूच नकोस ! माझातर

उपाय चकला ! मजकडून ती गोष्ट आता होणें नाहीं ! मग तुझा मार्ग तू पहा ! असें ह्मणून तो तेथून चालता झाला.

नंतर तो **अंग्रमइन्यु** आपली राक्षस सेना बरोबर घेऊन झोरोष्टरचा समाचार घेण्यास ह्मणून तो स्वत.च त्याच्याकडे निघाला आणि त्याच्या जवळ आल्यावर त्याला उद्देशून ह्मणाला—झोरोष्टरा ! किती झालास तरी तू मनुष्यच आहेस, हें विसरू नकोस. आज्ञा राक्षसाची सर तुला येणें शक्य नाहीं ! मानव आईबापाच्या पोटीं जन्मलेला मनुष्य-मग तो केवढाहि बलशाली असो, केवढाहि पराक्रमी असो,-आम्हापुढें तो काहींच नव्हे ! आमच्यापुढें तुमचा टिकाव लागणें शक्य नाहीं ! अरे ! सिंहाशीं भुज थाटून कोंकरानें कधीकाळीं जय मिळविला आहे काय !

**झोरोष्टर** — तें सगळं झालं. पण तुझं म्हणणं काय ?

**अंग्रमइन्यु** — ऐकशील ? मी तुझ्या हिताचीच गोष्ट सागतो. ऐक आणि जन्माचा सुखी हो !

**झोरोष्टर** — ती कोणती ? कोणती गोष्ट सागणार तू मला मुखाची ?

**अंग्रमइन्यु** — दुसरी कसली ? तुझं कल्याण करावं, तुला सुखात ठेवाव, वैभवात घोळवाव, विलासात लोळवावं, असें माझ्या मनात पुष्कळ आहे.

**झोरोष्टर**— मग अडचण कसली ?

**आंग्र मइन्यु**- तुला माहीतच आहे तुझा बाप पौरुषस्प मला मानतो.

**झोरोष्टर** – पुढें मग ?

**आंग्र मइन्यु**— तुझी आई दोग्दो देखील मला चाहून घेते.

**झोरोष्टर—** असेल दुसऱ्याच उदाहरण मला नको मी काय कराव म्हणतोस ते साग

**अंग्रमइन्यु—** तसं काही फार नाहीं फक्त इतकेंच कीं अहुरमझ्दचा धर्म तेवढा टाकून दे ! त्याचा नाद सोड ! मी तुला मोठा भाग्यवान करीन ! सुखविलासात सारखा गुरत ठेवीन ! पैशाचा पर्वत आणून उभा करीन फार काय सर्व जगाचे राज्य देईन ! आणि काय मागशील तें देईन ! पण अहुरमझ्दचा धर्म तेवढा टाकून दे ! अवेस्ताचें नावहि घेऊ नकोस ! बाबा, ही असली नवीनवी सोंग इथेत कशाला ? त्यात सुख नाहीं, हित नाहीं, कल्याण नाहीं, नि सौभाग्य नाहीं ! मग करशील का तस ?

**झोरोष्टर–** हेंच का सागणार तू मला ! एवढ्याच करता का आलास तू इथ ? आता तुला खरं-खुर सागतो कीं, प्राण गेला तरी पत्करल पण अहुरमझ्दचा धर्म कालत्रयीहि सोडणार नाहीं !

**अग्रमइन्यु–** तस ह्मणू नकोस, झोरोष्टरा ! तस ह्मणू नकोस ! ऐक माझी गोष्ट आणि शहाणा हो ! त्या मझ्दकडून तुला काय मिळणार आहे ? आम्ही देऊ तस तो थोडच देणार आहे ! ह्मणून ह्मणतो कीं, त्या अहुरमझ्दचा नाद सोडून दे ! आणि माझा उपदेश ऐक !

**झोरोष्टर–** ती गोष्टच बोलू नकोस तू ! अग्रमइन्यो ! तो विचार सुद्धा मनात आणू नकोस ! फार काय, तुझी संपत्ति, वैभव, विलास हे तर राहोतच, हा माझा गळा कापून खाली ठेवला अगर माझे हातपाय छाटले गेले किंवा हालहाल करून माझ्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात आले, तरीसुद्धा मी डगमगणार नाहीं ! सत्यधर्माचें रक्षण-पवित्र धर्माचा प्रसार-अहुरमझ्दचा दिव्य व तेजस्वी आदेश लोकहितार्थ व लोकसुखार्थ मी माझ्या

प्राणाचें मोल देऊनहि तडीस नेईन! त्या नगनायकाच्या सेवेंत हा देह सतत झिजवीत राहीन व सत्यधर्मप्रसारार्थ काय वाटेल तें सोशीन! समजलास ? एवढ्याच करता इथ आला असशील तर हे दुष्ट अग्रमइन्यो! जा! येथून चालता हो! मुकाट्यानें पाय उचल कसा!

**अग्रमइन्यु**- काय करशील तू माझं? अज्ञान मी भिईन अस का तू समजतोस ? मी कोण हें तू समजला नाहींस अजून! माझें सामर्थ्य, माझा पराक्रम, माझा प्रभाव तू पाहिला नाहींस अजून! अरे मी तुम्हा मानवाचा कर्दन काळ आहे! मी सबळ्यो म्हणजे पुढें उभें राहण्याची मनुष्याची छाति नाहीं! त्रैलोक्य हलवून सोडणारा हा अग्रमइन्यु आहे! तुझ्या पोकळ धाकधमकीला भीक घालणारा हा अग्रमइन्यु नव्हे! काय करशील रे तू माझं ?

**झोरोस्टर**- काय करशील? (एक पाऊल पुढें सरकून) हें माझ्या हातात काय आहे, ते पहा! हा दगड—हा धराएवढा दगड पहा! हा मी स्वर्गातून आणला आहे! तो दिसायला दगड दिसला तरी त्याचा प्रभाव मोठा दाडगा आहे! अहुरमझ्दचा प्रभाव काय आहे, हें दाखवि ण्याचें हें एक दिव्य अस्त्र आहे! लक्ष्यात ठेव याच्या एकच तडाख्यानें तुझी चटणी होईल! (त्या राक्षस गणाकडे बोट करून) ही जी राक्षस-चमू तुझ्यामागें उभी आहे, तिचा एकाच मारानें फन्ना उडून जाईल! तसाच माझा 'अहुनवइर्य' महामंत्र! तो उच्चारताच तुमचें सर्व शरीर आगीनें पेट घेईल! व तुमच्या अंत करणात एकच प्रचंड भडका उठेल। हे अग्रमइन्यो! तू पापी चांडाळ आहेस! दुष्ट व नीच आहेस! माझ्या शुद्ध व पवित्र देहाला—अहुरमझ्दच्या प्रेषिताला—हात लावण्याची तुझी किम्मत व हिम्मत नाहीं!' असें म्हणून तो हातातील दगड राक्षसावर 'अहुन वइर्य' मंत्र म्हणत फेकण्यासाठी म्हणून वर उचलला त्याचें त्या

वेळचें तें गभीर स्वरूप पाहून व तें तेजस्वी भाषण ऐकून त्या अंग्र-मइन्यूनरोबर आलेली ती राक्षस मडळी घाबरून रडत ओरडत, किंकाळ्या फोडीत तेथून सैरावैरा धावत सुटली ! तेंव्हापासून त्याना त्या झोरोष्टरची कायमची धडकीच बसली ! !

आपल्या राक्षसगणाची ती धादल व धावपळ आणि झोरोष्टरच्या हातातील तो तेजस्वी दगड पाहून अंग्रमइन्यूहि घाबरला व आपली पुढें घडगत नाहीं असें पाहून, हात वर करून त्यास म्हणाला आवर ! आवर ! महात्मा झोरोष्टरा ! आवर आपला हात तो अहुन वइर्य मंत्र म्हणून आम्हा लोकावर तो धगधगीत व जळजळीत दगड फेकू नकोस तुझी योग्यता, तुझा महिमा, तुझा प्रभाव आम्ही ओळखला ! मी पुष्कळ शूरवीर मोठे पराक्रमी माणसें पाहिलीं आहेत ! पण तुझ्यासारखा धीर गभीर, ज्ञानी व तेजस्वी पुण्यात्मा व महात्मा आतापर्यंत मला भेटला नाही ! मी या वेळेपर्यंत कोणालाच दाद दिली नाही ! इतकेंच नव्हे, तर सर्वांना माझ्या तडाख्या खालून जीत केले आहे ! पण मला रजसि आण-ण्यास तूच एकटा समर्थ भेटलास ! खरोखर ! तू महापुरुष आहेस धर्मात्मा आहेस ! पुण्यात्मा आहेस ! अरे तू मला दगडानें मारल्येस की तो माझ्या वर्मी जाऊन लागला ! तो तुझा अहुन वइर्य मंत्र सारखा माझ्या देहाचा दाह करीत आहे ! मी आता येथून जातो ! पुन: तुझ्या वाटेस येणार नाहीं ! असें म्हणून त्या दगडाच्या मारानें विव्हळ होऊन कण्हत कण्हत तो तेथून निघून गेला

निघडणार नाहीं उपनिषत्कालीन उदाहरण घ्यावयाचें म्हणजे नचिकेताचें देता येईल तो इंद्राच्या घरीं अतिथि होऊन गेल्यावेळीं इंद्राजवळ त्यानें अमरविद्या मागितली पण इंद्राला तें नको होतें अगर त्याची परीक्षा पहावयाची होती, म्हणून जागतिक सुखाची नानातऱ्हेची सुखसाधनें त्याच्यापुढें करून अमर विद्येचा नाद सोडून देण्यास त्यानें त्यास सांगितलें मार्कंडेयाचें आयुष्य, कुबेराची संपत्ति, त्रैलोक्याचें राज्य, सौंदर्यश्रेष्ठ अप्सरांचा मधुर सहवास शिवाय आणखी नानातऱ्हेचे सुखविलास, असा अनेक सुंदर मानवी सुख साधनांचें आमिष दाखवून त्याला अमरविद्येचा नाद व आग्रह सोडून देण्याविषयीं परोपरीनें सांगून पाहिलें पण त्या पठ्ठ्या नचिकेताच्या सत्याग्रहापुढें इंद्राला शेवटीं हात टेकणें भाग पडलें ! पुराणकालीन उदाहरण म्हणजे व्यासपुत्र शुकाचें त्याला तपश्चर्येपासून भ्रष्ट करण्यासाठीं म्हणून स्वर्गातील सौंदर्यश्रेष्ठ रंभा उर्वशी सारख्या दिव्यांगनाची त्याच्यासभोंवती सारखी करण्यात आली होती पण शुक तिकडे डोळे उघडून पाहील तर ! त्या अप्सरांचें दिव्य लावण्य व मधुर शृंगारचेष्टा त्याला तपोभ्रष्ट करू शकल्या नाहींत ! त्यानंतरचें उदाहरण म्हणजे भगवान गौतम बुद्धाचें त्यानाहि मतापासून भ्रष्ट करण्यासाठीं मारानें परोपरीनें हलवून पाहिलें पण त्याचा काही उपयोग झाला नाहीं ! बुद्ध हे अखेरपर्यंत बुद्धच राहिले ! महात्मा झोरोष्टर–वरहि तोच प्रयोग करून पाहण्यात आला आणि त्याची कथा नुकतीच वर आलीच आहे त्यानंतर प्रभु यशू ख्रिस्ताची गोष्ट त्यासहि सैतानानें येऊन गाठलेंच ! पण तोहि त्या येशूच्या खंबीर निर्धारापुढें मान वाकवून आंबट तोंड करून निघून गेलाच ! अशीं अनेक उदाहरणें सत्पुरुषाच्या मननीय चरित्रात मधून मधून आढळतात हे असले प्रसंग म्हणजे त्यांची ती एक सत्वपरीक्षाच का म्हणाना !

---

## धर्म - प्रचार

तपश्चर्येचा प्रभाव काही और आहे ! परमेश्वरी प्रसादाचा महिमा तसाच काही अगाध आहे ! सत्यज्ञानाचें - आत्मज्ञानाचें दिव्य तेजहि काहीं अपूर्व आहे ! तें बोलून दाखविता येत नाही किंवा लिहून सांगता येत नाहीं ! असाच काहीसा विलक्षण प्रकार आहे तो ! त्या तपश्चर्येचा नि दिव्य ज्ञानाचा ! असाच प्रकार आता अहुरमज्दच्या प्रेषित - महात्मा झोरोअस्टर--याच्या बाबतहि झाला सर्वज्ञ व सर्व शक्तिमान अहुर मज्दचें प्रत्यक्ष मंगल दर्शन घेऊन, त्याचा दिव्य वरप्रसाद मिळविल्यावर त्याची दीर्घ तपश्चर्या - वीस वर्षांची अखंड ज्ञानोपासना- पूर्ण व सफल होऊन, त्या ज्ञानाचा जगात प्रचार व प्रसार करण्यासाठी म्हणून उत्साहपूर्ण मनानें व प्रसन्न अंतःकरणानें तो आता घराकडे परतला

घरीं आल्यावर त्याला पाहून त्याच्या आप्तइष्टाना व स्नेहीसोबत्याना मोठा आनंद झाला आणि त्याच वेळेस त्याच्या चेहऱ्यात व वर्तनात झालेला विलक्षण फरक पाहून आश्चर्यहि वाटले

आधींच मोहक चेहरा ! तशात प्रखर तपश्चर्येचें नेत्रात चमकणारे दिव्य तेज ! आणि परमेश्वरी अनुग्रहानें मुद्रेवर विलसणारी मधुर प्रसन्नता ! मग तो अधिकच आकर्षक व मनोहर दिसू लागला, यात आश्चर्य काय ! त्याच्या चेहऱ्यावर आता अशी काही अवर्णनीय कांति चमकत होती, कीं ती डोळ्याला दिसत असली तरी तोंडाने सांगता येत नसे ! अंतःकरणात आत्मसाक्षात्काराचा मधुर प्रकाश खुलल्यामुळे त्याच्या पाणीदार नेत्रात एक प्रकारची लोहचुंबक शक्ति चकाकत होती ! त्याच्या मंगल दृष्टींत प्रेम मुसमुसत होते, भाषणात माधुर्य व वर्तनात सौजन्य रसरसत होते

यामुळें जो तो त्याच्या दर्शनानें प्रहर्षित होऊन, त्याचें प्रेमादरपूर्वक स्वागत व कौतुकच करी ! त्याचा शांत स्वभाव, मधुर भाषण, सात्विक वृत्ति, प्रसन्न चेहरा, विनम्र वर्तन, उदात्त विचार, पवित्र आचरण, परोपकारबुद्धि इत्यादि पाहून लोकांच्या मनांत त्याच्याविषयी प्रेमादराचा पान्हा फुटला असला तर त्यात आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. सत्पुरुष दर्शनाचा महिमाच आहे तो !

ते लोक आता आपापसातच कुजबुजू लागले कीं स्पीतामा शरीरानें तो हाच असला तरी तो आता पूर्वीचा राहिला नसून काहीं निराळाच झाला आहे ! आपल्यातलाच असला तरी आपल्याहून निराळाच दिसतो आहे तो ! खचित खचित तो आपल्याहून श्रेष्ठ आहे ! आपण सर्व सामान्य माणसे आहोत, पण तो म्हणजे मोठा महात्मा आहे ! महा ज्ञानी आहे ! थोर संत आहे ! व पूज्य विभूति आहे ! फार काय, तो देवदूत आहे ! नव्हे प्रत्यक्ष देवच आहे ! अशा प्रकारची भावना, प्रेम व आदर त्याच्याविषयीं लोकांत फार लवकर अंकुरून तो एक आदरणीय व अनुकरणीय सत्पुरुष होऊन बसला !

तपश्चर्येवरून परत आल्यावर आपल्या नवीन ज्ञानाचा व अनुभवाचा पुढें लवकरच उपदेश करण्यास त्यानें हळुहळू सुरवात केली, व त्याचें भाषण ऐकण्यास लोकहि मोठ्या आस्थेनें त्याच्या सभोंवती जमू लागले. त्याच्या मधुर वाणीतून स्रवणाऱ्या ज्ञानामृताची त्यांना चटक लागून, दिवसेंदिवस श्रोतृसमुदाय फुगत व फुलत चालला. जसजसा तो आपुलकीनें गोड शब्दांत सुंदर उपदेश करू लागला तसतशी लोकांची श्रद्धा व भक्ति त्याच्यावर अधिकाअधिक बसत जाऊन हा कुणीतरी थोर महात्मा आहे, श्रेष्ठ महापुरुष आहे, असा त्याचा ग्रह बनत चालला. लोक त्याला हळुहळू मानू लागले. त्याच्याविषयीं आदरभाव दाखवू लागले, त्याचें

प्रवचन मोठ्या भक्तीने ऐकू लागले अर्थात् थोडक्याच दिवसात त्याचा जम बसत जाऊन, आपला धर्म लवकरच लोकमान्य होईल असा आत्म-विश्वास त्याच्यात अकुरू लागला

तो लोकाना प्रवचनात उघडच्च सागे की, आपण प्रत्यक्ष अहुरमझ्दच्या आशेवरून हें कार्य हाती घेतलें असून, त्या देवानेंच आपणाला हें सत्यज्ञान-धर्मज्ञान-मगलज्ञान-उपदेशिलें आहे व त्याच्या प्रेरणेनेंच आपण हें पवित्र ज्ञान-हा धर्मोपदेश-लोकहितार्थ व लोकोद्धारार्थ करीत आहो यात आपला स्वार्थ अगर लोभ नाहीं या आपल्या धर्मोपदेशानें जनता अज्ञानातून जागृत होऊन, सत्यज्ञानाच्या दिव्य प्रकाशात यावी व आपल उदड हित व कल्याण साधून घेऊन दुर्लभ मानव जन्म कृतार्थ करावा, असा माझ्या अहुरमझ्द प्रभूचा उदार उद्देश आहे तो अहुरमझ्द म्हणजे सर्वाहून मोठा असून तो सर्वज्ञ व सर्वशक्तिमान आहे ! तसाच सर्वव्यापी व सर्वसाक्षी असून, पुन सर्वमगल व सर्वदयावन आहे !

त्याकाळीं इराणातला धर्म म्हणजे निव्वळ बाह्य अवडबर होऊन बसला होता टिळाटोपीमाळातच म्हणजे बाह्य आचार विचारातच धर्माचें सारसर्वस्व भरून राहिलें होतें अधश्रद्धा व पुराणप्रियता हीं पराकाष्ठेस जाऊन पोंचली होतीं मूर्तिपूजेचें बंड फार बोकाळलें असून मनतत्र, जादू-टोणा, भूतविद्याच्च यावर लोकाचा भारी विश्वास होता अर्थात् ज्ञान-किरणाला त्यावेळी कोठें ह्मणून कोठें सुद्धा वाव नव्हता हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सागावयाचें म्हणजे सत्याला किंमत नव्हती नीतीची चाड नव्हती न्यायाची ओळख नव्हती ज्ञानाची आवड नव्हती व दानधर्माची जाणीव नव्हती ! दया, विश्वप्रेम, परोपकार, औदार्य, लोकसेवा, अहिंसा याचा तर पत्ताच नव्हता ! असा अधश्रद्धेचा, स्वार्थवृत्तीचा, ज्ञानपराङ्मुखतेचा तो चालता काळ होता ! अर्थात जवळ जवळ तें अंध कारयुगच म्हटलें

तरी चालेल ! जनता सगळी अर्धवट व अनाडी होती, हें निराळें सांगणे नकोच

**झोरोष्टरने** या सर्व गोष्टींवर जाराचा हल्ला चढवून, धर्माचें खरें अधिष्ठान हें मूर्तिपूजेंत व बाह्यवेषात नसून, अंतःकरण शुद्धीवर, उच्च मनोवृत्तीवर व सत्यज्ञानावर अवलंबून आहे, असें तो लोकांस स्पष्ट सांगू लागला जो खरा ज्ञानी तोच खरा देवभक्त ! त्यालाच देव पावतो व जवळ करतो ! श्रद्धाहीन व ज्ञानशून्य पूजा-पुरस्कारापेक्षा, भक्तिपूर्वक त्याचें साधें चिंतन हें अधिक लाभदायक असून, तें परमेश्वराला फार फार आवडतें !

अहुरमज्द देवाचा असा आदेश आहे कीं, धर्माचें अधिष्ठान हें सदाचरण, सत्प्रवृत्ति, सद्विचार व सम्यग्ज्ञान यावर असून, त्याची फलश्रुति म्हणजे शाश्वत सुखप्राप्ति व आनंदमग्नमुक्ति ही होय ! अहुरमज्दची उपासना ही पवित्र ज्ञानात व आत्मशुद्धींत गर्भित असून त्यातच मनुष्याचें ऐहिक हित व पारलौकिक कल्याण आहे ! आणि स्वर्गप्राप्तीचा खरा मार्ग काय तो फक्त एका अवेस्ता ग्रंथातच सांगितला असून, इतर धर्मांतील मार्ग हे खरे मार्ग नव्हेत ! त्यापासून सुख व शांति लाभणें नाहीं ! मूर्ति-पूजेनें व बाह्य अवडंबरानें मनुष्याचें खरें आत्महित साधणार नाहीं व त्याला शाश्वत सुख समाधान लाभणार नाहीं ! म्हणून ज्ञानगर्भ व अंतःशुद्धिकारक अशा अहुरमज्द कथित सत्यधर्माचा सदुपदेश करून लोकांत त्याचा प्रसार करावा, एतदर्थ त्या दीनवत्सल सर्वदयाघन, सर्वज्ञ अहुरमज्द प्रभूनें मला आपला प्रेषित करून तुह्मामध्यें पाठवून दिलें आहे व तो त्याचा सत्य व पवित्र धर्म या माझ्या अवेस्ता ग्रंथात प्रकाशित करून ठेविला आहे त्याप्रमाणें जो वागेल त्याचें निरंतर कल्याण होऊन, त्याचा मानवजन्म सार्थकी लागेल ! अशा ठशाचा उपदेश करीत तो आपल्या जन्मभूमींत म्हणजे मिडीया देशात गावोगाव हिंडू फिरू लागला

त्याचें प्रवचन ऐकावयास सर्व प्रकारचे लोक येत असत. त्यांत भाविकहि असत, सूज्ञहि असत, चिकित्सकहि असत व कांहीं कांहीं टारगट व कुचेष्टेखोरहि असत. या त्याच्या उपदेशाचा परिणाम निरनिराळ्या लोकांवर निरनिराळा होत असे. जे भाविक व श्रद्धालु होते, त्यांच्या मनावर चांगला ठसा उमटून ते झोरोष्टरला महात्मा मानूं लागले. जे सूज्ञ होते ते त्याच्या उपदेशातील विषयांवर सहानुभूतिपूर्वक विचार करूं लागले. व त्याच्या धर्माकडे सहानुभूतीनें पाहूं लागले. पण मुख्य गोष्ट सांगावयाची म्हणजे अशी की तेथें जो श्रोतृवृंद जमत होता त्यांतील बहुतेकांची मनें त्याच्या उपदेशानें उजळून व निवळून, अवेस्ता धर्माविषयी त्यांचा ग्रह अनुकूल बनत चालला होता.

पण त्यांत कांहीं थोडे असे विलंदर होते कीं त्यांच्यावर त्याच्या उपदेशाचा कांहींच परिणाम होत नसे. हे लोक ह्मणजे कट्टर सनातनी होत ! ते त्याच्या प्रवचनास येत असत. ते जिज्ञासेमुळें नसून, फक्त त्याचे दोष अगर व्यंग पाहण्यासाठीं ह्मणून ! त्याची धर्ममतें काय आहेत, तीं आपल्या धर्मविचाराला कितपत जुळती अगर सुसंगत आहेत, तीं परंपरेला पोषक आहेत कां मारक आहेत, हें पडताळून पाहण्याच्या इरादानें ते तेथें येत असत. महात्मा झोरोष्टराविषयीं त्यांची श्रद्धाहि नव्हती व आदरहि नव्हता ! प्रेमहि नव्हतें व चांगला ग्रहहि नव्हता ! उलट त्याच्याविषयीं तिरस्कार बुद्धि व मत्सरभाव हीं मात्र आंतून भक्कम भरलीं होतीं ! !

## संघर्षण

महात्मा **झोरोष्टराचा** जम व बोलबाला लोकांत जसजसा बसत व वाढत चालला, तसतसें या सनातनी लोकांच्या पोटांत दुखूं लागलें. जनता त्याचा उपदेश ऐकून त्याच्याकडे वळत झुकत चोलली, हें पाहून

जुन्या पंडिताची मनें अस्वस्थ होत चालली ! त्याच्या गोड उपदेशाला भुद्न लोक त्याच्या आहारी जात चालले, हें दृश्य त्याना सहन होईना ! आता स्वस्थ बसल्यास रोग वाढीस लागून पुढें प्राणावर येऊन बेतेल, तर आतापासूनच त्याला काहीतरी तोड काढून त्याचा वेळींच प्रतिकार करावा, असा आपापसात विचार करून त्यानीं त्याप्रमाणें आपलें पुढील धोरण आखण्यास सुरवात केली

प्रथम त्यानी सौम्य उपाय ह्मणून त्याच्याविषयीं लोकात गैरसमज पसरविण्याचा घाट घातला त्याचें भाषण ऐकून घेऊन, त्याचा कमीअधिक विपर्यास करून, तें आपल्या स्नेह्यासोबत्यात व आश्रित लोकात प्रसार करण्यास त्यानी प्रारंभ केला त्याच्याविषयी नाहीं नाहीं त्या कड्या पिकवून त्याचा लौकिक खची करण्याचा व वजन उखडून काढण्याचा क्रम चालविला पण अशा अर्धवट व मुळमुळीत उपायानें झोरोष्टरचें तेज व महति कमी होण्याचें काही लक्षण दिसेना उलट जनताच त्याच्यावर घसरून पडण्याचा रंग दिसू लागला झोरोष्टरचा उपदेश या सनातनी लोकाच्या अगदी वर्मी जाऊन भिडत असल्यामुळें तो त्याना कडवट व वावडा वाटावा व तसा वाढू लागला, हें स्वाभाविकच आहे अर्थात् यामुळें त्याच्या मुखातून मधुन मधून रागाचे व द्वेषाचे फूत्कारहि बाहेर पडू लागले, यातहि काही आश्चर्य नाहीं इतकेंच नव्हे, तर त्याच्या विरुद्ध जोराची आघाडी उघडण्याचें त्यानीं आता मनावर घेतलें

कडक उपाय योजण्यापूर्वी प्रथम झोरोष्टरास भेटून सामोपचारानें आपल्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न करून, तेवढ्यावर काम भागतें की काय हें अजमावून पहाण्याचें त्यानी प्रथम ठरविलें व एतदर्थ त्यास चारचौघात बोलावून घेवून बऱ्या शद्वात नवीन धर्माचा नाद सोडून देण्यास व सनातनी पंडितावर शितोडे न उडविण्यास सागून, त्याचें मन

आपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न चालविला. त्याच्या नवीन धर्माच्या व नवीन विचाराच्या उपदेशामुळें सामान्य जनतेची भाविक मनें चलनिचल होऊन, देशातील शांति बिघडण्याचा संभव असल्यामुळें झोरोष्टरनें तो घातुक मार्ग सोडून देऊन सांप्रत आहे त्या सनातनी धर्माचीच तळी उचलून धरावी व री ओढावी असे त्याला परोपरीनें विनवून सांगितलें व त्याबद्दल त्याला चांगले आमिषहि दाखविलें मधुन मधुन प्रसंगोपात् त्याच्या नवधर्मावर वादविवाद करून साधल्यास त्यात त्याला चिमट्यात धरावें, असा डावहि टाकून पाहिला

पण झोरोष्टरच्या प्रभावी ज्ञानतेजापुढें व युक्तिसिद्ध विचारसरणीपुढें त्याचें तेज फिकें पडून त्याची विचाराची बाजू घसरतच जाऊं लागली ! यामुळें त्याचे जनात हसें होऊन, जनमनातून त्याच्या आदरास ओहटी लागत चालली । वादक्षेत्रात झोरोष्टरापुढें आपला निभाव लागत नाहीं व लोकात हसे होऊन गैरसमज मात्र पसरत जातो, ही जाणीव पुढें त्यास होत जाऊन, येता येता पुढें त्यानी त्याच्याशी वादक्षेत्रात ध्वज धाल्ण्याचा नाद अजीबात सोडून दिला ! शिवाय आपल्या सामोपचाराच्या भूमिकेनें झोरोष्टरचा निर्धार ढळण्याचा संभव नाहीं, हेंहि त्याना कळून चुकलें

अवेस्ताच्या धर्मोपदेशकापुढें आपलें काहीं चालण्यासारखें नाहीं व टिकण्यासारखेंहि नाहीं, हें जेन्दों त्यास स्पष्ट समजून चुकलें, तेव्हा त्यानी सामोपचाराची भाषा सोडून त्याच्या विरुद्ध सनातनी आघाडी उघडून देशभर चळवळ चालवून, त्यास रजीस आणण्याचा मार्ग स्वीकारला अर्थात् त्यानीहि आता सनातन धर्माची फळी उभी करून, तद्द्वारा देशात चळवळ चालविण्याचा उपक्रम चालू केला ठिकठिकाणी सनातनी प्रवक्ते पाठवून तद्द्वारा आपली सनातनी बाजू रंगवून व सजवून

सागण्यास सुरवात करून, लोकांची त्यावरील निष्ठा दळणार नाही व श्रद्धा चळणार नाहीं, अशी व्यवस्था जारीनें अमलात आणली भोतृ वदाच्या मनावर झोरोष्टराच्या उपदेशापासून झालेला पथ्यकर परिणाम खरवडून काढण्याचा व सनातन धर्मावरील प्रेम भक्ति दृढ व स्थिर करण्याचा एकच सपाटा चालविला।

आपल्या पूर्वजांचा धर्म किती चागला आहे, मूर्तिपूजा किती सुदर व कशी प्रभावी आहे, मन तेथें कसें व किती रमतें, जुने सस्कार किती महत्वाचे आहेत, यज्ञविधि कसे उपकारक आहेत, परपरागत चाली रूढी कशा हितकर व सुखकर आहेत, इत्यादि गोष्टी आता लोकापुढें भडक रगात रगवून त्या धर्माला धक्का पोंचल्यास व हानि झाल्यास देशावर मागेपुढें सकट गुदरून लोकांची मेधा उडून सर्वत्र आबाळ होण्याचा कसा सभव आहे, याचें भडक चित्र त्यांच्यापुढें माडून त्याना वठणीवर आणण्याची मोहीम चालविली त्याचप्रमाणें व त्याबरोबरच आपले मंतंत्र कसे प्रभावी आहेत, भूतपिशाचें कशीं घालवू शकतो, स्वप्नाचा अर्थ व फलश्रुति व पुढील भविष्य किती समर्पक व अचूक सागू शकतो, लोकांची लागलेली दृष्ट कशी काढतो, ग्रहांचे सुष्ट दुष्ट परिणाम अचूक जाणून त्यांतील अनिष्टपणा कसा घालवू शकतो, आणि या सर्व गोष्टी सनातन धर्मातच कशा शक्य आहेत, इत्यादि खऱ्याखोट्या गोष्टी तिखटमीठ लाऊन, भरमसाट फुगवून सागून, भोळ्या जनतेची भाविक मनोवृत्ति पुन सनातन धर्मालाच चिकटून व कवटाळून राहील, अशा प्रकारची योजना अमलात आणण्याचे जारीनें प्रयत्न सुरू करण्यात आले

इकडे झोरोष्टरहि काही कमी अवधानी नव्हता सनातनी लोक आपल्या पश्चात् आपल्या धर्माचा व शिकवणीचा भलताच विपर्यास करून व आपल्यावर नसते आरोप लादून व शिंतोडे उडवून लोकांची मनें गढूळ

करू पहात आहेत, ही गुणगुण त्यांच्या कानावर गेली. तेव्हा त्या दुष्ट व दांभिक सनातन्यांची त्यास मनस्वी चीड आली मग आता काय ? त्यानेंहि त्या दांभिक पंडितावर 'जशास तसे' या न्यायानें आपलें तीक्ष्ण हत्यार उपसलें ! या उप्पर त्यांची गय केल्यास आतापर्यंत केलेलें आपलें सगळेंच फसणार नि निसटणार, हा विचार मनात येऊन त्यानेंहि 'खटासि खटनट' या धोरणाला धरून त्यांच्यावर आता कठोर प्रहार करण्याचा चंग बांधला

तसें पाहू गेल्यास महात्मा झोरोष्टर हा तेजस्वीवृत्तीचा बाणेदार धर्मात्मा होता त्याची मानसिक ठेवण वैदिक आर्यांच्या धाटासारखीच होती, हें निवार सत्य आहे त्यानें आता 'ये यथा मां प्रपद्यते तांस्तथैव भजाम्यहम्' या भगवान श्रीकृष्ण वचनाच्या प्रभावी व्यावहारिक तत्त्वा-प्रमाणें आपली दिशा आखून, आत्मरक्षणार्थ योग्य उपायाची दक्षता घेतली, यात काही वावगें झालें असें ह्मणता येणार नाहीं

या सनातनी लोकांचे मुख्य सूत्रधारक ह्मणजे कवि व करप पंडित होत हे पट्टर सनातनी तर खरेंच ! पण तसेच मोठे कारस्थानी व पाताळयंत्री लोक ! त्यांना सत्याची चाड नव्हती कीं जनाची भीति नव्हती ! न्याय ह्मणजे त्यांना बावडा व नीति ह्मणजे कपाळतिडीक ! मन पहावें तर अगदी बुजरें आणि बुद्धि अगदीच उथळ ! स्वभाव मत्सरी व वर्तणूक धरखोडीची ! मग त्यांनी आपला कार्यभाग साधण्यास वाटेल त्या भल्याबुऱ्या मार्गांचा अवलंब करण्याचें मनात आणल्यास त्यात नवल तें काय ?

सत्याला धाब्यावर बसवून, नीतीला गचांडी देऊन, न्यायाला हद्दपार करून, जनलज्जेला खुंटीला टांगून हे लोक आपला बुरसट धर्म व पावळट भावना यांचें ढोलगें वाजवून, बिचाऱ्या साध्या भोळ्या जनतेची

फसवणूक व नागवणूक करतात, हें पाहून महात्मा झोरोष्टरचें अंत करण तिळतिळ तुटू लागलें पण त्या महतापुढें त्याचा काही इलाज चालण्या-सारखा नव्हता

आणि ही जनता म्हणजे तरी काय ? शुद्ध मेंढराची जात ! त्याना कोणीहि हाकावें व कोणीहि चक्खावें ! त्याच्यावर कोणीहि हुकमत चालवावी व काहीहि लादावें ! बिचारी साधी भोळी जात ! कुणीहि हाकली तरी निघालीच त्याच्या बरोबर ! आघोचा मोदक जो कोणी पुढें धरील, त्याच्या मागून निघालीच सरळ ! मग तो खाटिक का असेना ! तो नाहीं विचार तिला ! त्या साध्याभोळ्या जनतेला ! असाच प्रकार आता तेथेंहि झाला

लोकाना सत्यज्ञानाचा निस्पृहपणें व निर्भयपणें स्पष्ट उपदेश करून, त्याना सत्पथावर आणून त्याचें उदंड हित व कल्याण करू पहाणारा महात्मा **झोरोष्टर** व श्रद्धेचा फाजील फायदा घेऊन त्याना अज्ञानाच्या व अन-र्थाच्या खोल दरींत लोटून आपली तुबडी भरणारे स्वार्थी सनातनी पंडित, यातील तारतम्य न कळल्यामुळें, त्या निस्पृह व कनवाळू महात्म्यापेक्षा त्या स्वार्थी व लोभी पडिताकडेच त्याचा कल अधिक झुकता व झुकावा यात काही नवल नाहीं हा भोळ्या जनतचा भेंगळ स्वभावच आहे ! तेव्हा काय नि आता काय, कोठेंहि व केव्हाहि अनुभव हा सर्वत्र सार-खाच ! असो

हे सनातनी लोक जसजसे **झोरोष्टरावर** घसरून व उलटून पडू लागले, तसतसें त्यानींहि आपली बाजू सभाळण्याकरिता त्याच्यावर कठोर व निर्भीड हल्ला चढवून, त्याचे दोष व बिंग वेशीवर टागण्यास सुरवात केली ' हे कवि व करप पडित म्हणजे डोळे असूनहि आधळे व कान असूनहि बहिरे ! त्याना सत्य दिसत नाहीं व नीति पटत नाहीं ! अंधश्रद्धेनें

बहकलेले व स्वार्थानें पिसाळलेले असे मूर्ख व लोभी दुर्जन आहेत हे! स्वतःची तुंबडी भरण्याकरितां दुसऱ्यांना अज्ञान गर्तेंत खिचपत टाकण्यास ते मागेपुढे पहाणारे नव्हेत! त्यांचें अंतःकरण शुद्ध नाहीं! मन पवित्र नाहीं! बुद्धि सोज्वळ नाहीं! आचरण सरळ नाहीं! त्यांचा धर्म खोटा! देवहि खोटा! नि भावहि खोटा!! अशा भोंदूंच्या मार्गी लागणारे दुःखाच्या डोहाकडे सरळ चालले आहेत असें खुशाल समजावे!" असे व अशाप्रकारचे सडेतोड विचार निर्भयपणें व निर्भीडपणें लोकांपुढे मांडून, सनातन्यांची वेगडी बाजू उखडून काढण्याचा त्यानेंहि उपक्रम चालू केला!

झोरोष्टर आपली, आपल्या धर्माची, आपल्या देवाची निंदा-नालस्ती करतो, हें पाहून त्या पंडित लोकांचें डोकें आतां ठिकाणावरून उठलें! त्यांचा ताळ व तोल सुटत चालला! आपल्या प्राचीन देव धर्माची व परंपरागत पूर्वजांच्या चाली रूढींची टिंगल व टवाळी करतो, मान्य व पूज्य शास्त्रीपंडितांचा पाणउतारा व पूजा अर्चा-विधीचा उपहास करून राष्ट्रांत बसलेली समाजघडी विस्कटू पाहतो, अशी हाकाटी उठवून, त्यास वेळींच सक्रिय विरोध करण्यास लोकांना चिथावण्याची आपल्या हस्तकांस फूस दिली! इतकेंच नव्हे तर आपलें सर्व वजन खर्च करून तेथें तेथें हुकमत चालविणाऱ्या लहानथोर सत्ताधिकाऱ्यांना गाठून त्या त्या गांवी झोरोष्टर आल्यास त्याला तेथें तेथें थारा न मिळेल, अशी तजवीज करण्याविषयीं भीड घालण्यांत आली!!

## सनातन्यांची प्रतिक्रिया

या कवि व करप पंडितांनीं आपल्या सनातन धर्माच्या संरक्षणार्थ महात्मा झोरोष्टरावर प्रचंड काहूर उठवून, त्यावर घसरून व तुटून पडण्याचें कुतंत्र जारीनें अमलांत आणण्याची खटपट व लटपट चालविली होती, तरी जनता मात्र तितकी अजून तयार झाली

नव्हती. झोरोष्टरावर अद्याप लोकांची भक्ति व निष्ठा कमी न होता, पूर्वी प्रमाणेंच अढळ होती. सनातन्यानी पुष्कळ डावपेंच घातले व अनेक लटपटी केल्या. पण लोकाचें त्याच्या विषयीं मन कलुषित व्हावें तसें व तितकें होईना. उलट त्याचीं प्रवचनें, त्याचा उपदेश व त्याची विचारसरणी ऐकून व पाहून, ते मनातून त्यालाच दुवा देत ! मात्र इतकें कीं त्या सनातन्याना उघड विरोध करण्याचें अगर उलट बोलण्याचें धाडस त्याच्यात नव्हतें ! तथापि सनातन्याच्या कुतत्राल चळी पडून, झोरोष्टरला दूर करण्याची व त्याला डिवच्चयाची दुष्ट कल्पना मात्र त्यास सहसा शिवली नाहीं.

याचें कारण असे होतें कीं झोरोष्टरचा स्वभाव अगदी शात, साधा व सीधा होता. दुसरें असें की त्याच्या त्या तेजस्वी चेहऱ्यामध्ये अशी काय एक लोहचुंबक शक्ति चमकत होती कीं, त्याचें दर्शन होताच लोकाचें मन तिकडे आपोआप आकर्षिलें जाई ! तशात तो बोलू लागला म्हणजे तर काय पूसूच नये ! त्याच्या मधुर वाणीतून सुदर विचाराचे मधुर फवारे एकामागून एक असे सारखे थयथयाट करू लागून, श्रोतृवृदाचीं मनें जेथल्यातेथें गारेगार होऊन जात ! मागे कधी ऐकले नव्हते असे नवीन विचार, नवीन कल्पना, नवीन युक्तिवाद, नवीन शब्दयोजना, व नवीन माहिती त्याच्या भाषणात इतकी ओथबलेली असें कीं, त्याच्या प्रवचनाला सनातन्याच्या विरोधाला व निषेधाला न जुमानता व त्याच्या डरकाळ्याना भीक न घालता गुळावर जशा माशा जमतात, तशी लोकाची गर्दी त्याचें प्रवचन ऐकावयास जमत असे ! त्याची अवेस्ताग्रथातील ज्ञानपर प्रवचनें ऐकून, श्रोत्याना आनद व हर्ष याच्या सारख्या गुदगुल्या होत असत !

इतका आवडला होता त्याचा सदुपदेश त्याना ! त्या भाविक श्रोतृवृंदाना ! त्या उपदेशात सत्य, ज्ञान व भावना या त्रिवेणीचा मधुर संगम झाल्यामुळें त्या रसाळ प्रवचनाला अपूर्व रंग चढे, हें निराळें सागण्याची आवश्यकताच नाहीं अर्थात् ही अशी अपूर्व संधि मग ते जिज्ञासु व भाविक लोक वाया दवडतील, हें कसें शक्य आहे ? दिवस जसजसे लोटत चालले तसतसा श्रोतृवृंदाचा लोंढा व ओढा महात्मा झोरोस्टरकडे फुगत व पसरतच चालला !

आता सनातन्याना मोठा प्रश्न येऊन पडला झोरोस्टरचा हा उत्कर्ष त्याना पहावेना ! व त्याचें वाढतें वजन व लोकप्रियता त्यास सहन होईना ! काहींहि करून त्याला आता आळा घातलाच पाहिजे—खालीं ओढलेंच पाहिजे हा विचार त्याच्यात जोरानें उसळी मारून, त्याना स्वस्थ बसू देईना. नुसत्या निषेध प्रदर्शनानें, उपदेशानें अगर शाब्दिक चळवळीनें आपला हेतु आता साधण्यासारखा नाहीं, असें जेव्हा त्याच्या प्रत्ययास आलें, तेव्हा त्यानी अधिक कडक उपाय योजण्याचें मनावर घेतलें. प्रथम प्रथम त्यानीं कडक उपाय योजण्याच्या पूर्वीं पुन एकवार सौम्य शब्दात इशारा देऊन, **झोरोस्टरच्या** प्रवचनास न जाण्याचा व त्याच्या नादीं न लागण्याचा प्रयत्न करून पाहिला पण तो यशस्वी होण्याचें लक्षण नारगळल्यामुळें, पुढें कडक उपाय योजनेची त्यानी तयारी चालविली

अर्थात् हे सनातनी करप व कवि पडित लोक समाजातील मोठे प्रतिष्ठावत व वजनदार लोक असून, सामान्य जनता त्याना नमून व वचकून असे. बहुजनसमाज अजून त्याच्या वर्चस्वाखालींच होता सरकारात व दरबारात त्याचें वजन चागलें असून, अधिकारी वर्ग त्याच्या शब्दात वागणारा होता या सर्वांचा फायदा घेऊन त्यानीं आता झोरोस्टराकडे जाणाऱ्या णाऱ्याना दमदाटी व धाकदपटशा देण्यास प्रारभ केला ! त्याच्यावर नजर

ठेवून, त्यांना वाटेंत गाठून बऱ्या बोलाने धठणीवर न आल्यास नसत्या संकटाला बळी पाडण्याची त्याना दटावणी देण्यात येऊं लागली ! नसती किटाळें उत्पन्न करून त्यात त्यास गोवून त्रास देणेचा व व्यवहारात अड-विणेचा उपक्रम करण्यात आला ! कोठें कोठें सरकार दरबारहि होऊं घातले ! आणि अखेर इतक्यावरहि भागेनासें झालें म्हणजे बहिष्काराचें ब्रम्हास्त्र त्यावर रोखून धरण्यापर्यंत मजल जाऊन पोंचली ! आप्तइष्टाचें व स्नेही सोबत्याचें दडपण आणून त्याच्याद्वारे त्याची नाकेबंदी करण्यात आली ! कोठे भीड घालून, कोठें भीति दाखवून, कोठें सोटा उगारून, कोठें सरकार दरबार करून, कोठें बहिष्कार पुकारून, कोठें घरगुती तर कोठें व्यवहारात अडथळे व पेचप्रसग निर्माण करून, याप्रमाणें कोणता ना कोणता तरी उपाय योजून, लोकाना अडविणेचा व ज्योतीरावापासून परावृत्त करणेचा जोराचा प्रयत्न करण्यात आला. आणि ही युक्ति मात्र त्याना अखेर फलदायक ठरली !

आता मात्र सनातन्याची मात्रा लागू पडत चालली. जे लोक ज्योती-रावचें प्रवचन ऐकून त्याच्या नादीं लागू पहात होते, ते सनातन्याच्या दटावणीला कच खाऊन तिकडे जाण्याचें टाळू लागले ! जे त्याचा धर्म स्वीकारूं पहात होते त्यानी तो बेत रहित केला ! व जे काही त्याचे अनु-यायी होण्याच्या बेतात होते, त्यानी सनातन्याच्या दडपेगिरीला भिऊन तो नाद सोडून दिला ! इतकेच नव्हें तर जे त्याचे स्नेही सोबती व आप्तइष्ट म्हणवीत होते, तेहि अखेर अखेर जुन्या धर्माचीच कड घेऊन, त्याला टाळू लागले ! अर्थात् महात्मा आता जवळ जवळ वाळीतच पडल्यासारखा झाला !! ( गाथा उद्धवड, खत्त ४६-१ )

सनातनी हे वजनदार लोक असल्यामुळें व बहुजनसमाज हा त्याच्या कच्छपी असल्यामुळें त्याना या गोष्टी फारच अल्पकाळात साध्य

करता आल्या पण झोरोष्टरची गोष्ट **अशांतली** नव्हती. त्याचें बसावें तसें बस्तान अजून समाजात बसलें नव्हतं. लोक सहानुभूति दाखवीत, आदरानें त्याच्याकडे पहात, भाविकपणें प्रवचनें ऐकत, या सर्व गोष्टी खऱ्या. पण समाजात नेत्याचें, श्रेष्ठ व हुकमी स्थान व मान अद्याप त्यास प्राप्त झाल्याचें चिन्ह दिसत नव्हतें आणि याची जाणीव त्यास नव्हती अशातला भाग नव्हता. या गोष्टी तो पूर्ण ओळखून होता. सनातन्याच्या कुटिल कारवाईमुळे व दमदाटीमुळें लोक आपणास मनात असूनहि टाळतात हे पाहून त्याला खेद वाटला पण करणार काय? त्याचा येथें निरुपाय होता!

**गाथा उप्टवड यस्त** ४५–५ मध्यें तो आपली कहाणी आपली -असहाय स्थिति-मज्दप्रभूजवळ मोठ्या काकुळतीनें सागत आहे की 'हे परमेश्वरा! जेव्हा जेव्हा करप-कवि सारखी दुष्ट माणसे माझ्यावर तुटून पडतील, अगर माझेवर रागारागानें डोळे वटारतील, किंवा मला मारहाण करण्याचा प्रयत्न करतील तेव्हा माझें रक्षण तुझ्याशिवाय कोण बरें करील! (यस्त ४५ ५) यावरून झोरोष्टरची त्या कवि व करप पंडितानी काय अवस्था केली होती याची सहज कल्पना करता येण्यासारखी आहे.

पण तो निराश झाला नाहीं. अहुरमज्द प्रभूवर त्याची अढळ श्रद्धा व पूर्ण निष्ठा असल्यामुळें मागें पुढें केव्हा तरी आपण त्या पुराण पंडितावर मात करूंच करूं हा आत्मविश्वास त्याच्यात बलवत्तर होता. याचें कारण असें कीं त्यानें सनातन्याचें पाणी चागलें ओळखलें होतें. उच्च भावना, उदात्त कल्पना, पवित्र आचरण, व सत्यन्वेषण याचा त्याच्यात पूर्ण समवाय असल्या-मुळें, त्याचा आपल्या सत्य, शास्त्रशुद्ध व तर्कसिद्ध धर्मापुढें टिकाव लागणें शक्य नाहीं. याची त्यानें आपल्या मनात पक्की गाठ मारून ठेविली होती.

मात्र प्रस्तुत प्रसंगाला तोंड देण्याचें सामर्थ्य अद्याप त्याच्यात यावें तसें आलें नसल्यामुळें नाइलाजानें त्याला नमतें घेऊन स्वस्थ बसणें भाग पडलें

सबंध प्रांतभर-म्हणजे मीडियाभर-या सनातन्यानी आता एवढी प्रचंड चळवळ चालविली होती व पक्का बंदोबस्त करून ठेविला होता कीं हजारानी जेथें श्रोतृवृंद जमे, तेथें आता माशीदेखील फिरके नाशी झाली ! त्याच्या हालचालीवर जणु काहीं पक्का पहाराच बसला होता ! त्याच्या घरा सभोंवतीं सनातन्याचा जवळजवळ गुप्त पाहराच बसला होता असें म्हटलें म्हणून काहीं बिघडणार नाहीं इंच पर्यायानें सागावयाचें म्हणजे तो जसाकाही आता वाळींतच व पाहऱ्यातच पडल्यासारखा झाला होता ! बिचारा झोरोस्टर ! अहुर मज्दचा प्रेषित खरा पण आता पूर्ण निराश व असहाय झाला होता !

त्याचा लौकिक आता हळुहळू घसरू लागला लोकमत गढूळ होत चालले, नव्हे सनातन्यानीं आपल्या हस्तकाकडून तसें करावयास लावले काहीं काहीं गुंड तर तो बाहेर पडला म्हणजे त्याची रस्त्यावर उघड उघड हुर्यो करावयास लागले ! काहीं कुचेष्टेखोर लोक त्याला बीभत्स बोलू लागले ! थोडक्यात म्हणजे त्याची जिकडे तिकडे टिंगल-टवाळी व निंदानालस्ती होऊं लागली ! दररोज त्याच्या विषयीं नाहीं नाहीं त्या अफवा उठवून, त्याचा दुर्लौकिक पसरविण्यास सुरवात झाली त्याला वेड लागलें आहे ! मार्गे फिरलें आहे ! पिसा झाला आहे ! एक की दोन, अशा अनेक अफवा हवेंत तरंगू लागल्या ! एकदरींत सनातन्यानी त्याला कात्रींत धरून रजीस आणण्यात चागलें यश मिळविलें, यात सशय नाहीं साधल्यास त्यास ठार मारावें असाहि त्याचा बेत होता ही हकीकत यस्न ४६ मध्ये पुसट पुसट आली आहे (यस्न ४६-११)

## देशांतर

हा सर्व प्रकार पाहून व जनता आपल्या मार्गी येण्यास आता तयार नाहीं, इतकेंच नव्हे तर उलट कोठें कोठें आपल्यावरच उलटून पडल्या सारखी झाली आहे, हें ओळखून, तूर्त तेथें राहणें हें हिताचें व श्रेयाचें नाहीं हें विचारात घेऊन झोरोष्टरनें त्या देशाला—आपल्या मायभूमीला—राम- राम ठोकण्याचा निश्चय केला असला तर त्यात काहीं चूक झाली असें म्हणता येणार नाहीं आपल्या धर्माचें बी येथें रुजणें हें साम्प्रतच्या परिस्थितींत शक्य नाहीं व तेथें अधिक चळवळ व गडबड केल्यास परिस्थिति आधिकच बिघडणार व चिघळणार हें धडधडीत दिसत असल्यामुळें आता तेथें राहून आपलें प्रचारकार्य हट्टानें चालविण्यास कोण शहाणा तयार होईल? त्यानें तेथून बाहेर पडावयाचें ठरविलें तें यथायोग्यच झालें

पण जावयाचें कोठें हा एक प्रश्न त्यास त्याच वेळीं येऊन पडला कोठें गेलें तरी हे सनातनी आहेतच ! कोठेंहि ते आपल्याला गाठणार नि आड येणार ! आपल्याला विरोध करणार व आपल्यावर हत्यार उपसणार ! हें निश्चित असता कोठें जावें व काय करावें हा प्रश्न पुढें येणें हें साह- जिकच आहे पुढचा मार्ग आता त्यास दिसेनासा झाला पण तेथें राह- ण्याचीहि सोय नव्हती नव्हे, तर धोक्याचें होतें ! न जाणो कोणीतरी माथेफिरू सनातनी गुद्यानें भडकून जाऊन आपलें काहीं बरें वाईट केलें तर ! त्याचा काय नेम ! आता घरीं रहावयाची देखील त्याला चोरीच होऊन बसली ! सनातन्यानी त्याविरुद्ध इतकें काहीं काहूर माजविलें होतें कीं त्याच्या जवळ जाण्यास किंवा त्याच्याशी उघड बोलण्यास लोक आता धजत नसत !

वाचकहो ! ही आपत्ति एका झोरोष्टरच्याच वाट्याला आली असें मात्र समजू नका ! कोणत्याही नवीन संप्रदाय प्रस्थापकाला तसे अड-

थळे आलें व येणारच ! त्याचें कार्य सुरळीत व सुगूर चाललें, असें कोणत्या इतिहासात लिहिले आहे ! त्याना अडथळा हा व्हावयाचाच ! फजीति उडायचीच ! निंदा अपमानाचें प्रसग गुदरायचेच ! विरोध विघ्नें यावयाचीच ! उपवास उपहास व वनवास पदरीं पडायचेंच ! हाल–अपेष्टा छळमार याची झळ पोचायचीच ! एक झोरोष्टरच काय, बहुतेक सर्व नवीन धर्म प्रस्थापकाची व मत प्रचारकाची हीच कथा आहे ! नव्हे काय ? योगीश्वर याज्ञवल्क्याला वैशंपायनानी काय कमी छळलें ? भगवान् बुद्धाला जैन व देवदत्त हे चागलेच भोवलें नाहींत काय ? प्रभु येशू खिस्ताला फरशी व सदुकी यानी तर प्रत्यक्ष क्रूसावरच चढविला कीं ! आणि हजरत महमद पैगंबराला त्याचाच कुरेश बाधवानी शेवटपर्यंत दातातच धरला होता ! मग हा महात्मा झोरोष्टर तरी अपवाद का रहावा व कसा राहील ! पण हें लक्षात ठेवा कीं, सोने अग्नींत घालावें तसाच तितक, त्याचा कस उजळून रग खुलतच जातो ! तसा हा साधु–छळाचा महिमाच आहे ! असो

**झोरोष्टरला** आता भिडीयातून पाय काढणें भागच पडले व त्याप्रमाणें त्यानें केलेंहि पण पुढें जावयाचें कोठें हा एक त्यास मोठा प्रश्न येऊन पडला आता तो एकटाच होता जवळ दुसरें कोणीच नव्हतें ! वस्त्र–पात्र, सीधा–सामुग्री, पैसा–अडका याचें नाव नाहीं ! एकटाच सडा बाहेर निघाला ! तो महात्मा झोरोष्टर !

जाता जाता वाटेंत नाना तऱ्हेचे विचार मनात डोकवू लागलें त्या विचारात तो इतका गढला कीं आपण कोणीकडे चाललों याची देखील त्यास शुद्ध राहिली नाहीं पाय जमीन धरून चालत, इतकेंच पण त्याला कसलाहि रोख नव्हता याप्रमाणें सकाळपासून सध्याकाळ पर्यंत ता चाल चाल चाललाच चालला पण गावाचा कोठें म्हणून कोठें

सुद्धां पत्ता नाहीं ! चालून चालून पाय थकले म्हणजे कोठेंतरी एखाद्या झाडाखालीं बसून थोडा वेळ विश्रांति घेई. शीण थोडा ओसरला म्हणजे पुनः चालूं लागे. आलें मनांत कीं झपझप पाऊलें टाकी आणि आला थकवा म्हणजे पुनः गति थंड पडे ! कोठें झाडाखालीं बैस, कोठें दगडावर विश्रांति घे, कोठें जमीनीवर पडून रहा, पुनः ऊठ पुनः बैस असें करित करित संध्याकाळीं अंधार पडल्यावर अकस्मात् तो एका गांवांत आला.

पण तेथें ओळख ना देख ! जावें कोठें नि विचारावें कोणाला ? एका पडक्या धर्मशाळेंत पडून रात्र कशी बशी काढावी लागली. यावेळीं त्याची स्थिति फारच अनुकंपनीय झाली होती. पाय सुजल होते ! अंग ठणकत होते ! शरीर सर्व धुळीनें माखलें होतें ! तशांतच पोटांत भाताचा कण नाहीं कीं घोटभर पाणी नाहीं ! निजायला घड जमीन नाहीं नि पांघरायला अंगभर पांघरूण नाहीं ! त्या धमशाळेंत कांहीं मुसाफर लोकांनी मुक्काम केला होता. पण त्यातल्या कोणीच त्याची विचार-पूस केली नाहीं. नि दाद घेतली नाहीं !! तशीच त्यानें ती रात्र एका कोपऱ्यांत पडून काढली !

दुसरे दिवशीं सकाळीं उठून तेथें फार वेळ न राहतां पुनः तो पुढच्या वाटेस लागला. दोनप्रहरच्या सुमारास' त्यास एक लहानसें खेडे लागलें. पण मौज ही कीं तेथेंहि कोणी त्यास विचारीना कीं पुसेना ! तेथें कांहीं वेळ थांबून तेथूनहि पुढचा रस्ता धरला. संध्याकाळीं त्यास पुनः एक गांव लागला. तेथें तरी लोक आपली वारतपुस्त करतील अशी त्याला मोठी आशा होती. तो गांव त्याच्या ओळखीचा होता. पण दैवच त्याला प्रतिकूल होतें, तेथें कोण काय करणार ! तेथेंहि त्याची निराशाच झाली !

यातील अतस्थ स्थिती त्याला ठाऊक नव्हती हा सगळा सनातन्याचा डाव होता. त्याचे हेर व हस्तक गावोगाव फिरून एक वेडा पिसा माथेफिरू मागून येणार आहे, त्याला कोणी भेटू नये व दाद घेऊ नये, असें सागत फिरत होते. त्याचा हा परिणाम होता. सनातन्यानी आता त्याला सर्वच बाजूनी चागलेंच रोखलें होतें. यात त्याचा उद्देश असा कीं, त्याची जाईं तेथें फटू फजीति करावी व अन्नात्र करून त्यास ठार मारावें ! अशा कठीण स्थितीतच त्यानें काहीं काळ कठला त्याचे फार हाल झाले व कैक उपासतापास घडले ! पण एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे कीं कितीहि हाल झाले, कसाहि प्रसग ओढवला, तरी दुसऱ्या जवळ तोंड वेंगाडून त्यानें ' देहि ' असें म्हटलें नाहीं ! वाटेल ते कष्ट सोसले, हाल अपेष्टा सोसल्या, पोटातील भगभग सोसली पण कोणाजवळ याचना म्हणून केली नाहीं ! थोर पुरुषाचा तेजस्वी स्वभाव म्हणतात तो हा !

## आशेचा किरण !

तपश्चर्या सपवून गावात येऊन धर्मोपदेशास प्रारभ करून आता जवळ जवळ दोन वर्षे भरत आलीं पण नावाला म्हणून एकहि अनुयायी त्यास लाभला नाहीं पुष्कळ उपदेश केला, व्याख्यानें दिलीं, नवीन ज्ञान सागितलें, नवा मार्ग दाखविला, सनातन्याचा दभस्फोट केला, जुन्या धर्मातील दोष दाखविले, अवेस्ता धर्माची सुदर तत्त्वें पुढें ठेविलीं, नीतीची महती गायली, न्यायाची बाजू माडली, सर्व काहीं केलें पण तें सगळें पाण्यात !

प्रथम प्रथम त्याला यशाची चिन्हे दिसलीं नाहीं असें नाहीं पण पुढें सनातन्याच्या कुटिल कारवाईमुळें, जें काहीं जोडलें होतें तें सर्व निसटून जाऊन अखेर त्यास गाव सोडून, देश सोडून बाहेर पडण्याची पाळी आली ! पहिल्या भरात देशभर फिरून धर्मोपदेशाचें व लोकजागृतीचें काम

फार चोख व यशस्वीपणें त्यानें केलें हें खरें पण अखेर केलेलें सर्व फिसकटून जाऊन अपयश व अपमान पदरात घेऊन गृहत्याग व देशत्याग करण्याचा दुर्धर प्रसग मात्र नशिबीं आला !

धर्मासाठीं, सत्यासाठीं, सत्तासाठीं पुढें त्यानें देश त्यागहि केला उपवास वनवास सोसले तहान-भूक, ऊन-वारा थडी-पाऊस, हाल अपेष्टा इत्यादि कष्टपरपरा सर्व काहीं सोसली पण आशेचा किरण मात्र त्यास कोठेंच दिसेना ! उलट निराशेचा डोह मात्र पुढें येऊन उभा राहिला ! मिडीया सोडल्यावर पुढें कोठें कोठें व केव्हा केव्हा लहरीप्रमाणे तो लोकाना धर्मोपदेश करी अगदीच नाहीं असें नाहीं आणि लाकहि तो ऐकावयास जमत हेंहि खरें पण त्याचा परिणाम मात्र तितकासा आशा-दायक दिसून येईना लोक सगळे उपदेश ऐकून निघून जात आणि गेले म्हणजे ते तिकडेच ! पुन त्याचें दर्शन म्हणून नाहीं ! अखेर एकटा तो एकटाच ! जणु काहीं रानातला गेंडाच !

पण असें करून किती दिवस चालणार ! करावयाचें तेवढे सर्व प्रयत्न केले त्यात बाकी काहीं ठेवली नाहीं इतकेंच नव्हे, तर पुढें पुढें देखील इतकें दु ख, इतके कष्ट, इतके हाल नि इतक्या अपेष्टा सोसून व श्रम व सायास करूनहि शून्याच्या पुढें प्रगतीचें पाऊल पुढें सरकण्याचें लक्षण दिसेना ! तेव्हां त्यानें तरी धीर कसा धरावा ! आता त्याचें मन निराशेच्या डोहात शिरू पहात असलें, तर त्यात नवल तें काय ? आता त्याच्या प्रयत्नास सहजिकच शिथिलता येऊ लागली ! उत्साह ओसरू लागला ! धैर्य खचत चाललें ! मन उदास बनत चाललें आणि अखेर अखेर हताश व निराश बनण्याची पाळी आली ! !

याप्रमाणें काही दिवस गेले पण रात्र ही सदैव रात्रच रहात नाहीं तिलाहि काही मर्यादा म्हणून आहेतच गाढ अंधकार रात्रभर

पसरून असला तरी पुढें प्रभात झाली म्हणजे त्यालाहि माघार घ्यावी लागतेच कीं नाहीं ? सृष्टीचा नियमच आहे तो ! तसाच प्रकार आता झोरोष्टरच्या बाबतीतहि झाला. तशा निराशामय स्थितींतच पुढें सुदैवानें त्याला एक आशेचा किरण दिसला ! त्याचा चुलत भाऊ **मह्घ्योमाह-अर्जास्वाचा पुत्र** हा त्यास अकस्मात् येऊन भेटला व त्यानें त्याच्या स्वीकृत कार्यास आपली अंतःकरणपूर्वक सहानुभूति दर्शवून, शेवटी त्याच्या धर्माचा स्वीकार करून त्याचा पहिला शिष्य व अनुयायी झाला ! अर्थात् या नव्या उपक्रमानें त्याच्या दग्धमनोभूमींत आशेचा एक नवा अंकुर फुटून, त्याचा आत्मविश्वास पुनः जागृत झाला ! येथें त्याची काळ रात्र संपली ! !

पुढें तो फिरत फिरत ब्याक्टिरियात आला. ब्याक्टिरिया हा देश इराणच्या अगदी पूर्वेस असून, त्यात हल्लीचा अफगाणिस्तानचा समावेश होतो. सुदैवाची गोष्ट म्हणजे येथे अजून मिडिया देशांतील धथडळ येऊन पोंचली नव्हती. येथेंहि **कवि** व **करप** पंडित होतेच. पण झोरोष्टर अद्याप त्याच्या डोळ्यांत भरण्यासारखा नव्हता. तो त्या देशात उतरला त्यावेळी प्रख्यात कविघराण्यातील विद्वान व विद्याभिमानी उदार राजा **विस्तास्प** हा गादीवर असून तो बल्ख या राजधानींत रहात होता. ब्याक्टिरियात आल्यावर झोरोष्टरचे सर्वच ग्रह बदलले ! त्याच्या धर्मोदयाची सुप्रभात झाली ! व सहानुभूतीचा अनुकूल वारा वाहू लागला ! अर्थात् पवित्र अवेस्ती ग्रथाचा भाग्योदय होण्याचा शुभ व मंगल काल समीप आला ! !

येथें आल्यावर त्यानें आपलें अंगीकृत कार्य पुन: नव्या जोमानें सुरू केलें. प्रथम प्रथम श्रोतृवृंद जमावा तसा जमेना. पण पुढें हळुं हळुं त्याच्या प्रयत्नाला यश येत चाललें. जे जे म्हणून त्याचा उपदेश ऐकावयास

येत, ते ते जाताना त्याच्या भाषणानें खुष होऊन घरीं गेल्यावर आपल्या स्नेह्यासोबत्यापाशी व शेजापाजाऱ्यापाशी त्याची मोठी तारीफ करूं लागले. आणि दिने दिने यामुळें श्रोतृसमुदाय वाढत चालला व त्यामानानें त्याचा बोलवालाहि जिकडे तिकडे होऊ लागला. तो जाई तेथें लोक त्याला आता प्रेमादरानें जवळ करूं लागले. कोठें व्याख्यान देऊन तर कोठें खासगी संभाषण करून तो आपल्या नवीन धर्माचा लोकाना उपदेश करूं लागला.

असे होता होता त्याची कीर्ति राजा विस्तास्पाच्या कानापर्यंत जाऊन थडकली तो जात्या विद्वान व ज्ञानप्रिय असल्यामुळें महात्मा झोरोष्टरची कीर्ति व प्रशंसा ऐकून त्याच्या मनात त्याच्या विषयीं एकप्रकारची सद्भावना उत्पन्न होऊन त्याच्या दर्शनलाभाची त्यास मधून मधून लहर येऊ लागली. आता ब्याक्टिरियात त्याचा जम चागला बसत चालला असून, लोकातहि त्याचेंविषयी आदर व पूज्यभाव दिसदिस वाढीस लागला होता. पण दुर्दैव हें कीं लोक त्याच्या ज्ञानाचें व उपदेशाचें कौतुक करीत हें खरें असलें तरीं उघडपणे त्याच्या धर्माचा स्वीकार करून त्याचें अनुयायित्व पत्करण्यापर्यंत मजल मारण्याची बुद्धि अगर धैर्य त्यास होत नव्हतें. नरोबरच आहे मनुष्य हा पुराणप्रिय असून नव्या गोष्टीचा स्वीकार करण्याकडे त्याचा कल सहसा वाहत नसतो.

## राजा विस्तास्प

तरुण विस्तास्पाची माहिती मागील प्रकरणात देण्यात आलीच आहे. तो तरुण विस्तास्प आता ब्याक्टिरिया देशाची राज्यसूत्रें हलवीत असून, तो बल्ख येथें राहत होता. यावेळीं तो राज्यपदावर येऊन जवळ जवळ तीस वर्षांचा काळ लोटला होता म्हटलें तरी चालेल. या दरम्यानच्या काळात त्याने आपल्या राज्यात फार सुंदर व चोख व्यवस्था ठेविली होती. तो जसा शूर व पराक्रमी होता, तसाच मोठा विद्याव्यासंगी व विद्याभिमानी

होता. त्यावरोनरच तो सुशील व सच्चरित्र असून तसाच मोठा उदार व दयाळूदि होता. त्याच्या मन्त्रिमंडळात जामास्पासारखे विद्वान बहुश्रुत व व्यवहारकुशल असे मन्त्री असून, झरीरासारखे वीर पुरुष राज्यरक्षक होते. अर्थात् राज्यकारणात चांगले नागावलेले योग्य व अनुभवी लोक मन्त्रिमंडळात असून ते कर्तव्यदक्ष, निःस्पृह व न्यायनिष्ठुर असल्यामुळें त्याचा सल्ला व दक्षता ही राज्यात सुव्यवस्था व शांतता नांदण्यास मोठी उपकारक झाली होती. अर्थात् तेथील प्रजा सुखी व संतुष्ट होती हें निराळें सांगण्याचें कारणच नाहीं.

मात्र त्यावेळी इराणची धर्मस्थिति मात्र तेवढी प्रशंसनीय नव्हती धर्मक्षेत्रात तो देश अत्यंत मागासलेला होता असें म्हटल्यास त्यात काहीं वावगें नाहीं. लोकांत मूर्तिपूजा भरभराटींत असून देवळात तत्प्रीत्यर्थ पशूंचे असंख्य बळी पडत असत तसेंच मांत्रिक व ज्योतिषी लोकांचें बडदि फार माजून राहिलें होतें जादूटोणा, भूतपिशाच, मंत्रतंत्र, चेटूक इत्यादि वामविद्यांहि आपला संसार अघळ पघळ थाटून होती. नीतीला प्राधान्य नव्हतें व तत्वज्ञानाची ओळख नव्हती अशा प्रकारची त्यावेळची काहीं चमत्कारिक लोकस्थिति होती. त्यावेळच्या धर्मकारणात कवि व करप पंडित यांचें प्रामुख्य व प्राबल्य असून, ते परंपरेचे मोठे चाहते व कट्टे कैवारी होते

हे कवि व करप पंडित आपणास मोठे सनातनी समजत असून आपल्या शिवाय धर्म जाणणारे व सांगणारे जगात दुसरे कोणीच नाहींत अशी यांना घमेंड होती. सनातनी याचा अर्थच असा कीं, नवीन विचाराला नाक मुरडणारा व नवीन आचाराला विरोध करणारा असा परंपरेचा मोठा दुराभिमानी व दुराग्रही पंडित ! याच अर्थानें सनातनी हा तेव्हा काय किंवा आज काय केव्हाहि सारखाच ओळखला जातो. एकदरींत

सांगावयाचा मुद्दा काय तर इराण त्यावेळीं धर्म-विचारात व नैतिक आचारणात अत्यंत क्षुद्र व खुरट्या मनोवृत्तीचा व बुरसट आचारविचाराचा देश असून, कवि व करप पंडित त्याचे अग्रेसर व सूत्रधार होते.

अशा वेळीं महात्मा झोरोष्टरचा तेथें शुभोदय होऊन, त्याच्या विद्वत्तेची व पांडित्याची कीर्ति लोकात पसरत जाऊन, अखेर ती विस्तास्पाच्या कानापर्यंत जाऊन पोंचली. तो स्वभावतः मोठा ज्ञानप्रिय व गुणीजनाचा चाहता असल्यामुळे त्याचे दर्शन घेण्याची संधि तो पाहूं लागला. एके दिवशीं रात्रीं आपल्या महालात झोपल्यावेळीं त्याला एक चमत्कारिक स्वप्न पडलें. ते म्हणजे असें :— तो दरबारात आपल्या मंत्रिमंडळासह बोलत बसला असता अचानक त्या दरबाराचें छत्र दुभंगून त्यातून एक सुवर्णाचें सिंहासन स्वर्गांतून सरसर खाली उतरून तेथे आलें. त्या सिंहासनार एक तेजस्वी दिव्य पुरुष बसला असून, त्याच्या हातात एक लहानसें झाड, एक जळजळीत अग्नीचा लाल गोळा, व एक पवित्र ग्रंथ अशा दिव्य वस्तू होत्या. तें जें झाड होतें, त्याच्या प्रत्येक पानावर विस्तास्पा ! तूं आता माझ्या प्रेषिताच्या-महात्मा झोरोष्टरच्या धर्माचा स्वीकार कर, असा मजकूर होता. त्या सिंहासनावर बसलेल्या पुरुषाच्या हातात तेजस्वी अग्नीचा लाल धगधगीत गोळा असून, त्याना अलौकिक गुण म्हटला म्हणजे असा होता कीं तो हातात धरला तरी भाजत नसे !

तो अग्नि त्या दिव्य पुरुषानें उठून विस्तास्पाच्या हातावर नेऊन ठेविला. पण चमत्कार हा कीं, राजाला त्याचा मुळींच चटका बसला नाहीं! केवढे तेज त्या अग्नीचें ! डोळ्यानें बघवत नसे ! पण हातात पहावा तर अगदीं गार ! बर्फासारखा गारेगार ! नतर राजाच्या हातातून तो घेऊन, त्यानें त्याचा मुख्यमंत्री जो जामास्प याच्या हातात दिला. त्यानें घाबरत घाबरत तो धरला. पण गम्मत ही कीं त्यापासून त्यास कांहींच

बाधा झाली नाहीं ! यानंतर तो तेथील इतर लोकांच्या हातींहि देण्यात आला पण कोणाला थाहींच चटका बसला नाहीं ! असा चमत्कारिक होता तो अग्नि ! त्याचें नाव ' **गुरशिन मेहेर** ' असें होतें

त्याचप्रमाणें तो धर्मग्रंथ झाला तरी तितकाच विलक्षण होता अग्नीत टाकला तरी तो जळत नसे ! अर्थात् अग्नीची देखील त्यावर सत्ता चालत नसे ! मग इतरांची तर काय कथा ! त्या ग्रंथात उत्तम धर्मज्ञान व तत्वज्ञान याचा संग्रह असून शिवाय ऐहिक व पारलौकिक जीविताचें तेथें मोठ्या कौशल्यानें वर्णन व चित्रण करण्यात आलें होतें अशाप्रकारचा तो अपूर्व व अलौकिक ग्रंथ असून, त्याचें नाव ' अवेस्ता ' असें होतें अशाप्रकारचें तें एक विलक्षण स्वप्न होतें व राजाला तें पाहून मोठें आश्चर्य वाटलें असो ( दितकर्द, ७,४,७४ ते ८२ ) ७४–८२

## राजा विश्तास्पाची भट

**विश्तास्पास** तसें विलक्षण स्वप्न पडल्यावर पुढें थोडक्याच दिवसाची गोष्ट धर्मसाक्षात्कार होऊन बारा वर्षे सपत आलीं तरी आपला धर्म स्वीकारण्यास कोणीहि पुढें येत नाहीं, लोक प्रवचन ऐकून जातात पण त्याचा अंगिकार करण्यास मात्र धजत नाहींत हें पाहून झोरोष्टरच्या मनावर औदासिन्याची छाया पडू लागली होती पुढें काय करावें, कोठें जावें, कोणास भेटावें कोण आपलें ऐकेल नि धर्माचा स्वीकार करील या विवचनेंत तो पडला असता त्यास आरमझ्‌-कडून असा संदेश आला कीं आता उशीर न करता त्वकर राजा **विश्तास्पास** जाऊन भेटून त्यास धर्मोपदेश करावा या सूचनेप्रमाणें तो त्यास भेटावयास म्हणून अवेस्ताग्रंथ बरोबर घेऊन बल्ख शहराकडे निघाला या वेळीं तो एकटाच होता. बरोबर कोणी नव्हतें त्याचें वय आता बेचाळीसच्या घरात आलें होतें

अहुरमझ्दच्या या सूचनेनुसार तो आता बल्ख शहराकडे निघाला वाटेतून जात असता त्यास मधेंच दोन राजे भेटले त्याना त्यानें जवळ

बोलावून घेऊन आपल्या अवेस्ता-धर्माविषयीं थोडक्यांत ओळख करून देऊन, त्या धर्माला अनुकूल मत बनविण्याचा त्यानें खडा टाकून पाहिला. पण राजे म्हणजे कसले बेरड ते ! ते याला थोडकेच दाद देणार ! मोठे नास्तिक व महा उर्मट ! त्या मूर्खांना त्यांतले कांहींच पटलें नाहीं. नाक मुरडावयाचें तें मुरडलेंच, इतकेंच नव्हे तर त्यांनीं त्याची यथेच्छ निंदा व नालस्ती करून पुढचा रस्ता धरला. .

ते कांही अंतर पुढे गेले असतील नसतील तों मोठा झंझावात सुटून, त्यांत ते सांपडून आकाशांत उंच उडविले जाऊन तेथेंच अंतराळी लोंबकळत राहिले ! पुढे क्षणभरांत आकाशांतील पक्षी त्यांच्या सभोंवती जमून आपलें भक्ष्य समजून चोंचींनें टोंचटोंचून व नखांनी फाड-फाडून त्यांच्या शरीरांतलें सर्व मांस त्यांनी खाऊन फस्त करून टाकलें ! व हाडें तेवढीं शेवटीं खालीं पडलीं ! खालच्या लोकांना हें पाहून मोठा अचंबा घाटला !

विश्तास्पाला स्वप्न पडल्यानंतर पुढें थोडक्याच दिवसाची हकीकत: तो राजवाड्यांत आपल्या सिंहासनावर बसला असतां एका द्वारपालानें आंत येऊन वर्दी दिली कीं, बाहेर कोणीतरी एक महापुरुष आला असून, तो आपल्यास भेटूं इच्छितो. हुकूम झाला तर त्याला आंत घेऊन येतो. राजानें त्यास आपल्याकडे घेऊन येण्यास त्या द्वारपालकास सांगितलें व त्याप्रमाणे त्यानें केलें.

राजानें झोरोस्टरास मागें कधींहि पाहिलें नव्हतें. केवढी भव्य व गंभीर मूर्ति ती ! काय तें तेज नि काय तो चेहरा ! तो पोशाख नि तो रुबाब ! महात्मा समोर येऊन उभा राहताच राजाच्या मनांत एकदम नम्रता व आदरभाव उत्पन्न होऊन, चटकन् सिंहासनावरून उठून, सन्मानपूर्वक त्याचें स्वागत करून, त्यास आपल्या सिंहासनाशेजारी मोठ्या आदरानें

बसवून घेतलें ! यावेळीं झोरोष्टरच्या एका हातात अग्नीचा लाल गोळा व एका हातात अवेस्ता ग्रंथ होता. देवपुरुषाचें-साधुपुरुषाचें-दर्शन म्हणजे तो एक मंगल महायोगच ! कोटेंहि व केव्हांहि अशा थोर पुण्यात्म्याच्या मंगल दर्शनानें सात्विक मनुष्याच्या भाविक अंतःकरणात आनंदाच्या लहरी आपोआपच उठून, मनाला एकप्रकारची प्रसन्नता वाटतें व आपण धन्य झालो अशी भावना अंतःकरणात चमकतें ! आणि तंतोतंत असाच प्रकार येथेंहि झाला.

शिरस्त्याप्रमाणें योगक्षेमाचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर राजानें झोरोष्टरास ' आपण कोण व इकडे का येणें झालें हें कळविल्यास मी मोठा भाग्यवान समजेन ' असें विचारता तो उत्तरला- ' ऐक, राजन् ! मी कोण व का आलो हें सागतो, तें नीट ऐक ! राजन् ! मी त्या सर्वज्ञ व सर्वसमर्थ अहुरमज्द परमेश्वराचा प्रेषित आहे ! मला झोरोष्टर असें म्हणतात ( उजवा हात पुढें करून ) हा जो माझ्या हातात ग्रंथ आहे, तो मोठा पवित्र धर्मग्रंथ असून, तो मला त्या भगवंताकडून मिळाला आहे ! त्या ग्रंथातील श्रेष्ठज्ञान-सत्यज्ञान-दिव्यज्ञान-तुला शिकवून, त्या मंगल धर्माची तुला दीक्षा द्यावी व तुझ्याकरवीं त्या सत्य व पवित्र धर्माचा लोकहितार्थ व लोकसुखार्थ सर्व जगभर प्रसार करावा, अशी मला त्या प्रभूकडून आज्ञा झाली आहे राजन् ! हा धर्मग्रंथ याला अवेस्ता असें नाव आहे-मी स्वर्गांतून येथें तो आणला आहे व ( डावा हात पुढें करून ) हा अग्नि झाला तरी तेथलाच आहे याचें नाव ' बुरझिन मेहेर ' असें आहे !

आता या अग्नीचा महिमा सागतो, ऐक याचा गुण असा आहे कीं, हा हातात धरला तरी तो भाजत नाहीं ! व पाणी मारलें तरी विझत नाहीं ! त्याची परीक्षा पहावयाची असली तर हा घे ! हा हातात धर ! असें म्हणून, तो लाल अग्निनारायणाचा गोळा राज्याच्या हातात

जनकराज्याच्या सभेची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. तेथेंहि असाच देखावा पहावयास मिळतो. मधोमध, जनकराज, एका बाजूस फारमोठें सनातनी विद्वन्मंडळ व दुसऱ्या बाजूस एकटेच एक योगीश्वर याज्ञवल्क्य, व सभोंवती श्रोतृवृंदाची दाट गर्दी! हुबेहुब जनकराजाच्या दरबाराची पुनरावृत्तिच का ह्मणाना ती विस्तारपाऱ्या विद्वत्सभेची ! असो.

ठरल्याप्रमाणें राजाचा दरबार भरला. नवीन कोणी एक महात्मा आला असून, त्याचा आज दरबारी पंडितांशीं धर्मावर मोठा वादविवाद होणार आहे, ही बातमी अगोदरच गांवांत पसरल्यामुळें त्या महात्म्यास पाहण्यास व चर्चा ऐकण्यास म्हणून समागृह श्रोतृवृंदांनीं चिकार भरून गेलें होतें. शिवाय सर्व मंत्री व वरिष्ठ अधिकारीहि तेथें उपस्थित होते. राजाच्या उजव्या बाजूला प्रतिष्ठित पंडितवर्ग बसला होता.

राजाकडून सूचना येतांच त्यांतून एक वीर उठून मधें वादक्षेत्रांत आला. चर्चेला प्रारंभ झाला. त्यानें **झोरोष्टरशी** कांहीं वेळ चांगलीच झुंज घातली. पण पुढें पुढें रंग पालटत जाऊन अखेर त्याच्या तोंडाला कुलुप लागलें ! तो झोरोष्टरच्या प्रश्नाला इतका घाबरला कीं मुखावाटें शब्द देखील निघेना ! क्षणभर गप्प बसला, दोन क्षण गेले, तीन गेले ! पण तोंडांतून म्र निघेल तर शपथ ! हें पाहून लोकांत कुळबुळ सुरू झाली. अखेर स्वारी तेथून उठली व मान खाली घालून आली तशी परत निघून गेली !

त्यानंतर दुसरा एक पंडित आला. अर्थात् हे सर्व पट्टीचे चांगले नावलेले दरबारी पंडित ! केवढा त्यांचा लौकिक ! अर्थात् होतेच तसे ते आपापल्या विषयांत मोठें पारंगत ! हा जो दुसरा पंडित पुढें आला होता, तो विद्वान असून धर्मचर्चेंत अत्यंत निष्णात होता. त्याची व झोरोष्टरची चांगलीच जुंपली. यामुळेंच वादाला मोठा रंग चढला. दोघांहि वीरांनी प्रश्न

व प्रतिप्रश्न याचा एकमेकावर सारखा भडिमार चालविला याप्रमाणें दोघांची सारखी सरशी चालून एकमेक एकमेकास चीत करू पाहत होते पण दोघेहि कसलेले वीर असल्यामुळें लवकर सोक्षमोक्ष लागण्याचा रंग दिसेना असा हा कुस्तीचा सामना ऐन रंगात आला असता एकदम वादाला कलाटणी मिळाली ! झोरोष्टरच्या प्रश्नाला उत्तर देताना पडितजी गडगडले ! त्याची दातखिळच बसली ! झालें हा दुसरा मोहरिहि पहिल्याप्रमाणेंच थप्पड खाऊन स्वारी आली तशी परत निघून गेली ! यानतर तिसरा आला आणि त्याची तर क्षणार्धात तीच वाट लागली ! एकदोन प्रश्नातच स्वारी गडगडली आणि तेथुन हळूच पाय काढला

आता मात्र त्या पडित वर्गात गडबड व घबराट सुरू झाली. तीन चागलें मोहरे पण तिघाचाहि एकच वाट लागली एकालाहि यश नाहीं हें पाहून त्याच्या मनानें कच खाल्ली असली तर त्यात काही नवल नाहीं आता मात्र झोरोष्टरच्या विद्वत्तेची त्याना अधुक अधुक कल्पना येऊ लागली त्याच्यापुढें आता कोणी जावे याविषयीं त्याच्यात कुजबुज सुरू झाली जवळ जवळ घटका दिड घटका झाली तरी कोणी येईना हें पाहून झोरोष्टरनें त्यापडितवर्गास उद्देशून त्यातला कोणीहि पुढें येऊन वाटेल तो प्रश्न विचारण्यास उठून आव्हान केलें त्यासरशी चौथा एक पडित मोठ्या हिरिहिरिनें पुढें येऊन त्यानें काही प्रश्न झोरोष्टरापुढें टाकलें तों उगलीच क्षणाचाहि विलब न करता त्यानें सरळ उत्तर देऊन त्याची विल्हेवाट लावली नतर झोरोष्टरनें असें काही खोंचदार प्रश्न त्यास विचारलें कीं, त्या पडिताला उत्तर देण्यास तोंडच उघडतां येईना ! बिचारा मत्रमुग्ध होऊन बसला ! अखेर तोंहि तेथून तोंड खाली घालून मुकाट्यानें परत फिरला ! झोरोष्टरचें हें वादकौशल्य बुद्धिसामर्थ्य व प्रतिभातेज पाहून राजा विश्तास्प तर आश्चर्यानें थक्क होऊन गेला

मग तेथें जमलला सामान्य श्रोतृवृंद मंत्रमुग्ध झाला असला तर त्यांत नवल तें काय !

आपल्या पंडितवर्गाची महात्यानें उडविलेला चिवडा पाहून राजा मनांत फार खजिल झाला व त्याच वेळेस झोरोष्टरची ती नावीन्यपूर्ण अगाध विद्वत्ता व वादकौशल्य पाहून आश्चर्यचकित तर झालाच पण त्याच पुढें क्षणार्धात आनंदानें पूर्ण फुलून गेला ! राजा विश्तास्प म्हणजे तसाच कांहीं मोठा विद्वान व महाज्ञानी होता ! त्याला सनातन धर्म व प्राचिन इतिहास यांची पूर्ण ओळख होती. त्यानेंहि झोरोष्टरास कांहीं प्रश्न विचारले पण प्रश्न बाहेर पडावयाचाच अवकाश. उत्तर पुढें ठेवलेलेंच थोडक्यांत त्यानें त्या महाभागाचें पाणी ओळखिलें व पुढें खोल जाण्याचें टाळून आपली बाजू सांवरून घेतली ! असो. हा इतका प्रकार होईतोपर्यंत सभेची वेळ संपून गेली, म्हणून तेवढ्यावरच सभा बरखास्त करण्यांत येऊन पुढील कार्यक्रम दुसऱ्यादिवसावर टाकण्यांत आला. अर्थात् पहिल्या दिवसाची ही सभा संपली. तेथें जमलेला श्रोतृवृंदहि झोरोष्टरची वाहवा व कौतुक करीत घराकडे वळला. तो पंडित वर्गहि बाहेर पडला, पण त्यांचे चेहरे मात्र आतां पाहण्यासारखे होते !!

पाळजाला डागल्यासारखे त्याना दुःख होई ! परी त्याना त्यादिवशी जेवण गोड लागलें नाहीं व रात्रीं अंथरुणावर झोंप आली नाहीं ! सारखा विचार–विचार–विचार !

हें कसें झालें व काय झालें, या विचारातच ते अगदी चूर होऊन गेले. आता पुढें कसें व आपली बाजू निस्तरणार कोण व कशी या विचारानें ते अगदी बेचैन झाले. उदईक राजाची आपल्यावर खात्रीनें खप्पा मर्जी होणार व लोकांत हसें होणार, धिंड निघणार, ही गोष्ट त्याना मधुन मधून सतावूं लागली. शेवटीं शेवटीं 'ह एवढ्यानेंच काय झालें, आम्ही तीस लोक आहो, उद्या आगली पाहून घेऊ, इतक्याना तो काय भारी थोडाच आहे ! ' अशी मनाची समजूत करून त्याला स्वस्थ करूं पहात. पण त्याचा तो तेजस्वी चेहरा, चकाकणारे डोळे व वाक्पाडित्य हें डोळ्या पुढें दिसूं लागताच जीव कासावीस होई ! एवढी धास्ती घेतली होती त्याची त्यानी ! त्या दरबारी पडितानी ! एकूण काय, त्यांना त्यारात्रीं कोणालाच झोंप आली नाहीं. या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून या कुशीवर अशी त्याची सारखी धडपड चालली होती. तों इतक्यात उजाडलें.

दुसरे दिवशीं सकाळीं पहाटेस उठून शौचमुखमार्जन वगैरे प्रातर्विधि आटपल्याघर अगात कपडे घालून दुसऱ्या दिवशीचा सामना खास जिंकूच जिंकू या आशेनें ते घरातून बाहेर पडले. इकडे श्रोतृवृंदहि तो वादचमत्कार पहाण्याच्या इच्छेनें भराभर दरबारात येऊन जमूं लागला. नेमलेल्या वेळेच्या आधींच तो सगळा दरबार श्रोतृवृंदानें चिकार भरून गेला ! दरबारी मंडळीहि जमत चालली. पडितवर्ग आपापल्यास्थानीं येऊन विराजमान झाला. पुढें थोड्याच वेळात राजा **विदतास्पहि** आपल्या आसनावर येऊन बसला. तो इतक्यात **झोरोष्टरची** भव्य व तेजस्वी मूर्ति शुभ्रपोषाखात

तेथें येऊन आपल्या जागीं स्थानापन्न झाली. आता जिकडे तिकडे अगदी सामसूम झालें. व तो चुरशीचा अपूर्व वादविवाद ऐकण्यास सर्वांचे कान तिकडे टवकारून राहले.

विरुद्ध होते, त्याना दुसऱ्यादिवशी नेहमीप्रमाणेंच यावयास सांगून सभा बरखास्त करण्यात आली

## दिवस तिसरा

तिसरा दिवस उजाडला ठरल्याप्रमाणें मंडळी वेळेवर जमली पंडितहि आले व **झोरोष्टराहि** आला वादास प्रारंभ झाला, पण मागील दोन दिवसाप्रमाणेंच आजचीहि कथा झाली सगळे पडित हरले व महात्मा विजयी झाला ! तीन दिवस हें ज्ञानसत्र सतत चालून अखेर झोरोष्टरच्या गळ्यात विजयश्रीनें माळ घातली व पदरात नारळ पडला या तीन दिवसात एकदर तीस लहान मोठ्या विषयावर कसून चर्चा झाली व झोरोष्टरनें सर्व प्रश्नांचें समर्पक उत्तर देऊन सर्वांचें तोंड बद केलें पण झोरोष्टरनें विचारलेल्या प्रश्नापैकी त्या पडित वर्गामध्यें एकालाहि सरळ उत्तर देता आलें नाहीं आता त्याला कोणी प्रतिस्पर्धी म्हणून राहिला नाहीं सर्वांनीं त्याला एकमतानें शरणचिठ्ठी लिहून दिली याप्रमाणें त्या संस्मरणीय सभेंत सनातन पण्डिताची रेवडी ( फटफजीति ) झाली व महर्षि **झोरोष्टरचा** जयजयकार झाला ! ! आता त्या वादात कोणते प्रश्न उपस्थित झाले, विषय कोणकोणता निघाला कोणी काय उत्तर दिलें याविषयीची माहिती झोरोष्टरच्या धर्मग्रथात कोठेंच उपलब्ध नसल्यामुळें, तशी तपशीलवार माहिती येथें आम्हास देता आली नाहीं असो

हें सर्व झाल्यावर नंतर झोरोष्टर राजास उद्देशून म्हणाला— राजन् ! मी त्या सर्वदयाघन अहूरमज्दचा प्रेषित आहे ! यानेंच मला तुजकडे पाठवून दिलें आहे त्या भगवान अहुर मज्दची आज्ञा ही पृथ्वी व तो स्वर्ग दोन्हि सारखीच पाळत आली आहेत त्या सर्व समर्थ मज्दनेंच हें वरील विशाल नभोमंडळ, सूर्य, चद्र, तारागण निर्माण केलें आहे ! त्याचप्रमाणें ही अफाट पृथ्वी व मानवादि प्राणिकोटि

त्याचीच कला आहे! तोच तुझें व जगाचें अन्नपाणी देऊन रक्षणपोषण करतो. तुझी ही धनदौलत, हें सुंदर सिंहासन व डोक्यावरील दिव्य मुगुट हें सर्व त्याचीच देणगी आहे. माडलिक राजे व मंत्रिमंडळ तुझी जी सेवा करतात ती त्याचीच कृपा होय! हें तूं विसरूं नकोस.

असें म्हणून त्यानें आपल्या उपरण्यातून आणलेला अवेस्ता ग्रंथ बाहेर काढून तो राजापुढें धरून त्यास म्हणाला— ' राजन् हा ग्रंथराज काय आहे, हें तूं ओळखलेस काय? तो पवित्र ग्रंथ अहुर मझ्दनें या मृत्युलोकात प्रसार करण्यासाठीं म्हणून माझ्या स्वाधीन केला आहे. यात जें ज्ञान सांगितलें आहे, तें तू नीट समजावून घेऊन, तें चांगलें आत्मसात् करावेस.

राजाः— तर काय होईल?

**झोरोष्टर** - त्या सर्वज्ञ महाप्रभूच्या मंगल स्वर्गाचा तू धनी होशील! तुला त्यातील ज्ञानाची गोडी लागून तूं त्याचा अनुयायी बनलास म्हणजे तू त्या सर्वदयाघन मझ्द परमेश्वराच्या कृपाप्रसादास पात्र होशील! मात्र त्यातील उपदेश पूर्ण आचरणात उतरला पाहिजे. या अवेस्ताग्रंथाचा महाप्रसाद म्हणजे स्वर्गलाभ! तेथें जाऊन तूं उदंड सुखसमाधानात नांदशील!!

राजा :- नाहीं तर?

**झोरोष्टर** :- नाहीं तर तुझा घात होईल! नाश होईल! राजा! तुला सत्य सत्य सांगतो कीं, जर तूं त्यातील उपदेशाप्रमाणें वागणार नाहींस तर तो मझ्द प्रभु तुझें हें किरीटमंडित शिर धुळीं मिळाविल्याशिवाय रहाणार नाहीं! तसेंच तू जर त्याचा उपदेश मानणार नाहींस, तर हें सर्व राजवैभव धुळीस मिळून जाईल! इतकेंच नव्हेतर

अघ कारांनी गुरफटलेल्या अशा दु:समय जगात — म्हणजे त्या पापी आग्रमन्युच्या दारुण नरकात तुला असह्य विपत्ति पडावें लागेल ! ती आपत्ति टाळण्याकरितां म्हणून तरी तू मी जें काय सांगतो, तिकडे लक्ष दे ! मद्दत्याच्या पवित्र अवेस्था ग्रंथाला मान दे व इहपरलोकीं सुखी हो !

हें महात्मा झोरोष्टरचें भाषण ऐकून राजा म्हणाला — महर्षे ! तुझें म्हणणें मी ऐकलें पण एक प्रश्न विचारावासा वाटतो विचारूं का ?

**झोरोष्टर** – ( मान हालवून ) हो हो विचार, खुशाल विचार राजा ! तुझा संशय दूर करून घे काय आहे तुझा प्रश्न ?

राजा - प्रश्न इतकाच कीं, हें जें सर्व तू सांगितलेंस त्याबद्दल तुझ्याजवळ कांही पुरावा निरावा आहे कीं काय ? हें विचारतो त्यात माझा हेतु असा आहे कीं, मला तुझ्या म्हणण्याची सत्यता पटवून घ्यावयाची आहे आणि मला ती एकदाची पटली म्हणजे मी तुझा उपदेश तर घेईनच ! मद्द शिष्य होईनच ! इतकेंच नव्हे तर सर्व जगभर त्या तुझ्या पवित्र ग्रंथाचा मी मनोभावें झटून प्रसार करीन !

**झोरोष्टर**— ठीक आहे राजा ! मला तुझें म्हणणें मान्य आहे तुझ्या सद्भावाचा मला अधिक पुरावा नको !

राजा— माझ्या मनाचें समाधान झालें कीं, मद्दप्रभूचा धर्मध्वज जगात फडकलाच म्हणून समज !

**झोरोष्टर**— छान, छान ! राजा ! छान बोललास ! तुझा हेतु फार स्तुत्य आहे आता ऐक या अवेस्ताग्रंथाचा महिमा सांगतो, तो नीट लक्ष देऊन ऐक या ग्रंथाचा पृथ्वीवर जेव्हा प्रसार होईल व लोक त्याप्रमाणें

यागू लागतील, तेव्हा जगात एकहि पिशाच्य अगर राक्षस दृष्टीस पडणार नाहीं ! फक्त हें पुस्तक त्यास दाखविलें म्हणजे झालें !

राजा– म्हणजे ?

**झोरोष्टर–** म्हणजे काय ? त्यातील गाथा तोंडावाटे बाहेर पडल्या कीं, काम फत्ते ! त्या मन्त्राच्या उच्चारानेंच सर्व मांत्रिक, सर्व राक्षस सर्व दुष्ट प्राणी भयभीत होऊन पळून जातात ! हा महिमा काय लहान झाला ? तशात **अहुन वइर्य** हा महामन्त्र तर फारच प्रभावी ! म्हणून म्हणतो की तू या महान् ग्रंथाचें मंगल ज्ञान करून घे ! तो ग्रंथ संपूर्ण शीक ! म्हणजे तू उत्तम ज्ञानी होशील ! अखंड विजयी होशील ! नि उदंड सुखात व आनंदात नांदू लागशील ! !

राजा (आश्चर्यानें) –एवढा प्रभाव आहे त्याचा !

**झोरोष्टर** मनुष्याला आणखी काय पाहिजे ? इहलोकीं सुख व परलोकीं स्वर्ग ! राक्षसाचें मर्दन व दुष्टाचा पराजय ! दु:खाचा अंत व नरकापासून निर्भयता ! म्हणून म्हणतो कीं या महाग्रंथाचें मंगल ज्ञान करून घे ! म्हणजे तुझा तूच उत्तम ज्ञानी होशील ! मग माझी गरज राहणार नाहीं तुझ्या या ग्रंथाच्या सतत अभ्यासानें तुझें मन निवळत जाईल व बुद्धि उजळत जाईल ! मी हा जो ग्रंथ येथें आणला आहे, त्याचा हेतु हा कीं याच्या नित्य पठणानें तुला इह परलोकाचें यथार्थ ज्ञान व्हावें आणि तूं सदैव सुखानंदात नांदावेंस या ग्रंथात सर्वप्रकारचें ज्ञान सांगितलें आहे म्हणून म्हणतो की तूं या ज्ञानापासून विमुख होऊं नकोस ! आणि दु:खाच्या खाईंत जाऊन पडूं नकोस ! मनुष्याला आतापर्यंत ज्याची ओळख नव्हती ते ज्ञान यांत सांगितलेलें आहे

विश्तास्प– असें तर मग त्यातील कांहीं भाग वाचून दाखव पाहू

**झोरोष्टर**–ठीक आहे तसं करतो ऐक तर ! नीट लक्ष देऊन ऐक ! असें ह्मणून त्यानें त्यातील एक अध्याय वाचून दाखवून त्यातील अर्थ व मर्म नीट समजावून सांगितले

पण दुर्दैव हें कीं त्याला तो आवडला नाहीं पटलातर नाहींच ! याचें कारण असें कीं, तें ज्ञान आकलन करण्याची पात्रता व पावित्रता त्याच्यात अजून आली नव्हती बरोबरच आहे, कीं अज्ञान मुलाला रत्नाची पारख कशी होणार ? पण तो मोठा झाला ह्मणजे मग त्या रत्नाची किंमत त्यास आपोआपच कळू लागते तशीच गोष्ट या ज्ञानाची झाली तरी आहे शहाणी माणसें प्रथम जे कांही ज्ञानाचे बोल सांगत असतात, ते अज्ञानांना प्रथम पटत नाहींत व रुचतहि नाहींत ! हा जगाचा अनुभवच आहे असेंच येथहि झालें विश्तास्पाला त्यातील उपदेश आवडला नाही व ज्ञान पटलें नाहीं याचे कारण असें कीं तो अजून तितका तयार झाला नव्हता मात्र एक गोष्ट त्याची अनुकूल होती तो विद्वान होता समजूतदार होता तेथून उठून गेल्यावर रात्री अंथरुणावर पडून विचार करीत असता त्याला वाटलें कीं आपण घाई केली **झोरोष्टरच्या** ह्मणण्यात काहीतरी तथ्य आहे असें त्याला वाटू लागले

दुसरे दिवशी सकाळी दरबारात बसला असता त्याला बोलावून घेऊन ह्मणाला– महर्षे ! तुझें ह्मणणें मला काहींसें पटतें खरें पण माझें अजून पूर्ण समाधान होत नाहीं तर तू मला तो ग्रंथ समग्र एकवार वाचून तो नीट समजावून सांगशील तर बर होईल मला त्याचें संपूर्ण ज्ञान झालें ह्मणजे जगाला तसें जाहीर करणें हें योग्य होईल ह्मणून ह्मणतो कीं दररोज तू मजकडे येऊन मला तो ग्रंथ वाचून नीट समजाऊन सांग मला त्याची नीट ओळख व चौकशी करून घेऊ दे ! त्यासाठीं तू रोज सकाळी मजकडे येत जा ! आणि तो ग्रंथ वाचून दाखवून माझ्या मनात चकचकीत प्रकाश पाड ! मी तो समजावून घेण्याचा मनापासून प्रयत्न करीन

झोरोष्टर– ठीक आहे. राजा, माझी कांहीं हरकत नाहीं. तुझ्या इच्छेप्रमाणेंच होऊंदे ! अवेस्ताग्रथाचा संदेश तुला नीट समजावून देण्याचा प्रयत्न करुन पाहतो तेथपर्यंत मी तुला कांहींच करण्यास सांगत नाहीं

असें झाल्यावर तेवढ्यालाच तो विषय संपला. राजा उठून घरी आला व झोरोष्टर आपल्या स्थानाकडे निघाला.

राजाचें दरबारातील हें भाषण ऐकून व महात्मा झोरोष्टरचा हा विजय पाहून, तेथें बसलेल्या राजपंडिताच्या मनात मत्सराचें एकच काहूर उठलें ! ते मनात फार लाजले, खिन्न झाले, फार तडफडले, चवताळले व उद्विग्न झाले ! पण करतात काय ! राजापुढें त्यांचें काय चालणार ! राजाचें भाषण त्यांना आवडलें नाहीं व झोरोष्टरचा सन्मान मानवला नाहीं ! राजाच्या या कृतीनें आपला अपमान झाला असें समजून, रागारागानें त्यांनी आपले दातओठ चावले ! हातपाय आपटले ! पण यापलीकडे त्यांना येथें कांही करता येईना ! राजा व झोरोष्टर निघून गेल्यावर आश्चर्यचकित मुद्रेनें व उद्विग्न अंतःकरणानें त्यांनीहि तेथून पाय काढाल.

( दिनचर्दे ७-४-७३. )

जगप्रसिद्धच आहे. राजपुरोहित वैशंपायनाच्या इभ्रतीला जनमेजयाच्या अश्वमेध यज्ञात धक्का पोंचताच, त्यानें याज्ञवल्क्यावर नेमका बहिष्काराचा वर्मी प्रहार नाहीं का केला ? प्रभु येशु खिस्तानें परुशावर व सदुकींवर त्याच्या दुष्ट व निंद्य वर्तनाबाबत कठोर टीकास्त्र रोखल्यामुळें त्या अहमन्य सनातनी पंडितानीं कट करून त्या निष्पाप पुरुषावर नसता आरोप लादून त्याला अखेर क्रूसावर चढविण्याचा निंद्य व्यूह नाहीं का रचला ! हजरत महमद पैगंबरनें कुरेशाच्या धार्मिक भावनेवर व त्याच्या पवित्र काबा-मंदिरातील पूज्य मूर्तीवर घसरून पडल्यामुळें त्याला ठार मारण्याचा राक्षसी कट त्या प्रतिष्ठावत कुरेशानी नाहीं का केला ? भगवान बुद्धदेवाचें प्रलोभ-नीय वर्चस्व पाहून खुद्द त्याच्याच एका पट्ट शिष्यानें-देवदत्तानें-मत्सरानें भडकून व बहकून, त्याच्या जिवावर स्वत घाव घालण्यास अखेर तो तयार झालाच कीं नाहीं ?

या सर्व गोष्टी व गत-कालचा इतिहास जगाला काय सागतो ? एकच एक गोष्ट आणि ती म्हणजे जो मनुष्य आपल्या दिव्य तपोबलानें देवकोटीस जाऊन पोंचला, त्याचा प्रतिष्ठावत लोक मत्सरानें ग्रस्त होऊन आपली डळमळणारी प्रतिष्ठा धडीरधी सावरण्याच्या बुद्धीनें येन केन प्रकारेण नि पात करण्यास कसलेंहि हीन व पापी कृत्य करण्यास मुळींच मागेंपुढें पहात नाहींत ! हा जगाचा जो दुर्दैवी अनुभव आहे-कटु इति-हास आहे-त्याला मग झोरोष्टर तरी अपवाद का रहावा ? व का राहील ? छे, तसें होणें नाहीं ? आणि वस्तुत तसें झालेंहि पण नाहीं

महात्मा झोरोष्टरच्या बुद्धि प्रभावापुढें आपण हतबुद्ध व हीनतेज ठरलों व त्या मानानें त्या महात्म्याचें वजन व वर्चस्व राजवाड्यात व राजदरबारात रुजून वाढीस लागलें, हा विचार त्या सनातनी पंडिताच्या अहंकारग्रस्त अत करणात रात्रंदिवस सारखा डिवचत राहिला जस जसा

राजा विस्तास हा झोरोष्टरच्या नादीं लागून त्याच्या आहारी जाऊ लागला, तस तसा या प्रतिष्ठावत पडिताचा पारा चढत जाऊन, पोटात द्वेषाच्या ज्वाला भडकून व मत्सराच्या कळा उसळून, ते मनात भारी बेचैन झाले ! पण करणार काय ! हताश व निराश झालेल्या मत्सरी लोकाना दुसरें सुचणार तरीकाय ?

वादविवाद करुन **झोरोष्टरची** चागली जिरवू ही आशा आता त्याची सपूर्ण करपून जाऊन, आपण त्याच्यापुढें सर्वस्वी हतबुद्ध व हतप्रभ ठरलो, ही अपेशी भावना त्याच्या मनात पक्की ठाण माडून बसली होती जगात आपली नाचक्की होऊन पत घसरत चालल्यामुळें त्यावरील आपली पकड ढिली पडत चालली हें शोचनीय व अमगल दृश्य त्याना स्पष्ट दिसू लागलें होते आणि असेंच आणखी काही दिवस गप्प बसल्यास त्यानीं राजाश्रयास मुकून लोकात अब्रूनें तोंड दाखविण्याची पचाईत पडेल हें भविष्यहि त्याना सारखें भेडसावीत होतें एकदरीत तात्पर्य काय तर आपली अब्रु व पत राखावयाची व वाचवायची आणि तशीच राजावरील आपली पकड टिकवायची तर काही तरी गौडबगाल केल्याखेरीज — कपट प्रयोग रगविल्याखरीज गत्यतर नाहीं हा विचार त्याच्या डोळ्यापुढें आता सतत फिरन्या लागू लागला

महात्मा **झोरोष्टरची** राजमान्यता व लोकप्रियता इतक्या थरास जाऊन पोंचली होती कीं, तेथून त्याला खाली खेंचणें हें सरळ व सोपे काम नव्हते म्हणून त्याच्यावर कसल्याहि प्रकारचा प्रत्यक्ष आघात न करता राजाचें मन त्याच्याविषयी कलुषित करून त्याच्या हातूनच तो काटा बाहेर काढण्याचा त्या ठकानीं पोक्त घाट घातला व तें काम त्यांना शक्य व सुलभ दिसलें अगा राजाचें प्रेम व विश्वास या दरबारी शास्त्रीपडिता-

वरील पूर्ण डळमळलेला नव्हता त्याचा मान व शब्द पूर्वीप्रमाणेंच तो राखून व झेलून होता

त्याचा फायदा त्यानी घेण्याचें ठरवून पुढील नाटक रगविण्याचा त्यानी घाट घातला तो ह्मणजे हा **झोरोष्टर** हा खरोखर प्रेषित व महात्मा नसून तो एक पक्का मायावी मान्त्रिक आहे व त्या चेटक्या मत्र-विद्येच्या जोरावर राजाच्या व लोकाच्या भाविक मनावर मोहिनी टाकून, त्याना फसवून आडमार्गास नेऊ पहात आहे, अशी राजाची समजूत-नव्हे पक्की खात्री-करून देऊन, त्याच्याकरवींच झोरोष्टरला अद्दल घडवावयाची, असा त्या सर्व पडितानी मिळून डाव टाकला

त्यावेळीं देशात चेटूक, जादू टोणा, मत्र-तत्र इत्यादि वाममार्गी विद्याना जसा काहीं ऊतच आला होता जो तो त्या विद्येच्या आधारावर आपण मोठे धर्मज्ञ पडित आहो अशी फुशारकी मारून, सामान्य लोकात आपलें प्रस्थ माजविणेचा तो एक चालता काळ होता, असें ह्मटलें तरी चालण्यासारखें आहे अशा लबाड व फसव्या मान्त्रिकाचा त्यावेळीं फार सुळसुळाट झाला असून, ती गुणगुण राजाच्या कानापर्यंत जाऊन पोंचली होती ही मान्त्रिक विद्या साधन करावयाची तर त्याला माणसाचीं हाडें, कुत्र्या-माजराची मुडकी, केंस व इतर मृतप्राण्याचे गलिच्छ भाग या सर्व वस्तूची जरूरी लागत असे

या सनातनी पडितानी आता या उपकरणाचा उपयोग करून, **झोरोष्टरची** राजापुढें खोटा आरोप लादून नालस्ती व नाचक्की कर ण्याचा बेत करून, त्या रोखानें पाऊल टाकण्याचें ठरविलें व झोरोष्टरची निजावयाची जी खोली होती, तेथें मेलेल्या माणसाचीं हाडें, कुत्र्यामांजराची मुडकी, नखें-केंस व इतर मृतपशूचें आणखी काही गलिच्छ पदार्थ त्याला न कळत तेथें चोरून नेऊन ठेवण्याचा घाट घातला अर्थात् ही गोष्ट

**झोरोष्टरच्या** द्वाररक्षकाच्या फितूरी शिवाय तडीस जाणें शक्य नसल्या-मुळें त्याला एकातात गाठून पैशाची व बढतीची लालूच दाखवून व त्याबरोबरच आपल्या वर्चस्वाचेंहि दडपण घालून, त्याला आपल्याकडे वळवून घेतलें !

अर्थात् हा प्रयोग यशस्वी करण्यास फार वेळ व आयास पडले नाहींत. बोलून चालून हलका चपराशीच तो ! त्याची कर्तव्यनिष्ठा ती काय ! पैशाची व बढतीची लालूच दाखवितात त्याच्या तोंडाला पाणी सुटलें व तो त्याना अनुकूल झाला ! महात्मा झोरोष्टर बाहेर गेल्यावेळीं सधी साधून ती सनातनी मडळी तेथें आली व त्या रखवालदारानें खोलीच्या किल्ल्या त्याच्या स्वाधीन केल्या !

त्या लोकानी त्या किल्ल्या घेऊन, **झोरोष्टरची** निजावयाची खोली उघडून, त्याच्या उशाखालीं व बिछान्याखालीं माणसाची हाडे, कुत्र्यामाजराची मुंडकी व इतर गलिच्छ पदार्थ ठेऊन, पुन खोली जशीच्या तशी बद करून, तेथून ते परतले जाताना यातील अक्षरदेखील बाहेर फुटणार नाहीं याविषयीं काळजी घेण्याबद्दल त्या शिपायास सक्त बजावून, तेथून त्यानी बाहेर पाय काढला व सरळ राजवाड्याचा रस्ता धरला.

( झरथुष्ट्रनामा, ३८ ( अलेक्झाडर कृत )

## मात्रा लागू पडली !

राजा **विश्तास्प** हा त्यावेळीं महात्मा **झोरोष्टरास** जवळ बसवून घेऊन, अवेस्ता ग्रंथातील धर्म व तत्त्वज्ञान याची आस्थापूर्वक माहिती करून घेण्यात गढला होता अर्थात् ही सधि त्या खल पुरुषाच्या आयतीच पथ्यावर पडली. राजा आरमसच्या प्रिय प्रेषिताला बरोबर घेऊन अवेस्तातील धर्मज्ञान समजून घेण्यात रगला आहे असें पाहताच, त्या पंडितानीस एकजण चटकन् पुढें होऊन, त्यास नम्रपूर्वक म्हणाला-राजन् !

हें तू काय करीत आहेस ? तुझ्या समोर बसलेला हा मनुष्य कोण आहे याची तुला जाणीव आहे काय ! राजन् ! तो महात्मा नाही ! धर्मात्माहि नाही ! तर तो एक तोतया आहे तोतया ! तो धर्मज्ञ नसून चेटक्या आहे चेटक्या ! तुझ्या हातातील मय हा धर्मग्रंथ नसून, गारुडी विद्येची पोथी आहे ! प्रभो ! तू या मायावी चेटक्याच्या नादीं लागून भलत्याच मार्गाला लागला आहेस !

तो शोरोष्टर आपण प्रेषित आहो म्हणून बतावणी करीत आहे हें खरें. पण वस्तुत तो तसा नाही ! आम्ही तुला खरेखुरें सांगतो की, तो धर्मात्माहि नाही व महात्माहि नाही ! जादूटोणा करणारा मांत्रिक आहे, महामांत्रिक ! महाठक आहे ! पक्का लबाड आहे ! आपल्या त्या कृष्ण विद्येच्या जोरावर तुला भुरळ पाडून फसवू पहात आहे ! झुलवू पहात आहे ! व नाचवू पहात आहे ! राजन् ! आम्ही तुझे हितचिंतक—नम्रता पूर्वक स्पष्ट सांगू इच्छितो की, सोड त्याचा नाद ! आणि दे त्याला हाकलून !! त्याला जवळ करण्याची अवदसा तुला कोठून आठवली ? त्याची कृष्ण कारस्थानें कोणाच्या समजण्यासारखी नाहींत इतकी तीं गुप्त आहेत ! मग तुजसारख्या भाविकाला तीं उमजणार कशी ? आणि ती जर तुला समजतील तर आम्ही खात्रीनें सांगतों की, तू भयाने गांगरून जाऊन चळचळ कापू लागशील ! इतकीं भयंकर व भेसूर आहेत तीं !! आम्हीं तीं महत्प्रयासानें शोधून काढली आहेत

राजन् ! रात्रीचा तो काय करीत असतो हें तुला ठाऊक आहे काय ? तो आपल्या निजावयाच्या खोलीत रात्रीं जागत राहून या वामविद्येचा अभ्यास व प्रयोग करण्यात गुतलेला असतो तो तुझ्याजवळ एक बोलतो व लोकाजवळ एक सांगतो आम्ही सर्व तें ऐकलें आहे यात त्याचा उद्देश आम्हांस असा दिसतो कीं, तुला भलता सलता सल्ला देऊन व लोकांना

निराळेंच सांगून तुझ्यांत व तुझ्या प्रजेंत बिघाड व बेदिली उत्पन्न करावी व तुमच्यांत अप्रीति वाढवावी ! आम्ही आतां तुला फार न सांगता फक्त इतकाच सल्ला देतो कीं, या तुझ्या कृतीनें व वर्तणुकीनें तूं आपला व प्रजेचा दोघांचाहि घात करीत आहेस ! लबाड लोकांच्या मिठास भाषणाला मोहित होऊन—वळी पडून—तूं जगांत आपला बदलौकिक करून घेत आहेस. तर आतां सावध रहा ! नीट शुद्धीवर ये ! आणि वाडवडीलांच्या सनातन धर्मालाच चिकटून रहा ! ! '

हे जे दरबारी पंडित लोक—कवि व करप शास्त्रीपंडित—होते, ते म्हणजे राजाच्या पूर्ण मर्जीतले व विश्वासांतले लोक होते. त्यांच्या या अनपेक्षित व चमत्कारिक भाषणानें विश्तास्पाची स्थिति क्षणभर चमत्कारिक झाली. त्यास वरील भाषण ऐकून विजेचा धक्का बसल्याचा भास झाला. महात्मा **झोरोष्टरावर** केलेले हे आरोप ऐकून त्याला मोठा अचंबा वाटला. **झोरोष्टर** म्हणजे केवढा थोर पुरुष ! त्याची योग्यता काय ! विद्वत्ता काय ! विचार काय ! आचार काय ! सर्वच कांहीं विलक्षण ! राजा आता मोठ्या बुचकळ्यांत पडला.

तो कांहीं बोलणार तों इतक्यांत तोच पंडित पुनः म्हणाला—' राजन् ! आमचें ऐक ! या चेटक्याच्या नादीं लागून तूं आपला नाश करून घेऊं नकोस ! तुझें पाऊल आडमार्गाला लागत चाललें आहे ! त्यापासून तुझें कल्याण होणार नाहीं ! आम्ही स्पष्ट व सत्य पण अप्रिय बोलतो हें खरें, पण त्याचा तूं राग मानूं ,क्रोध किंवा वाईट वाटूं देऊं नकोस. कारण तुझें हित व कल्याण पाहणें व चिंतणें हें आम्ही आमचें कर्तव्य समजतो. आतांपर्यंत तूं उत्तम राज्यकारभार करून जगात चांगला लौकिक मिळविला आहेस. तुझ्या अमदानींत राज्यांत शांतता व सुबत्ता, न्याय व सुव्यवस्था, संरक्षण व सुसंवर्धन यांचा प्रजेला लाभ झाला असून ती तुला दुवा देत आहे.

आता या दुष्ट मांत्रिकाच्या नादीं लागून त्याच्या आहारीं जाशील व मल्लें सल्लें करूं पाहशील, तर लोकांत असंतोष पसरून सर्वत्र गोंधळ व अराजक माजून राहील ! यामुळें तुला परिणामीं दुःख व ताप होईल. आम्हाला तुझें व तसेंच जनतेचें सुख व हित पहावयाचें आहे. आम्ही वेळोवेळी दिलेला सल्ला तुला आतापर्यंत हितप्रद व शुभप्रद झाला आहे तसाच पथ्यकर सल्ला आताहि देऊन तुला वेळींच सावध करावें व आतापर्यंत करीत आलो, यापुढेंहि या गादीची सेवा करून तुझें व तुझ्या राज्याचें हित व कल्याण करावें, हा आम्ही आमचा धर्म समजतो. तुला वेळींच इशारा देऊन व सावध करून पुन: मार्गावर आणावें याउद्देशानें आम्ही येथें आलों आहों आणि आमचें कर्तव्य आम्ही बजावलें आहे याउप्पर तुझ्या मर्जीस येईल तसें कर ! मग तुझें कर्म तुझ्या बरोबर ! !

हें भाषण ऐकून राजा जरासा वचकला व पुढें क्षणभर गोंधळांत पडला. महात्मा झोरोष्टरविषयी तसा एकदम संशय घेण्यास त्याला कोठेंच जागा सापडेना व या हितचिंतक पंडितावरहि तसा गैरविश्वास एकदम करवेना. तो मोठ्या पेचांत पडला. त्याच्या हाताखालीं लहान थोर असे अनेक सुभेदार व जहागीरदार असून प्रजाहि संख्येनें मोठी होती. हे सर्व लोक त्याच्या चातुर्यपणाविषयी त्याला रात्रंदिवस धन्यवाद देत असत आणि या सर्वांला या पंडिताचा सल्लाच कारणीभूत होता. तेव्हां त्यांना न आवडेल असें कृत्य करून, त्यांना नाखुष करणें व दुखविणें म्हणजे राज्यांत एक प्रकारें असंतोष व असमाधान माजविणें होय ही गोष्ट तो पूर्ण ओळखून होता.

म्हणून तो त्यास म्हणाला :— पंडितजी ! तुम्ही झोरोष्टरवर हे जे आरोप करता, त्याला आधार काय ? काहींतरी पुरावा तुमच्या

जवळ आहे का ? का उगीच काहीतरी म्हणता ? तुम्ही मला पुराव्यानिशी तशी काही खात्री करून द्याल, तर मग मी खरं म्हणेन आहे का आधार तसा काही तुमच्याजवळ ? तसं काही असल्यास सांगा.

यावर तो पंडित म्हणाला :— राजन् ! आधाराशिवाय आम्ही कसें बोलूं ? तुला याची शहानिशाच करावयाची असल्यास आत्ताच्या आत्ता दूत पाठवून त्याच्या निजावयाच्या खोलीची कसून झडती करवून जें काही तेथें सापडेल तें सर्व जशाचें तसें येथें तुझ्यापुढें हजर करीव. म्हणजे तुझी तुलाच खात्री होईल. आजपर्यंत आमचा शब्द विश्वासण्यात आला असून, आताच त्यावर गैरविश्वास का ?

मग आता विलंब कसला ? राजानें तावडतोब अधिकारी बोलावून घेऊन, झोरोष्टरच्या निजावयाच्या खोलीत जाऊन तेथें असेल नसेल तेवढें सर्व सामान आपल्यापुढें जशाचें तसें हजर करण्यास हुकूम दिला त्याप्रमाणें ते अधिकारी तेथें जाऊन **झोरोष्टरची** खोली उघडून तेथील कानाकोपरा तपासून, मिळेल तेवढें सर्व सामान जशाचें तसें बिछान्या सहित घेऊन ते राजापुढें आणून त्यांनी हजर केलें.

## तुरुंगवास व बंदिवास

महात्मा झोरोष्टरवर आता मोठें संकट गुदरलें! ठकानें साधलें व गाईच्या आगारर घेतलें! त्या सत्पुरुषाला या सर्व कपट नाटकाची कल्पना देखील नव्हती! दुष्ट व मत्सरी लोक कसे व किती कारस्थानी असतात याचा त्याला आतापर्यंत अनुभव नव्हता तो सर्व प्रकार–ते कपट नाटक–त्या महात्म्यानें आपल्या डोळ्यांनी पाहिलें पण करणार काय? आता कोण त्याचें ऐकणार! प्रत्यक्ष पुरावा डोळ्यापुढें असता कोण त्यावर गैरविश्वास करणार? इतका सरळ व समदृष्टि माणूस असा आहे तरी कोण! मत्सरी लोकाचे कुटिल डावपेंच सरळ व साध्या मनुष्याला चटकन ओळखता आले, तर मग आणखी काय पाहिजे? पण तसें होणें नाहीं, हीच मोठ्या दुर्दैवाची गोष्ट!!

विश्तास्पाला तर तें मुळींच अन्यथा वाटलें नाहीं तो सर्व हिडीस प्रकार पाहून तो एकदम थिरला! चिडला! व क्रोधानें लालेलाल झाला!! त्याचा तोल सुटला व झोरोष्टरकडे क्रोध–मुद्रेनें पाहून एकदम कडाडला–अरे चेटक्या! मांत्रिक्या! ठका! चांगली बनावणी केलीस की! महात्म्याचें सोंग घेऊन असली नीच कृत्यें करतोस काय? प्रेषिताचा आव आणून लोकांना फसवू पहातोस काय! दुष्टा! तुझी ही कृति किती निंद्य आहे! किती अघोर आहे! किती हिडीस आहे! मला फसवून राज्यात अनर्थ माजविणारा तू महा राक्षसच आहेस झाणावयाचा! धिक्कार असो तुला! तुझ्या धर्माला! नि तुझ्या प्रथाला!! तू जर खरोखर धर्मात्मा व आत्मज्ञाचा प्रेषित असतास तर हे सर्व ओंगळ पदार्थ तुझ्या खोलींत का व कसे आले? या वस्तूच स्पष्ट सागत आहेत कीं, तू पक्का चेटक्या आहेस! गारुडी आहेस! अट्टल जादूगार आहेस! देवाची तुला

भीति नाहीं ! धर्माची चाड नाहीं ! जनाची लाज नाहीं !! तू ठक ! तुझा देव खोटा ! नि तुझा धर्म कपटी !!!

राजा संतापून बोलत आहे, हें पाहून आपली मात्रा लागू पडली या विचारानें ते दुष्ट लोक मनात आनंदानें डोलू लागले पण इकडे झोरोष्टरकडे पहावें तर काय ! केवळ शांतमूर्ति ! त्याच्या मनात कसलाच विकार शिरला नाहीं ! भीतीचें तर नावच नको ! शांतपणें तो राजास म्हणाला–राजन् ! मला यातले कांहीं एक ठाऊक नाहीं ! मी अगदी निष्पाप आहे ! मी सत्य सत्य सांगतो कीं, हें पदार्थ माझे नाहींत व मी ते खोलीत आणून ठेविले नाहींत ! अशा पदार्थाला मी केव्हांहि शिवलो नाहीं ! नव्हे, तिकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं ! येथें काहींतरी दगाफटका आहे ! कोणातरी दुष्ट मनुष्याचें कपट कारस्थान असावें हें ! राजन्, माझ्यावर विश्वास असेल तर हें सर्व खरें मान ! आणि तुला याची खात्रीच करून घ्यावयाची असली तर माझ्या रखवालदाराला बोलावून आणून त्याच्याजवळ चौकशी कर ! म्हणजे सत्य काय तें कळून येईल

महात्मा **झोरोष्टरच्या** या शांत व स्पष्ट भाषणानें विस्तास्प जरासा नरमल्यासारखा झाला व त्याचें म्हणणें त्याला पटलें कीं काय कोण जाणें, त्यानें एकदम एक दूत पाठवून त्या रखवालदाराला बोलावून घेतलें आणि तो आल्यावर त्याच्याजवळ चौकशी केली पण तो कसला वेरड ! आधींच फितूर करून, चांगला मथवून ठेवलेला ! खरी हकीकत तो सांगतो कशाला ? त्यानें आपल्या कानावर हात ठेवून घेऊन, झोरोष्टरच्या तोंडावर चक्क सांगितलें कीं, महात्मा कुलूप लाऊन गेल्यावर तेथें कोणी सुद्धा आलें नाहीं ! त्याच्या पश्चात् वारासुद्धा आत शिरला नाहीं !!

झालें मग आता आणखी काय पाहिजे ? **झोरोष्टरचा** साक्षी-दारच असा उलटून स्पष्ट बोलून गेल्यावर मग आता काय राहिलें ? शिवाय

प्रत्यक्ष पुरावा हजर असता निराळा पुरावा हवा कशाला ? आता महा-त्म्याच्या बोलण्याला व आत्मसमर्थनाला काय किम्मत राहिली ? अर्थात् त्याच्या बोलण्यावर मग आता विश्वास ठेवील कोण नि कसा ?

राजाची तर त्या रखवालदाराच्या सागण्याने पक्की खात्रीच झाली व तो झोरोष्टरकडे वळून म्हणाला— ' अरे दुष्ट दांभिका ! कपटी मांत्रिक्या ! मायावी चेटक्या ! तुला आता जगात जिवंत ठेवणें म्हणजे मोठें पापच आहे ! तुला फाशीच दिला पाहिजे ! ' असें म्हणून त्यानें हातातील अवेस्ता ग्रंथ रागारागानें दूर भिरकाऊन दिला ! व गंभीर आवाजात दूताना आज्ञा केली ' अरे याला तुरुंगात नेऊन आताच्या आता डावून ठेवा ! याची कायमची व्यवस्था काय करावयाची व कधी लावावयाची तें मी मग ठरवीन. जा ! याला आधीं येथून न्या ! आणखी ई ध्यानात ठेवा, याला तीन दिवसातून एक भाकरी व एक लोटा पाणी देत जा ! '

राजाचा हुकूम तो ! मग तेथें विलंब कसला ? लगेच राजदूतानी त्याला आपल्या ताब्यात घेऊन तुरुंगात नेऊन तेथें डावून ठेविलें ! अशा रीतीनें तो पुण्यात्मा झोरोष्टर–महात्मा झोरोष्टर – धर्मात्मा झोरोष्टर–दुष्ट सनातनी लोकांच्या कपट कारस्थानामुळें राजवाड्यातून निघून अखेर बंदीशाळेंत जाऊन पडला ! ( दिनकर्द ७-४-६९ )

सज्जनावर संकटे येतात तीं अशी ! असें संकट मागें येशू खिस्ता-वरहि आलें होतें. सनातनी पुरुषानी सत्पुरुषावर राजद्रोहाचा खोटाच आरोप लादून व खोटा पुरावा रोमन् न्यायाधीश पिलाता समोर हजर करून पूर्वसंकेताप्रमाणें त्यास अखेर देहदंडाची शिक्षा देवविली ! त्याचप्रमाणे हजरत महमद पैगंबरावरहि कुरैशलोकानी त्यास ठार मारण्याचा असाच कट केला होता ! देवदत्तानें भगवान बुद्धाची नाचक्की करण्याकरता आपण

खून करवून भगवंतावर व्यभिचार व खून यांचा आळ घालण्याचा कट केला होता. हा सगळा इतिहास आमच्या त्या त्या ग्रंथांत मार्गेपुढें केव्हा-तरी पहावयास मिळेलच ! आणि हे असले प्रसंग ह्मणजे सत्पुरुषांची ती एक सत्वपरीक्षाच असते, नव्हे कां ?

## दैवी आपत्ति !

**झोरोष्टर** तुरुंगांत जाऊन पडल्यावर पुढें थोडक्याच दिवसाची गोष्ट. **विश्तास्पाचा 'अस्पेसीयाह'** नांवाचा त्याच्या अत्यंत प्रीतींतला एक सुंदर काळा कुळकुळीत असा तेजस्वी घोडा होता. खरोखरच मोठा उमदा प्राणी ! तसाच मोठा देखणा ! चलाख व चतुर ! राजाला अनेक लढाईंत जय मिळाला तो या अश्वश्रेष्ठाच्या करामतीवर ! त्याने अनेक शत्रु रणभूमीवर लोळविले, त्याला कारण याची बहाद्दरकी ! राजा त्यावर स्वार होऊन बसला ह्मणजे वायूला देखील तो मागे टाकीत असे ! इतका त्याचा वेग नि इतकें त्याचें सामर्थ्य ! अनेक प्रसंगीं राजाचे मोठ्या संकटातून प्राण वाचले ते याच्या हिम्मतीवर ! असा तो मोठा उमदा व विश्वासू मित्र होता त्या राजाचा ! तो **अस्पीसीयाह** ! अर्थात् राजाचा तो जीव की प्राण होता, हें आता निराळें सांगावयास नकोच.

पण दुर्दैवानें त्याच्यावर एक मोठी आपत्ति गुदरली. त्याचे चारहि पाय एकदम त्याच्या पोटांत जाऊन दिरून बसले ! आणि तो जमीन धरून बसला ! राजाला ही बातमी कळतांच घटकन् तो तेथें धावून आला. आणि पाहतो तों त्याला पायच नाहीत ! आपल्या जिवलग अश्वराजाची ही अशी चमत्कारिक स्थिति पाहून, त्याला अत्यंत वाईट वाटलें व मनस्वी दुःख झालें ! तावडतोब त्यानें आपले राजवैद्य बोलावून, त्यांना तो प्रकार दाखवून त्याजवर त्वरित उपाययोजना करण्यास नीट बजावून सांगितलें.

वैद्यानी घोड्याजवळ जाऊन, त्याच्या पोटावरून हात फिरवून व नजर चालवून तो सगळा प्रकार पाहिला व पाहून त्याना मोठा अचंबा वाटला. हें कसें काय झालें याविषयीं त्याना मोठें कोडें पडलें! अश्वचिकित्सेंत ते मोठे निष्णात खरे पण येथें त्याची मतीच चालेना! त्यानी खूप विचार केला, केलाच केला. पण त्याना काहीं तो विकार उमजेना! खरें ह्मणजे असा प्रकार आतापर्यंत त्याच्या पहाण्यात किंवा ऐकण्यातहि नव्हता. शास्त्रातहि कोठें आलेला नव्हता. मग ते बिचारे तरी काय करणार? तथापि आपल्या अनुभवाच्या जोरावर त्यानीं नाना युक्त्या व उपाय योजून पाहिले. आपल्या बुद्धिचातुर्याची व वैद्यकीय प्रयत्नाची शिकस्त केली. पण यक्षाच्या नावावरील पूज्याचा आकडा काहीं त्याना पुसता येईना! अखेर त्यानी हात टेकले व राजास येऊन सांगितलें कीं, राजन् आता आमचा उपाय थकला! घोड्याचें लक्षण कांहीं ठीक नाही!!

नतर राजानें मांत्रिकाना बोलावून आणून, त्याना घोडा दाखवून, काहींहि उपाय करून तो पूर्ववत् बरा करण्याची त्याना विनति केली व त्यासाठीं फार मोठें बक्षीसहि लावलें त्या मांत्रिकानीहि आपलें होतें नव्हतें तेवढें मंत्रकौशल्य चालवून पाहिलें. काय नाना तऱ्हा केल्या. आणि आपली सर्व पुण्याई पणास लावली! पण काय? सर्व पालथ्या घागरीवर पाणी! अखेर तोंड खालीं घालून त्यानीहि तेथून पाय बाहेर काढावा लागला!

नंतर राजानें ज्योतिष्याना बोलावून आणलें. व ग्रहपीडा झाली असल्यास परीक्षा करून ती नाहींशी करण्यास त्यास विनवून सांगितलें. राज्यातील महान् महान् ज्योतिषी येऊन तेथें जमा झाले. त्यानीहि कुंडली घालून, ग्रहनक्षत्राची बाधा पाहून, त्याना ग्रहयाति वगैरे काय सुचवावयाचें होतें तें त्यानी सुचविलें व राजानें ते सर्व उपाय–यथाशास्त्र केले. पण गुणाच्या नांवानें सगळा ठणठणाटच!

राज्यातील सर्व लहान मोठे वैद्य, मांत्रिक, जादूगार, ज्योतिषी, आपली काही इतरेजन याचा त्या घोड्यासभोंवती जसा काही गराडा पडून राहिला होता व जो तो आपली अक्कल व धक्कल लढवून पहात होता पण कोणाचाहि यशाचें पुण्य पदरी पडण्याचें चिन्ह दिसलें नाहीं व योग आला नाहीं! सर्वांची पुण्याई थकली व उपाय निकामी झाले! मग आता! घोडा पहावा तर तो काही जमीन सोडून उठेना व चंदी चारा घेईना!

राजाला आता मोठी चिंता लागून राहिली त्यालाहि अन्न गोड लागेना व भड झोंप येईना तोहि फार दु खी व कष्टी झाला होताच तो अस्पेदीयाह त्याला तितका प्रिय! प्रिय ह्मणजे काय? जणु काही त्याचा प्राणच! राज्यात आता जिकडे तिकडे लोकांच्या तोंडी हा एकच विषय होऊन बसला व तो चमत्कार पाहण्यासाठीं ह्मणून त्याच्या झुंडीच्या झुंडी राजवाड्याकडे लोटू लागल्या तो चमत्कार पाहून कोणी ह्मणे की कोणातरी मांत्रिकाचें तें चेटूक आहे, कोणी ह्मणे राजावर देवाचा कोप झाला आहे, कोणी ह्मणे महात्मा झोरोष्टरला छळल्याचा हा परिणाम आहे कोणी ह्मणे ती भूतचेष्टा आहे व कोणी ह्मणे ती ग्रहबाधा आहे! याप्रमाणें त्या घोड्याला पाहून ज्याला जसें सुचेल तसें तो बोलून दाखवूं लागला पुढे पुढे तर त्या घोड्याबरोबरच राजानेहि अन्नपाणी सोडून जमीन धरली!

(जरथुष्ट्रनामा ४० अनेकखांडर)

## झोरोष्टरचा राजास निरोप

पुढें ऐके दिवशीं तुरुंगाचा पहारेकरी यानें रात्रीच्या वेळीं बोलता बोलता सहज झोरोष्टरपाशीं ही घोड्याची गोष्ट काढून ह्मटलें कीं, 'या आपणामुळें राजा अत्यंत दु खी होऊन अन्न सुद्धा घेईनासा झाला आहे

घोड्याबरोबर त्यानेंहि जवळ जवळ जमीन धरली आहे! लोकहि फार खिन्न झाले आहेत. रोगाचा इलाज चालेना व एकालाहि यश येईना. रात्रदिवस सारखे उपायावर उपाय चालले आहेत, तरी गुणाच्या नावानें आवळ्या एवढें!' अशा प्रकारची हकीकत त्यानें झोरोष्टरास बदत उबतच सांगितली

**झोरोष्टरनें** तें सर्व शांतपणें ऐकून घेतलें क्षणभर डोळे मिटून कसलातरी विचार केला नंतर तो त्या रखवालदारास झणाला–' गड्या! मी सांगतो तसें करशील का? तें माझ्यासाठीं झणून नव्हे तर राजासाठीं त्याच्याच हितासाठीं

रखवालदार झणाला–तें काय?

**झोरोष्टर–** बाकी काही नाहीं फक्त राजाजवळ जाऊन तू एवढेंच सांग कीं, झोरोष्टरला संधि दिल्यास तो घोड्याला येऊन पाहील व शक्य तर काही उपाय सुचल्यास तो सुचवून राजाचें अंतःकरण हलकें करण्याचा प्रयत्न करील यांत काहीं माझा फायदा नाहीं राजासाठीं झणूनच तुला हें करावयाचें आहे समजलें का? जा, जा तर मग आणि हा एवढा माझा निरोप त्याला कळीव!'

पहारेकऱ्यानें ती गोष्ट कबूल करून वेळ झाली झणून तो निजावयास गेला दुसरे दिवशी सकाळीं उठून झोरोष्टरचा निरोप कळविण्यासाठीं राजाकडे गेला राजा यावेळीं माडीवर आपल्या महालांत बसून चिंता करीत होता पोटांत अन्न नव्हतें झणून चेहरा कोमेजला होता व रात्रीं झोंप नसल्यामुळें डोळे लाल झाले होते घोड्याविषयीं काळजी लागली असल्यामुळें पोटांत कालवाकालव चालली होती अर्थात् तो फार त्रासला व थकला होता रखवालदार वर माडीवर गेला त्यावेळीं त्याच्या जवळ कोणीच नव्हते तो एकटाच पलंगावर बसून कसल्यातरी विचारांत गुंगला होता

तेथें गेल्यावर त्याला लवून मुजरा करून ह्मणाला राजन्! झोरोष्टर

राजा ( मधेंच )– आ, कोण?

रखवालदार– तो आपला कैदी झोरोष्टर आहे ना?

राजा–हं, मग

रखवालदार– तो ह्मणतो

राजा ( उतावीळपणे मधेंच )– काय ह्मणतो? काय ह्मणतो तो?

रखवालदार– तो ह्मणतो कीं, खावंदाची कृपा झाल्यास व इच्छा असल्यास आपण स्वतः येऊन घोडा पाहून खावंदाची काळजी दूर करण्याचा प्रयत्न करून पाहीन!

राजा– अस्सं जा! जा तर मग! त्याला इकडे लवकर घेऊन ये!

राजाचा हा हुकूम होताच रखवालदार तेथून चटकन निसटला व बाहेर येऊन तुरुंगाकडे धांवला.

झोरोष्टरचें नांव कानीं पडताच राजाच्या तप्त व त्रस्त अंतःकरणावर जणु काय अमृतवृष्टीच झाली! त्याचें जड अंतःकरण एकदम हलुवारलें व भांबावलेल्या मनाला शांतीचा लाभ झाला! त्याची ती दिव्य, निष्पाप व तेजस्वी मूर्ति त्याच्या अंतःचक्षुपुढें उभी राहून शरीरांत नवचैतन्य स्फुरल्याचा त्यास भास झाला! अर्थात् त्याला एक प्रकारें समाधान वाटून त्याच्या निराशाग्रस्त मनाला आशेचा मधुर स्पर्श चाटून गेला!

इकडे तो रखवालदार बंदीशाळेंत येऊन राजाचा निरोप कळवून तावडतोब त्यानें त्यास बंधमुक्त केलें. तुरुंगांतून बाहेर आल्यावर झोरोष्टरनें राजास भेटावयाच्या पूर्वी स्वच्छ स्नान करून, सफेत वस्त्रें धारण करून, अग्निनारायणाचें दर्शन घेऊन मग तो राजवाड्याकडे निघाला. वाड्यांत आल्यावर ही बातमी वर माडीवर राजास कळविण्यांत आली व त्यास वर आणण्यास हुकूम होताच तो जिना चढून वर राजाजवळ गेला. राजानें

त्याजकडे पाहिलें तों कोण त्याचा आनंद ! तें दिव्य तेज, तीं प्रसन्न मुद्रा व शांत नि आनंदी वृत्ति पाहून राजाला परम आश्चर्य वाटलें तुरुंग वासाची व तेथील हालअपेष्टांची त्या चेहऱ्यावर लवमात्रहि छाया पसरली नव्हती !

अहो ! तुरुंग हा कोणाला ? दुष्ट, पापी, चांडाळ अशा पतित व भ्रष्ट गुन्हेगार लोकांना महात्म्यांना तुरुंगहि नाहीं नि हालअपेष्टाहि नाहींत ! ते राहतील तोच स्वर्ग ! पीतील तेंच अमृत ! आणि निजतील तोच पलंग ! ! देवभक्ताला–सत्पुरुषाला–पुण्यात्म्याला दु ख दारिद्र, भूक–तहान, दाह–ताप, कष्ट हाल इत्यादिकांचें यत्किंचिंतहि शिवत नसतें ! म्हणून ते कोठेंहि असले–तुरुंगांत काय किंवा राजवाड्यांत काय–तरी ते आत्मानंदातच तृप्त राहून, गहन विचारांत अखंड रंगलेले असतात ! गीता रहस्याचा जन्म कोठें झाला ? तुरुंगातच ! हिंदस्वराज्य मंत्राची सिद्धि कोठें झाली ? तुरुंगातच ! तेथें नव्हे तर कोठें ? सांगावयाचें तात्पर्य महात्म्यांना तुरुंग नाहीं व हालकष्टहि नाहींत ! त्या सर्व तुमच्या आमच्या सारख्या सामान्यजनांच्या गोष्टी असो

राजा विदस्तास्पाला वाटलें कीं आपण झोरोष्टरला तुरुंगात डांबून तेथें त्याचें अन्नपाणी तोडून त्याचे हालहाल केले ! त्यास कडक शिक्षा देऊन दु खाच्या डोहांत नेऊन बुडविलें ! पण राजाचा भ्रम होता तो ! ! त्या महात्म्या झोरोष्टरला तो तुरुंगहि वाटला नाहीं व तहान भूकहि शिवली नाहीं ! आपल्या दिव्य ज्ञानानंदातच तो अखंड रंगून गेला होता ! त्या तेजांत, त्या आनंदात, त्या शांतींत, लवमात्रहि फरक पडला नव्हता ! पुण्यात्मा हा कोठें झाले तरी सर्व जागतिक आपत्ति–विपत्तींतून दु ख कष्टांतून–हाल–अपेष्टांतून–केव्हांच मुक्त झालेला असतो ! सामान्य मनुष्याला हें कळत नाहीं, इतकेंच ! ( दिनकर्द, ७ ४ ७० )

## महात्म्याचें आश्वासन

**झोरोष्टरचें** दर्शन होताच राजाचें अंतःकरण थडावलें व मन द्रवून तेथें आदरभाव अंकुरला त्यानें प्रेमादरानें झोरोष्टरचा हात धरून त्यास आपल्याजवळ बसवून घेऊन विनयपूर्वक म्हटलें—महात्माजी! आपण थोर आहां हें मी जाणतो आपण आरमझ्दचे भक्त व शिष्य म्हणविता हेंहि मी जाणतो पण—

**झोरोष्टर** म्हणाला—पण काय? राजा! तो शब्द कां निघाला?

राजा—मला अजून त्याची पूर्ण खात्री पटली नाहीं आपलें म्हणणें कांहीं कांहीं पटतें नाहीं असें नाहीं पण पूर्णत्वानें मला तें पटेना मनाचें पूर्ण समाधान होईना

**झोरोष्टर**— मग तुझें म्हणणें काय? तें तरी कळूं दे मला

राजा— माझी खात्री पटविण्याची ही आता वेळ आली आहे आपण प्रेषित असाल—अहुरमझ्दचे खरे भक्त असाल—थोर महात्मा असाल—तर माझ्या घोड्याला बरा करून दाखवा! दाखवाल का हें करून!

**झोरोष्टर**— पण त्या आधीं तुझे सर्व उपाय करून पहा राज्यातील व इतरत्र जे तज्ञ असतील त्याना बोलावून त्याचा सल्ला घे मग

राजा— तें सर्व आता खपून गेलें आहे! प्रभुराज! माझ्या राज्यातील सर्व वैद्य झाले, मांत्रिक झाले, ज्योतिषी झाले, तांत्रिक झाले हे सर्व येऊन, पाहून, याजना करून, अखेर कांहींच न झाल्यामुळें आले तसे परत हात हालवीत निघून गेले! आता यापुढचं कोणी राहिलें नाहीं आपणच काय ते तेवढे शिल्लक राहिला आहा

**झोरोष्टर**— मग मी आता काय करावें, अशी तुझी इच्छा आहे?

राजा— आपलें दिव्यज्ञान व दिव्य प्रभाव जगाला दाखविण्याची ही एक अपूर्व व अमूल्य संधि प्राप्त झाली आहे. ही संधि गुरुदेवांनी वाया दवडूं नये, असें मला वाटतें. यावेळीं माझा लाडका अस्पिशियाद पूर्ववत् बरा करुन, मला व जगाला आपल्या महिम्याची जाणीव करुन द्यावी. हें मला योग्य दिसतें. या शिवाय आपली ओळख जगाला पटणार नाहीं. तर प्रभुराज एवढी कृपा करतील काय ! ती गोष्ट झाली तर मी खरें म्हणेन.

या त्याच्या भाषणातून एक गोष्ट झोरोष्टरास कळून चुकली कीं, राजाच्या मनात संशय-पिशाच्च अजून ठाण मांडून बसलें आहे. आपल्या बाबतीत निवळावी तशी त्याची बुद्धि अद्याप साफ निवळलेली नाहीं. दृढ व भरीव श्रद्धा व्हावी तशी जागृत झालेली नाहीं. तेव्हा आता आपल्या धर्मावर त्याची पूर्ण श्रद्धा व अढळ निष्ठा स्पष्ट बसल्याची आपली पूर्ण खात्री झाल्याशिवाय घोड्याचें संकट दूर करुन आपला प्रभाव दाखविणें हें काहीं श्रेयस्कर होणार नाहीं. याप्रमाणें विचार करुन त्याला प्रथम आपल्या वचनात गुंतवून घेण्याच्या उद्देशानें तो राजास म्हणाला ' *राजा ! तुझें म्हणणें सगळें ठीक आहे पण त्याला एक अडचण आहे. ती दूर झाली तर* तुझा हेतु साध्य होईल. आणि तुझा घोडा पूर्वीप्रमाणें बरा होऊन, तो सिंहासारखा पुनः प्रभाव गाजवू शकेल ! ती गोष्ट मी तुला करुन दाखवीन. पण ती अडचण दूर झाल्याशिवाय नाहीं.'

राजा– ती कोणती ! मला कळवाल कीं नाहीं !

**झोरोष्टर**– तुझी इच्छा सफल होण्याला–घोड्याचे पाय पुनः *पूर्ववत् बाहेर येण्याला–माझ्या धर्मावर तुझी पूर्ण श्रद्धा पाहिजे ! त्या धर्माच्या अहुरमज्द प्रभूवर आणि तसीच त्याच्या प्रेषितावर म्हणजे मजवर* तुझी अनन्य श्रद्धा असल्याशिवाय ही गोष्ट होणें नाहीं ! त्याचप्रमाणें माझ्या अवेस्ता ग्रंथावरहि तुझी श्रद्धा पाहिजेच ! सर्व असेल तर बाग.

राजा– महात्माजी ! माझा घोडा आधी बरा करानां.

**झोरोष्टर–** नाहीं, राजा, तीं गोष्ट होणें नाहीं ! या तुझ्या घोड्याचें काम साधें व सोपें समजू नकोस ! येथें व्यावहारिक विद्येचा अगर मनतंत्रादिकाचा अथवा ग्रहनक्षत्रादि ज्योतिर्विद्येचा काहीं एक उपयोग होणार नाहीं ! ही तुझ्या घोड्याची आपत्ति दैवी कोपानें ओढवली आहे. तर त्याला तसा मझ्दभक्तच पाहिजे तोच तें काम करू शकेल. इतराकडून हें शक्य नाहीं. असा हा पेंच आहे. आता तुझ्या मर्जीस येईल तसें कर !

राजा– मग मी आता काय करावं, हें आपणच सागा. तें करण्यास मी तयार आहे.

**झोरोष्टर–** याला अहुरमझ्द प्रभूची कृपाच पाहिजे ! त्या शिवाय हें शक्य नाहीं फक्त दैवी शक्तीच हें काम करू शकेल. असेल तुझा अहुर-मझ्द प्रभूवर विश्वास तर कळीव तसें मला यावियर्यी माझी खात्री पटण्याला माझ्या चार अटी आहेत. त्या तू मान्य केल्या पाहिजेस. त्या तूं मन पूर्वक पाळशील व त्याप्रमाणें कायावाचामनें वागशील याविषयीं अभिवचन पाहिजे मला तर तुझा घोडा मी बरा करून दाखवीन एरवी ती गोष्ट होणार नाहीं.

**झोरोष्टरचें** हें भाषण ऐकून त्याच्या जिवात जीव आला आपला घोडा बरा होण्याची आशा आहे, या विचारानें त्याला एकापरीं हायसें वाटलें व झोरोष्टरचा अद्भुत महिमा पाहून त्याचें मनहि पुन त्याच्या धर्माकडे झुकलें. त्याच्या अटी काय आहेत हें समजून घेण्याच्या इराद्यानें त्या अटी कळविण्याची त्यानें महात्म्याला विनति केली तेव्हा तो धर्मात्मा

– राजा ! त्या अटी अशातशा सागतां यावयाच्या नाहींत प्रथम तुझें मंत्रिमंडळ बोलाव मोठ मोठे सैन्याधिकारी जमीव. त्या सर्वांसमक्ष

मला प्रतिज्ञापूर्वक वचन दे. म्हणजे मग त्या मी तुला कळवीन. मला आता इतकी काळजी घेतलीच पाहिजे. असेल तुला कबूल, तर कर तशी तयारी

( झरथुष्टनामा ५०४–५०५ )

## दिव्य महिमा !

**झोरोष्टरच्या** सांगण्याप्रमाणें **विद्वतास्पानें** ती व्यवस्था केली झोरोष्टरनें तबेल्यांत जाऊन घोड्यावर नजर फिरविली केवढा सुंदर व उमदा प्राणी तो ! पण बिचारा आता अगदी खंगला होता ! त्याचे चारही पाय पोटांत शिरून रुतून बसले होते अर्थात् तो जमीन धरून बसला होता ! त्याची अवस्था फार शोचनीय व अनुकंपनीय झाली होती उघडच आहे पोटांत अन्न नाहीं, डोळ्याला झोंप नाहीं व मनाला चैन नाहीं ! रात्रंदिवस सारखी तळमळच तळमळ ! मग स्वास्थ्य व समाधान कोठून व कसे लाभणार त्याला ! त्या अस्पिशिहायला !

**झोरोष्टरनें** हें सर्व पाहिलें व ती आपत्ति कशी दूर करता येईल हें एकाग्र मनानें जाणलें आणि राजाकडे वळून तो त्याला म्हणाला– राजा ! ही आपत्ति फार मोठी आहे ! ही दैवी आपत्ति आहे ! ती प्रभुकृपाच व प्रभुभक्तच दूर करू शकेल ! इतरांना तें साध्य नाहीं येथें विद्वत्ता अगर पांडित्य, शास्त्र अगर मंत्र, यांचें काहींच काम नाहीं त्याचें येथें काहींच चालण्यासारखें नाहीं ! तुला मी स्वच्छ सांगतो कीं हें काम वाटतें तितकें सोपें नाहीं **अहुरमझ्दच्या** अनुग्रहानेंच हें होऊ शकेल अर्थात् जो त्याच्या कृपेस पूर्ण पात्र झाला असेल त्याचीच ही योग्यता आहे मी याला पूर्ववत् बरा करून दाखवीन पण प्रथम माझ्या अटी तुला मान्य कराव्या लागतील तसें झालें तरच तुझा घोडा बरा होईल एरवीं हें शक्य नाहीं

राजा– ज्ञानराज ! त्या अटी तरी समजू द्यात मला.

**झोरोष्टर**- ऐक सागतो तर, एकेकच सागत जातो ती पूर्ण झाली म्हणजे दुसरी मग यांप्रमाणें माझ्या अटी सागत जातो

राजा- ( मान हलवून )-बर

**झोरोष्टर**- माझी पहिली व मुख्य अट ही की, मी अहुरमझ्दचा प्रेषित आहे, यावर तुझी अत करणपूर्वक भरीव श्रद्धा पाहिजे त्याचप्रमाणे अहुरमझ्दवर व अवेस्ता ग्रथावरहि तशीच निष्ठा व भक्ति पाहिजे ! अर्थात् तू माझा धर्म पूर्णत्वानें स्वीकारावयास तयार झाला पाहिजेस ! त्यात कसलीहि कसूर अगर काळेंबेरें असून चालणार नाहीं ! त्यात काही व्यग राहील तर तुझा घोडा बरा होणार नाहीं ! आहे ही माझी अट कबूल तुला ?

राजानें मान हालवून आपली सम्मति दिली आणि म्हटलें-झोरोष्टरा ! हें माझें वचन या मन्त्रिमडळासमक्ष व सैन्याधिकाऱ्याना साक्षी ठेऊन दिलें आहे तें तू सत्य समज माझा घोडा बरा होताच मी तुझा धर्म मन पूर्वक स्वीकारून, त्याप्रमाणें आचरण करून तो जगात सर्वत्र पसरेल व जगमान्य होईल असें करीन ! व तत्प्रीत्यर्थ अहोरात्र सतत झटत राहीन ! यात काहीमात्रहि कसूर करणार नाहीं हें माझें वचन सत्य सत्य-त्रिवार सत्य-समज ! ›

नतर महात्मा **झोरोष्टरनें** आकाशाकडे दृष्टि लावुन, या कार्यात यश येण्याबद्दल सर्वसमर्थ **अहुरमझ्द** देवाची प्रार्थना करून त्याची कृपा भाकली आणि घोडयाजवळ जाऊन आपल्या पवित्र व दिव्य हस्तानें त्याच्या पोटावरून हात फिरविला तों काय चमत्कार ! त्या **अस्पोशियाचा** पुढचा उजवा पाय सट्दिशी बाहेर आला ! हें पाहून तेथील सर्व लोक आश्चर्यचकित झाले ! राजा आनदमरित झाला ! सर्वांच्या तोंडावर मधुर हास्य चमकलें ! राजाची आता झोरोष्टरावर पूर्ण श्रद्धा बसली व

वचन दिल्याप्रमाणें सर्व लोकांसमक्ष त्याच्या धर्माचा स्वीकार करून, गावात त्याप्रमाणें त्यानें दवंडी पिटविली !

नंतर राजा म्हणाला– 'आता तसाच दुसरा पायहि बाहेर येऊं दे कीं !'

**झोरोष्टर**– येईल. येईल. तोहि येईल पण माझी आणी दुसरी अट मान्य झाली पाहिजे

राजा - ती कोणती ?

**झोरोष्टर**- ती ही तुझा मुलगा **अस्पंदीयार** यास येथें बोलावून आण. आणि माझ्या समक्ष त्याजकडून अशी प्रतिज्ञा करीव कीं, अहुरमझ्दचा धर्म स्वीकारून त्या धर्माचा मी सर्वत्र प्रसार व प्रचार करीन व जो कोणी त्याला अडथळा करण्यास प्रवृत्त होईल त्याच्याशी लढून त्याचें पारिपत्य करीन म्हणून

राजानें आपल्या मुलास बोलावून आणून, **झोरोष्टरच्या** सांगण्याप्रमाणें वागण्यास त्यास वचन देण्यास सांगितल्यावरून **अस्पंदीयारनें** आपला हात त्या महात्म्याच्या हातावर ठेऊन उच्च स्वरात घोषणा केली कीं, 'माझ्या कुडींत प्राण असेतोपर्यंत मी हुअरमझ्द धर्माच्या सेवेंत, त्याच्या उत्कर्षार्थ व प्रसारार्थ कायानाचामनें अहोरात्र सारखा झिजत व झटत राहीन ! यात तिळप्रायहि अंतर करणार नाहीं ! हें वचन मी माझ्या प्राणाच्या मोलाने पाळीन ! व साऱ्या जगात अहुरमझ्दधर्माचा प्रभावी झेंडा वैभवानें मिरवीत राहील असें करीन !! हें मी प्रतिज्ञापूर्वक सांगतो !!'

याप्रमाणे राजपुत्र **अस्पंदीयारकडून** वचन घेतल्यावर झोरोष्टरनें पुन: अहुरमझ्दची प्रार्थना करून त्याची कृपा भाकली आणि घोड्याजवळ जाऊन त्याच्या पोटावरून हात फिरविला, तों त्याच्या पोटातून उजव्याबाजूचा मागचा पाय बाहेर आला ! हें पाहून राजानें व तेथील लोकांनी त्याची खूप स्तुति व तारीफ केली

नंतर **झोरोष्टर** राजाकडे वळून म्हणाला– ' राजा ! आता माझी तिसरी अट सागतो ती ऐक ! तुझ्याप्रमाणेंच तुझ्या राणीनेंहि माझा धर्म स्वीकारला पाहिजे आणि यासाठीं मला तिची भेट घ्यावयाची आहे तर मला ती परवानगी दे ! राजाने ती गोष्ट मान्य करून आपला एक विश्वासु सेवक त्याच्याबरोबर देऊन तिच्याकडे त्याला पाठवून दिले

झोरोष्टर तेथें गेल्यावर त्या **हुतौशी** राणीला उद्देशून म्हणाला हे महाराज्ञि ! जगत्कर्त्या अहुरमझ्दनें तुजवर मोठी कृपा केली आहे त्याच्याच कृपेनें तुला हें राज्ञिपद प्राप्त झालें आहे ! तू मोठी भाग्यवती आहेस ! **विश्तापसारखा** विद्वान व महापराक्रमी पुरुष तुला पति मिळाला असून, स्त्रीजगावर तुझा अधिकार चालत आहे तुझें वैभव अनुपम असून जगात ज मून तू धन्य व कृतकृत्य झाली आहेस ! प्रेषित म्हणून मला अहुरमझ्दची अशी आज्ञा झाली आहे, कीं लोकाना सत्य–धर्माचा उपदेश करून जगामध्यें त्याचा प्रसार करावा लोकांत प्रचलित असलेले मिथ्या आचार व विचार यांचें उच्चाटन करून, लोकाना सन्मार्ग दाखवून त्याना सुखी करावें म्हणून तुला माझी शिफारस आहे कीं, तुझे जे मिथ्याचार असतील व अडाणी समजुती असतील, त्या सर्वांना मूठमाती देऊन माझ्या सत्य व उदार धर्माचा तू स्वीकार करावयास ? व त्याप्रमाणें तू स्वत आचरण करून, त्याची महती तुझ्या स्त्री जगात वाढवून त्याचा तेथें प्रसार करावास ! या माझ्या धर्माप्रमाणे तू वागशील तर इहपरलोकीं तुझें कल्याण होऊन तू शाश्वत सुखी होशील शिवाय माझ्या धर्माचा मनोभावें स्वीकार केल्यानेंच **अस्पेसियाह** घोड्याचा तिसरा पाय बाहेर येईल ! नाहीं तर नाहीं !

हें त्या महात्म्याचें भाषण ऐकून राणीला परम हर्ष झाला व ती उल्हसित अंत करणानें म्हणाली हे महानुभावा ! मला तुझी कीर्ति पूर्वींच कळली आहे व तुझा महिमा तर आता प्रत्यक्षच पहात आहे मला तुझ्या

धर्माविषयी व तुम्हाविषयी फार आदर असून श्रद्धाहि पण तितकीच दृढ आहे ! मी तुम्हा धर्म आस्थापूर्वक स्वीकारून तनमनधनानें त्याप्रमार्गे आचरणहि करतें यात तिळभर अंतर करणार नाहीं हें तिचें भाषण ऐकून त्याला अत्यंत आनंद झाला

नंतर तो तेथून निघून पुन. घोड्याजवळ आला तेथें आल्यावर अहुरमज्दची प्रार्थना केली व घोड्याजवळ जाऊन त्याच्या पोटावरून हात फिरवितांच त्याच्या डाव्या बाजूला पुढचा पाय सटरन् बाहेर आला ! ! तथील लोकानी ता चमत्कार पाहून त्याचा मोठा जयजयकार केला ! !

(झरथुष्नामा, पृ ०७) पृ ६२–६३

## गुह्य स्फोट

आता चौथी व शेवटची अट झोरोष्टरनें मागितली ती अशी — राजा ! आता माझी चौथी अट अशी आहे कीं, मी ज्या खोलींत निजत होतो त्या जागेंत तीं हाडें, मुडकीं, केंस इत्यादि पदार्थ जे सापडले ते तेथें कसे आले, याचा तपास झाला पाहिजे ! याविषयीं माझ्या पहारेकऱ्याला बोलावून आणून, त्याला तरी देऊन चांगला छडून काढलील तर सगळी हकीकत बाहेर आलीच म्हणून समज यांत काहीं कसूर झाली अगर राहिली तर चौथा पाय घोड्याचा बाहेर येणार नाहीं ! कसून चौकशी कर म्हणजे खरा प्रकार उघडकीस आलाच म्हणून समज यात त्या पहारेकऱ्याचाच अंग असलेंच पाहिजे ! त्याशिवाय ती गोष्ट होणेंच नाहीं ! खरी हकीकत त्याला ठाऊक असलीच पाहिजे तर लाग आता त्या कार्याला !

याप्रमाणे झोरोष्टरनें आपली चौथी अट सांगितल्यावर राजानें तात्काळ दूत पाठवून त्या पहारेकऱ्याला पकडून आणून त्याला आणून

पुढें केल्यावर राजा त्याला गंभीर स्वरात ह्मणाला—' अरे, तू झोरोष्टरच्या पहारेकरी होतास ना ! मग आता विचारतो तें सर्व खरें सांग ! आणि खरें सांगशील तरच सरळ सुटशील ! तुझा सर्व अपराध माफ आहे असें समज आणि जर का खोटेंनाटें बोलशील, छपवाछपवी करशील, अगर भलतेंसलतें सांगशील तर याद राख ! ( कमरेतील तलवारीवर हात ठेवून ) ही पहा माझी तलवार ! तेथल्या तेथें तुझें मुंडके जमिनीवर पडलें म्हणून समज ! मग आता सांग, खरें सांग, पुन बजावून सांगतो, सर्व हकीकत–काही एक छपवून न ठेविता– आहे तशी सांग ! झोरोष्टरच्या खोलींत तीं हाडें, मुडकीं, केंस, नखे वगैरे पदार्थ कसे आले व कोठून आले ! कोणाची भीडभाड न धरता, धाकभीतीला न वचकता जें खरें असेल तें सरळ सांग आणि आपला जीव वाचीव ! मी राजा तुला विचारीत आहे व तुझ्याशी बोलत आहे, हें लक्षात घे ! खरं सांगशील तर सरळ सुटशील नाहींतर तुला जीव नकोसा झाला आहे असें मी समजेन कोणता प्रसंग आहे व कोणाशी गाठ आहे याची पूर्ण दखलगिरी ठेव ! आणि अक्षरन् अक्षर न चुकता खरें सांग ! मग आता सांग खरें काय तें

राजाचें हें धमकीवजा स्पष्ट भाषण ऐकून तो पहारेकरी मनातल्या मनात फार चपापला खोटें बोलून आपली सुटका होणार नाहीं हें त्या रंगावरून त्यास पूर्ण कळून चुकलें शिवाय झोरोष्टरचा तो सर्व चमत्कार व प्रभाव डोळ्यानें पाहून व राजाचें प्रत्यक्ष अभयदान मिळालें ही गोष्ट विचारात घेऊन, त्यानें घडलेली सर्व हकीकत राजास संपूर्ण निवेदन केली ! तो ह्मणाला ' राजन् ! महात्मा झोरोष्टर पूर्ण निष्पाप व निरपराधी आहे ! आपल्या दरबारी पंडिताचा तो सगळा कुत्सित डाव असून सर्व अनर्थाला तेच कारण आहेत ! महात्म्याचें यात काहीं एक अंग नाहीं ! त्या पंडितानीं मजवर वजन घालून, शिवाय वर बक्षिसाची लालूच दाखवून मला

मुरळ पाडली ! पैशाच्या व बढतीच्या लालुचीला मी बळी पडलो व झोरो–ष्टर नसताना त्याच्या खोलीच्या किल्ल्या मी त्याच्या स्वाधीन केल्या !

हें त्या पहारेकऱ्याच्या तोंडून निघालेलें भाषण ऐकून राजा आश्चर्य-चकित झाला व मनात विरमला व चरकलाहि ! नतर तो त्या पहारेकऱ्यास म्हणाला– मग तू मागें जें सागितलेंस तें खोटें सागितलेंस ! असेंच ना ? सत्पुरुषावर तू खोटा आरोप केलास ! त्याची नाचक्की केलीस ! त्याला छळण्यास तू कारण झालास ! असेंच कीं नाहीं ?

तो पहारेकरी– राजन् ! मी भ्यालो ! वशिलाला भुललो ! स्वार्थाला बळी पडलो ! ते पडित लोक मोठे प्रतिष्ठावत व वजनदार लोक असल्यामुळें त्याची भीड मला मोडवली नाहीं शिवाय त्यानी मला धमकीहि दिली व भीतिहि घातली ! मागें खोटें बोललो त्याला त्याची भीति, धमकी व लाङूच हेंच कारण !

राजा– मग आता हें जें तू सागत आहेस तें तरी खरें कशावरून ! तू पक्का लबाड दिसतोस !

पहारेकरी– नाहीं ! राजन् ! आता जें सागितलें त्यात अक्षरहि खोटें नाहीं ! त्या लोकानी माझ्याकडून किल्ली घेऊन दार उघडलें व आत जाऊन त्यानीच ते पदार्थ तेथें छपवून ठेविले ! राजन ! ही अशी खरी हकीकत आहे खरें बोलून आता जीव गेला तर जाऊदे !!

पहारेकऱ्याचें हें भाषण ऐकून व **झोरोष्टरचें** त्यावेळचें भाषण पडताळून पाहून राजाची खात्री पटली व त्या पडित लोकाचा हा दुष्टाव पाहून त्याचा राग आता शेंडाच्या टाळूस जाऊन पोंचला ! क्षणाचाहि विलब न करता तावडतोब दूत पाठवून त्यानें त्यास पकडून आणलें आपलें बिंग बाहेर पडलें हें त्या कारस्थानी लोकास कळताच त्याचें धाबेंच दणाणलें !

व चेहरा कावरानावरा झाला ! राजापुढें त्याना आणून उभे करताच त्या पहारेकऱ्यानें त्याच्याकडे बोट करुन 'हेच ते पंडित ! राजन् !' असें ह्मणताच त्याचीं तोंडें एकदम काळीं ठिक्कर पडलीं ! राजानें त्याना प्रश्न केला, पण खाली मान घालून दगडाप्रमाणे ते गप्प बसले ! त्याची जीभ हलेना कीं तोंडावाटें शब्द निघेना !

त्याची घाबरट स्थिति व काळवंडलेले चेहरे पाहून राजाची खात्री झाली व तो रागानें लाल होऊन त्यास उद्देशून ह्मणाला— मूर्खांनो ! धिक्कार असो तुह्माला ! तुमच्या पांडित्याला ! नि तुमच्या धर्मज्ञानाला ! किळसवाणें कृत्य करून सत्पुरुषावर नाहक तोहमत लादून त्याचा अपमान व छळ करण्यास कारणीभूत झालेल्या तुह्मासारख्या दुष्ट गुन्हेगाराना जिवंत ठेवणें हें मी पाप समजतो ! तुमचा गुन्हा इतका हीन व हिडिस आहे कीं तुह्मास देहांत प्रायश्चित हेंच त्याचें योग्य बक्षिस आहे ! आणि मी तेंच प्रायश्चित तुह्मास बजावतो ! (दूतास उद्देशून) यास गावातून फिरवून रानात नऊन जिवें मारा ! जा चला घेऊन या राक्षसाना ! दुष्ट पाप्याना !!

राजाज्ञेप्रमाणें दूतानी त्यास ताब्यात घेतलें पण इतक्यात महात्मा पुढें होऊन त्यानें त्याना जीवदान देण्याविषयीं रदबदली केली व राजानें त्याच्या इच्छेला मान देऊन त्यास राज्यातून हद्दपार केलें ! केंवढें हें थोर नि उदार अंत करण त्या साधुपुरुषाचें !

हें झाल्यावर त्या घोड्याचा चौथा पायहि बाहेर आला व तो चटकन् उठून चारी पायावर उभा राहिला ! अर्थात् घोडा आता पूर्वीप्रमाणें तरतरीत होऊन, चांगला तयार झाला !! याप्रमाणे महात्मा झोरोष्टरचें दिव्य सामर्थ्य लोकाच्या नजरेस येऊन, जिकडे तिकडे त्या मज्दभक्त महर्षीच्या महात्म्याची व यशाची नौबत झडून, जयजयकारानें दशदिशा दुमदुमून गेल्या !

(झरथुष्ट्रनामा, ५०७)

## अग्निमंदिरांची स्थापना व बीज अंकुरलें !

महात्मा **झोरोष्ट्राच्या** अवेस्ता धर्माचा आता प्रभातकाल उजाडला ! राजा **विश्तास्प** यानें त्या धर्माची दीक्षा घेऊन झोरोष्ट्रपंथी बनल्यानंतर सर्वच रंग पालटला. राजाच्या मागोमाग अस्पदीयारनेहि आपल्या बापाचें अनुकरण केलें ! त्याच्या मागोमाग त्याची आई **हुतओसा** इनेंहि झोरोष्ट्रपंथ स्वीकारला ! इतकें झाल्यावर मग आणखी काय पाहिजे ? दरबारी लोकांतहि ती चळवळ सुरू झाली. राजाचा मुख्य प्रधान **जामास्प** व त्याचा भाऊ **फरशोस्तर** हे दोघेहि त्या पंथात पुढें लवकरच दाखल झाले. याप्रमाणें झोरोष्ट्र धर्मांत बडेबडे लोक प्रविष्ट होऊन त्या धर्माला देशात महत्वाचें स्थान प्राप्त झालें.

अवेस्ता धर्मांत अग्निनारायणाची उपासना मुख्य व आवश्यक म्हणून सांगितली असल्यामुळें अग्निनारायणाच्या उपासनेसाठीं मंदिर उभारणें आवश्यक झालें. म्हणून विश्तास्पाच्या धर्मांतराचें संस्मरणीय स्मारक म्हणून **रिश्मार** येथें एक सुंदर अग्निमंदिर बांधण्यांत आलें व तेथें **खोरासान** येथील **सोव्हर** सरोवराच्या सन्निध असलेल्या **रयिवन्त** पर्वतावरील '**बूर्झिनमेहर**' ( मित्र ) या नावाचा अग्नि आणून, त्याची तेथें मोठ्या समारंभानें स्थापना करून, त्या मंदीराच्या दारापुढें गुरु झोरोष्ट्रनें आपल्या हातानें **साधप्रस** ( सुरुचें झाड ) लावलें. विश्तास्पाचे एकंदर तीन अग्नि प्रसिद्ध असून, त्यातलाच '**बूर्झिनमेहर**' हा एक होय

विश्तास्पाच्या नावावर एकंदर तीन अग्नि प्रसिद्ध असून त्यापैकीं बूर्झिनमेहर हा एक असुन, त्याशिवाय आणखी दोन अग्नि आहेत. त्यातला एक **आतर फ्रोबा** असून, तो आथ्रवन लोकांना म्हणजे इराणी पुरोहित वर्गाचा अग्नि आहे. तो सर्वांत श्रेष्ठ प्राचीन व पवित्र असा असून,

इराणातल्या प्राचीन **यिम** राजाच्या पुराणकालापासून अस्तित्वात होता, अशी त्याची आख्यायिका आहे तो क्यास्पियन समुद्राच्या पूर्वेकडे असलेल्या **खोरासान** प्रांतात प्रथम असून, पुढें विश्तास्पानें त्याला तेथून हलवून 'काबूल' येथें त्याची स्थापना केली. हें **काबूल** (कानूल) शहर पूर्वी व्याक्टीरियांत मोडत असे तिसरा अग्नि म्हणजे **आतर घुशास्प** हा होय. हा इराणी क्षत्रियांचा उपास्य अग्नि असून, तोहि जुना-पुराणाच होय कवि **खुस्रव** यानें मूर्तिपूजेचा जेव्हा विध्वंस केला, त्यावेळीं या अग्नीनें मोठी कामगिरी बजावली असें सांगण्यात येतें हा '**उरमाय**' सरोवराजवळील '**अस्तवंत**' पर्वतावर असून तो विश्तास्पाच्या भेटीच्या-वेळीं देवदूतांबरोबर होता असें झोरोष्टरनाम्यांत म्हटलें आहे. विश्तास्पानें आपल्या राज्यांत प्रसंगोपात् जीं अनेक अग्निमंदिरें बांधलीं, त्यांपैकीं हे वरील तीन अग्नि प्रसिद्ध आहेत व त्यांचा संबंध प्रत्यक्ष विश्तास्पाशीं अधिक येत *असल्यामुळें ते झोरोष्टरधर्मांत त्यांच्या नांवावर मोडतात अर्थात्* या झोरोष्टर धर्माच्या उदयापासून इराणांत अग्निपूजेला महत्व येऊन, पुढें जिकडे तिकडे त्यांचीं मंदिरें पसरत गेलीं अशारीतीनें अवेस्ता धर्माचें बीज सीस्टानमध्यें रुजून तें चांगलें वाढीस लागलें।

## लोहरास्पाचें धर्मांतर

पुढें कांहीं दिवसांनीं विश्तास्पाचा बाप **लोहरास्प** हा आजारी पडला विश्तास्प हा झोरोष्टरपंथी झाला होता तरी लोहरास्प हा सनातन पंथींच होता त्याला झोरष्टर धर्म मान्य नव्हता तो आजारी पडल्यावर पुष्कळ औषधोपचार झाले राजवैद्य येऊन प्रकृति तपासून दररोज औषध देऊन जात असें पुष्कळ दिवस चाललेंच चाललें पण प्रकृतींत कांहीं उतार म्हणून नाहीं उलट दुपटीनें वाढतच चाललें पुढें औषधा-

बरोबरच मग्रतग्रहि चालू केले ज्योतिषाचा सल्लाहि घेतला पण गुणाची गोष्टच नाहीं ! सर्व वैद्य झाले, सर्व मांत्रिक झाले, सर्व ज्योतिषी झाले ! प्रत्येकानें आपापल्यापरी शिकस्त करून पाहिली. वैद्याचे मात्रा–काढे संपले, मांत्रिकाचे मंत्र–तंत्र थकले, ज्योतिषाचे ग्रह–तारे विफल ठरले ! कोठेंच य कोणालाच यशाचें माप पदरीं पडण्याचें लक्षण दिसेना बिचारा लोहरास्प ! अगदींच थकला ! अगोदरच म्हातारा ! शांभरी उलटून गेलेली ! आणि त्यात हा आजार ! सर्वस्वी तो आता पराधीन होऊन जमीन धरून पडला होता ! शेवटीं शेवटीं तर तो अगदींच निराश झाला आणि जिवाला कटाळलाहि ! अर्थात् आता तो मरणाचीच वाट पहात होता सर्वांनी त्याची आशा जवळजवळ सोडूनच दिली होती, असें म्हटलें तरी चालेल

ही बातमी एके दिवशीं महात्मा झोरोष्टरच्या कानावर आली आप्तइष्ट, सगेसोयरे, व इतर कणगुबंधी त्यास येऊन भेटून जाऊं लागले अर्थात् त्याच्या मतें तें त्याचें शेवटचेंच दर्शन होतें आत' झोरोष्टरहि त्याच्या भेटीस म्हणून आला तो आलेला पाहून म्हातारा उठून बसण्याचा प्रयत्न करूं लागला. पण तें त्याला साधेना! झोरोष्टरनें त्याला उठण्याची तसदी न घेण्यास सांगून त्याच्या जवळ बसून, त्याचा हात धरून प्रेमळ शब्दांत त्याच्याशी बोलून त्याच्या चेहऱ्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहिलें. ज्याच्यावर ईश्वरी प्रसाद झालेला असतो, त्यांच्या दृष्टीत काय जादू असते कोण जाणे ! झोरोष्टरनें म्हाताऱ्याचा हात धरून त्याच्याकडे पाहिले मात्र, तोंच त्याच्यात विद्युत् संचार झाल्यासारखें होऊन तो चटकन् उठून बसला ! त्याच्या जळत्या काळजावर जणु काहीं अमृतवृष्टीच झाली !

झोरोष्टरनें आरमझ्दाची प्रार्थना करून त्याच्या अंगावरून हात फिरविला न फिरविला तोंच त्याच्या सर्वांगांत नवचैतन्य संचरून, जिवाला

आराम वाटूं लागला ! नंतर जातांना झोरोष्टरनें त्यास भिण्याचें कारण नाहीं, प्रकृति लवकरच सुधारेल असा धीर देऊन तेथून तो उठून गेला. पुढें क्षणभरानें त्यास गाढ झोंप लागली पुढें जागा झाल्यावर त्याला चांगली हुशारी येऊन तेव्हांपासून प्रकृति दिनेदिने निवळत चालली ! पुढें लवकरच तो रोगमुक्त होऊन पूर्वीप्रमाणें चांगला ठणठणीत झाला ! या दिवसा–पासून त्याची महात्म्यावर श्रद्धा बसून पुढें तो झोरोष्टर धर्माची दीक्षा घेऊन, अवेस्थापंथी बनला ! बापाच्या पाठोपाठच त्याचा दुसरा मुलगा म्हणजे विश्तास्पाचा धाकटा भाऊ झरीर यानेंहि त्या पंथात पदार्पण केलें ! अर्थात् आता सबंध सर्वि राजघराणें झोरोष्टर पंथ स्वीकारून, अवेस्था पंथी बनलें !

---

## इच्छा–प्रदर्श

विश्तास्पाचें धर्मज्ञान झोरोष्टरच्या नित्य व दिव्य उपदेशामुळें दिवसेंदिवस वाढत व उजळत चाललें. याचा परिणाम असा झाला कीं, अवेस्ता पंथातील धर्मज्ञान व तत्वज्ञान यथार्थ समजून घेतल्यावर अहुरमज्द देवाचा तो स्वर्ग आहे तरी कसा व तेथें मरणोत्तर आपल्याला कोणतें स्थान लाभणार, हें प्रत्यक्ष पहावयास मिळालें तर बरें, असें त्यास वाटूं लागलें व तसें वाटणें हें स्वाभाविकच आहे शिवाय त्याला अशा काहीं बाबतीत झोरो-ष्टर धर्माची काहीं तत्वें पडताळून पहावयाचीं होतीं त्याबरोबरच आणखी काहीं गोष्टी त्याला इच्छाशा वाटत होत्या.

तेव्हां ते दोघेच प्रथम बोलून चुकल्यांपैकीं गोष्टीवरून गोष्ट काढून बदल तो त्यास म्हणाला–गुरुराज ! आपण सांगितल्या त्या चारहि अटी मी मान्य करून त्या आचरणांत आणल्यामुळें,

झोरोष्टर— मग आतां तुझें म्हणणें काय ?

राजा— आता मला आपला सदुपदेश ऐकून काही गोष्टींची इच्छा झाली आहे ती आपण पूर्ण कराल तर मजवर फार मोठे उपकार होतील ! होईल का ती कृपा गुरुमाउलीची ?

झोरोष्टरः—राजन् ! अशा मोघम भाषणानें मी काय समजू ? तुझें इद्गत स्पष्ट करशील तर त्याचा विचार करतां येईल

राजा—गुरु महाराज ! तसें म्हटल्यास त्या काही तशा महत्वाच्या नाहींत. पण मनात तशी हौस झाली आहे

झोरोष्टर—काय आहे इच्छा तुझी ?

राजा—माझ्या एकंदर चार इच्छा आहेत.

झोरोष्टर—त्या कोणत्या ?

राजा—पहिली इच्छा ही कीं, मी मेल्यावर मला कोणती गति प्राप्त होईल, हें मला प्रत्यक्ष पहावयास मिळावें अर्थात् अवेस्ता ग्रंथात सांगितलेला अहुरमझ्द प्रभूचा स्वर्ग कसा आहे व तेथें माझें स्थान काय व कोठें आहे, हें मला ' याच देहीं याच डोळा प्रत्यक्ष पहावयास मिळावें

*झोरोष्टर—इच्छा काही गैर नाहीं बरें, तुझी दुसरी इच्छा कोणती ?*

राजा—माझी दुसरी इच्छा म्हणजे अशी कीं, या आपल्या धर्माचा जे द्वेष करतात, व जे त्याला विरोध व अडथळा करतात, त्या दुष्टांशी लढून त्यांची खोड जिरविण्याचें मला सामर्थ्य लाभावें ! व तसें करताना मला लढाईंत कसल्याहि शस्त्रास्त्रानें इजा होऊं नये ! अर्थात् मी वज्रदेही असावें !

झोरोष्टर— यांतहि काही वाईट नाही

राजा– आता माझी तिसरी इच्छा ऐका. ती अशी कीं, मला भूत, वर्तमान व भविष्य या तीनहि कालाचें ज्ञान होईल अशी दिव्य शक्ति प्राप्त व्हावी ! अर्थात्, गुरुदेवा ! मी त्रिकालज्ञ व्हावें !

झोरोप्टर- बरें, तेंहि चागलेंच आहे. आतां तुझी चौथी इच्छा काय, हें कळूंदे मला.

राजा– माझी चौथी व शेवटची इच्छा ह्मणजे ही कीं पुनरुत्थान ( रस्ताखेज ) होईपर्यंत माझे प्राण व माझे शरीर याची ताटातूट होऊ नये ! अर्थात् मला मधेंच मरण येऊ नये ! मी चिरंजीव होऊन रहावें ! या अशा माझ्या चार इच्छा आहेत. गुरुदेव मनावर घेतील व कृपा करतील तर त्या पुऱ्या करण्यास समर्थ आहेत ! त्याची दिव्य शक्ति अमोघ आहे ! मग या शिष्यावर गुरुदेवाची तशी कृपादृष्टि होईल काय ? गुरुदेव मला धन्य करणार नाहींत काय ?

झोरोष्टर– राजन् ! तुझ्या या इच्छा सगळ्या चागल्याच आहेत. व त्या पूर्णहि करता येतील नाहीं असें नाहीं. पण–

राजा– पण काय ? गुरुदेव ! त्या ' पणा 'चें नाव ऐकून माझें मन मुचकळ्यात पडतें की ! त्याचें नाव न काढाल तर नाहीं का चालणार ? मला आपण निराश करणार काय ?

झोरोष्टर– असें निराश होण्याचें कारण नाहीं. त्याचा अर्थ इतकाच की, तुझी इच्छापूर्ति होईल पण त्या सगळ्याचा फायदा एकाच व्यक्तीला मिळणार नाहीं. फक्त एकेकाला एकेकच तुझी इच्छा लाभेल असेल तशी इच्छा तुझी, तर साग चार लोकाची नांवें. एकेकाला एकेक इच्छा देऊन, तुझे मनोरथ पूर्ण करीन !

आपल्या चारहि इच्छा एकाच माणसाला लाभणें हें शक्य नाहीं, हें झोरोष्टरचें भाषण ऐकून राजाला मनात जरासा विरस झाल्यासारखा झाला तथापि त्यातल्या त्यात त्याला एकप्रकारचें समाधानहि वाटलें नतर तो म्हणाला– गुरुदेव ! आपल्या शब्दाच्या बाहेर मी नाहीं चारहि इच्छा मला एकालाच लाभण्यासारख्या नसल्या तर नसोत ! त्या चौघाला लाभतील या आपल्या आश्वासनानें देखील मला आनद वाटतो माझ्यापुरतें बोला म्हणावयाचें झालें तर माझी इच्छा अशी आहे की, *मला मरणोत्तर स्वर्गांत* कोणतें स्थान मिळेल, याचें मला प्रत्यक्ष या डोळा या देहींच दर्शन घडावें

यावर **झोरोष्टर** उत्तरला–बरें, तुझी ती इच्छा पूर्ण होईल योग्य *वेळ येताच तुझी इच्छा पूर्ण करण्यात येईल आता बाकीचे तीन वर* कोणा कोणाला लाभावेत हें सांग !

राजा–माझा दुसरा वर आहे तो माझ्या मुलाला म्हणजे **अस्पदीयारला** मिळावा आणि तिसरा जो वर आहे तो माझा मुख्यमत्री **(जामास्प)** यास लाभावा माझा चौथा वर तो माझा दुसरा मुलगा **पेशोतन** याच्या पदरात पडावा ही अशी माझी इच्छा आहे

'तथास्तु' म्हणून **झोरोष्टर** तेथून उठून बाजूस जाऊन त्याने अहुरमझ्दची मनापासून प्रार्थना केली आणि त्या प्रार्थनेला 'ओ' देऊन त्यास अतरगातून सूचना दिली कीं, त्या सर्व गोष्टी यथाकाल पुऱ्या केल्या जातील काळजी करण्याचें कारण नाहीं नतर झोरोष्टर राजाजवळ येऊन म्हणाला 'राजन् ! तू आता निश्चित ऐस तुझ्या इच्छा पूर्ण होतील पण आताच्या आता नाहीं त्याला काहीं कालावधि पाहिजे विस्तास्पानें 'बरें' म्हणून तेवढ्यावरच तो विषय सपविला

अहुरमझ्दनें 'यथाकाल' असें सांगितलें, याचें कारण असें कीं विस्तास्प काय, अस्पदीयार काय, जामास्प काय किंवा पेशोतन काय,

कोणीहि अद्याप त्या वरपूर्तीस पूर्ण पात्र झालें नव्हतें झोरोष्टरचा अवेस्ता धर्म याच्यात बाणावा तसा पूर्ण बाणला नव्हता अगात पूर्ण योग्यता व पात्रता आल्यावाचून स्वर्गातील देवराजा कोणालाहि कसलाहि वर देत नसतो असा हा स्वर्गातील देवाचा कोठें झालें तरी आणि केव्हा झालें तरी निरपवाद नियमच आहे ! मग तो झोरोष्टरचा अहुरमझ्द असो, मोशेचा यव्होवा असो, खिस्ताचा देवबापा असो अथवा महमद पैगंबरचा अल्ला असो, असा कोणी जरी असला तरी योग्यता पाहूनच वरदान करण्याचा त्याचा सर्वसामान्य संप्रदाय आहे ! 'प्रथम निग्रह आणि मग वरदान' असा कोणत्याहि देवाचा सारखाच कटाक्ष आहे ! अशाच प्रकारचा मजकूर भगवान् बुद्ध बिंबिसार राजाच्या प्रथम भेटींत घडलेला आढळून येतो असो

---

## वरप्रमाद

राजा विश्तास्प हा स्वभावानें अत्यंत सात्विक व भाविक वृत्तीचा असल्यामुळें त्याची श्रद्धा व भक्ति अवेस्ताधर्मावर पुढें एकरूपच दृढ–मूल होऊन, तो झोरोष्टर पयाचा महाज्ञानी व अनन्य भक्त बनला एके दिवशीं महात्म्याला शेजारी बसवून घेऊन दरबारात कांहीं बोलत बसला असतां मधेंच बाहेरचा एक द्वारपालक धापा धापा टाकीत तेथें धावत येऊन राजास म्हणाला- राजन् ! बाहेर कोणीतरी चार घोडेस्वार आले आहेत त्यांची ती हत्यारें पाहून आमचे डोळे दिपून गेले ! सूर्याप्रमाणें चमकत आहेत तीं ! आणि तो त्यांचा पोशाख झाला तरी काय ! तसाच साठा शुभ्र व दिव्य ! असे पुरुष आम्ही आजपर्यंत पाहिले नाहींत ! काय तो चेहरा ! काय तें तेज ! महाराज ! त्यांच्याकडे पाहून आमची तर

गाळणच उडाली ! आह्मी घाबरून भांबावून गेलो ! आणि आपणाला ही हकीकत विदित करावी ह्मणून मी येथें धावून आलो !

हा मजकूर तो द्वारपाल राजास सांगतो न सांगतो तों इतक्यात ते स्वार घोड्यावरून उतरून आत आलेच ते चौघे असून अहुरमझ्दचे देवदूत होते ! त्यातला एक **वोहुमनो** असून, दुसरा **अशावहिस्त** हा होता तिसरा जो होता तो **हउर्वतात्** हा असून, चौथा **आदर विश्तास्प** हा अग्नि होता ! या सर्वांचा पोशाख शुभ्र व झगझगीत असून, तोंडावर दिव्य कांति तळपत होती !

तेथें आल्यावर त्यांच्यापैकी वोहुमनो पुढें होऊन त्यास ह्मणाला— 'राजन् ! आम्ही अहुरमझ्द परमेश्वराकडून आलो आहो त्यानेंच आम्हास येथें पाठविलें आहे त्याचा तुला निरोप असा आहे कीं, (**झोरोष्टरकडे** हात करून) हा जो महात्मा **झोरोष्टर** आहे, तो आमच्या अहुरमझ्द प्रभूचा या जगातला प्रेषित असून, अवेस्ता धर्माचा तो आद्य संस्थापक व प्रचारक आहे ! सर्व जगानें त्या धर्माचें ज्ञान करून घेऊन त्याप्रमाणें वागावें व आपला मानवजन्म धन्य करावा, असा त्या जगन्नियंत्याचा शुभ आदेश आहे ! ह्मणून तुला विनंति करण्यात येत आहे कीं, तू या महात्मा झोरोष्टरचा यथायोग्य संभाळ करावास ! त्याला इतरांपासून उपसर्ग पोंचणार नाहीं, अशी खबरदारी घ्यावीस ! त्याच्या धर्माचा पूर्णत्वानें स्वीकार करून, तदनुसार वर्तन करावेस ! तो महात्मा तुला पवित्र धर्मानें उपदेशद्वारा ज्ञानामृत पाजून तुला शाश्वत सुखी व धन्य करील ! आणि लवकरच तुझ्या सर्व इच्छा तृप्त केल्या जातील !' असें म्हणून ते तेथें क्षणभर उभे राहिले

**विश्तास्प** हा त्या दिव्य देवदूताचा डोळे दिपविणारा झगझगीत प्रकाश पाहून, कांहीं वेळ मूर्छितच होऊन पडला ! पुन शुद्धीवर आल्यावर

ओरद्धन म्हणाला— हे सर्वशक्तिमान अहुरमझ्द प्रभो ! हे जगद्रक्षका ! जगदाधिपते ! हा मी **विदतास्प** तुझा अत्यंत नम्र सेवक आहे ! अवेस्ता धर्माचा मी एकनिष्ठ भक्त असून महर्षि झोरोष्टरचा परम शिष्य आहे ! तुझी आज्ञा मला शिरसावंद्य असून ती मी तनमनधनानें तडीस नेण्यास झटून प्रयत्न करीन ! ' हें **विदतास्पाचें** भाषण संपतें न संपतें तोंच ते देवदूत तेथून निघून चालते झाले

या अघटित घटणेमुळे विस्तास्पाची पूर्ण खात्री झाली व तो निःशंक झाला पुढें त्यानें अहोरात्र अवेस्ता ग्रंथ पुढें घेऊन त्यातील ज्ञानविज्ञान करून घेण्यात तो मग्न झाला, याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर तो वर प्रसादास पूर्ण पात्र झाला आहे, तेव्हा त्याची इच्छा पूर्ण करण्यास हरकत नाहीं अशी झोरोष्टरची पूर्ण खात्री झाली आणि म्हणून तो पुढील तयारीस लागला

पुढें एके दिवशी सकाळीं उठून अग्निनारायणाची नित्याप्रमाणें उपासना करून नंतर त्यानें सोमरस, दूध, डाळिंब व फुलें घेऊन तीं प्रथम अहुरमझ्द प्रभूस अर्पण करून त्यापैकीं सोमरस हा विस्तास्पास प्रथम प्यावयास दिला विस्तास्प तो हातात घेऊन प्याल्यावर त्यास एकदम गाढ समाधि लागली व त्या अवस्थेंतच तो तीन दिवस मग्न होता

त्या अवधींत त्याचा अंतरात्मा—म्हणजे आम्हा हिंदूंचे लिंगदेह—हा स्वर्गास जाऊन, तेथील ऐश्वर्यसंपन्न तेजस्वी स्वर्गलोकाचें त्यानें मनमोक्त दर्शन घेतलें त्याच्या अपेक्षेप्रमाणें मरणोत्तर त्याला तेथें स्वर्गात कोणतें स्थान मिळणार, हें त्यास दाखविण्यात आलें काय सांगावें—त्या स्वर्गाचें सौंदर्य नि वैभव ! तें अपूर्व वैभव, सौंदर्य व ऐश्वर्य पाहून हा अल्प मर्त्यमानव आनंदाश्चर्यानें वेडा होऊन जाणार नाहीं तर काय होईल ! **विस्तास्पाची** आता हीच अवस्था झाली त्याला पराकाष्ठेचा आनंद झाला ! व परम

समाधानहि वाटलें ! पुढें त्याची समाधि उतरल्यावर समाधींत घडलेली हकीकत त्याने **झोरोष्टरास** निवेदन केली याप्रमाणें त्याची पहिली इच्छा प्रत्यक्ष स्वर्गदर्शन–पूर्ण करण्यात येऊन पहिला अंक समाप्त झाला

नंतर **विश्तास्पचा** मुलगा अस्पदीयार यास जवळ बोलावून अहुर मझ्द यास अर्पण केलेलें तें डाळिंब त्यास प्रसाद म्हणून भक्षण करावयास दिलें त्याबरोबर त्यातील दिव्य अमृतरस सर्व शरीरात भिनून, तें वज्रासारखें कठीण होऊन, शस्त्रास्त्राला अभेद्य असें झालें ! तो वीर पुरुष अर्थात् राम-दूत मारुतीसारखा वज्रदेही बनला ! याप्रमाणें विश्तास्पाची दुसरी इच्छाहि पुरी करण्यात आली

यानंतर मुख्य प्रधान जो ज्ञानी व सुशील **जामास्प** त्यास अहुर मझ्दास अर्पण केलेलीं तीं सुवासिक फुलें वास घेण्यास म्हणून देण्यात आली **जामास्पानें** ती ओंजळींत घेऊन एकवार हुंगलीं मात्र तों काय चमत्कार ! त्याच्या डोक्यावर एकदम लवेंडर ओतल्यासारखें होऊन अंतःकरणात दिव्य प्रकाश चमकून गेला ! अर्थात् त्याचा परिणाम असा झाला कीं त्यास भूत, भविष्य व वर्तमान या तीनहि कालाचें यथार्थ ज्ञान ओळखण्याचें त्यास अद्भुत सामर्थ्य प्राप्त झालें ! अर्थात् तो त्रिकालज्ञ महर्षि बनला ! याप्रमाणें राजाची तिसरी इच्छाहि सफल झाली !

आता राहता राहिली ती त्याची चौथी इच्छा त्याची पूर्ति आपला दुसरा मुलगा **पेशोतन** नावाचा जो होता त्याच्या ठिकाणीं व्हावी असें राजा विश्तास्पानें पूर्वीच सांगून ठेविलें असल्यामुळे **झोरोष्टरनें पेशोतन** यास बोलावून त्या अहुरमझ्द प्रभुस नैवेद्य दाखविलेले दूध प्यावयास दिलें आता तें दूध कसलें ? प्रत्यक्ष अमृतच ! पेशोतन तें प्याल्यावर त्यास

अमरत्व प्राप्त झालें ! याप्रमाणें विश्तास्पाची चौथी इच्छाहि पूर्ण करण्यांत आली. एवंच विश्तास्पाच्या चारहि इच्छा आतां फलद्रूप होऊन तो मुक्त व कृतकृत्य झाला ! ( झोरोथुष्ट्र नामा ४८ अलेक्झांडरकृत )

---

## धर्म-प्रसार

राजा विश्तास्प हा जुना धर्म सोडून झोरोष्टरच्या अवेस्ताधर्माला जाऊन मिळाला, ही बातमी राज्यांत पसरतांच मग काय सगळाच मनु पालटला. खुद्द राजघराण्यांत राजा विश्तास्प, त्याची राणी **हुतओसा,** मुलगा **अस्पंदीयार, पेशोतन** इत्यादि राजघराण्यांतील प्रमुख व्यक्ति झोरोष्टरपंथी बनतांच, त्याबरोबरच त्यांच्या परिवारांतील आश्रितांनीहि तोच कित्ता गिरविला. त्याचप्रमाणें मुख्य प्रधान **जामास्प** व त्याचा वडील भाऊ **फरशोस्तर** हेही मझ्दपंथात येऊन दाखल झाले. याप्रमाणें राजवाड्यांत व राजदरबारांत झोरोष्टरधर्माचा प्रवेश होतांच, राज्यातील सबंध वातावरणांतच एकदम महत्वाचा बदल होऊन लोकांत नव्या धर्माविषयीं कुतूहल व आस्था उत्पन्न झाली.

इतकेंच नव्हे, तर वचन दिल्याप्रमाणें राजानें स्वतः जातीनें पुढाकार घेऊन धर्मप्रसाराची मोहीम जोरानें चालविली. महात्मा झोरोष्टर हाहि स्वस्थ न बसतां त्यानें देशांत दौरे काढून लोकांना उपदेश करीत गांवोगांव फिरण्याचा एकच सपाटा चालविला. त्याच्या उपदेशाचा जनमनावर चांगला व अनुकूल ठसा उमटून लोकहि भराभर त्याच्या पंथांत येऊन शिरूं लागले. पुढें जसजसा कामाचा व्याप व विस्तार वाढत चालला तसतसे धर्मोपदेशक तयार करण्यांत येऊन, त्यांनाहि धर्मप्रसाराच्या कामावर गांवोगांव व देशोदेश पाठविण्याची व्यवस्था करण्यांत आली. याप्रमाणें धडाडीनें व

जोराने काम चालून थोड्याच अवकाशात सबंध ब्याक्ट्रिया देश त्या धर्माच्या पखाखाली आगम्यात आला

राज्यात अशाप्रकारे धर्मप्रसाराचें काम धूमधडाक्यानें व मोठ्या उत्साहानें चाललें असता अग्रदीयाला परदेशात पाठवून तद्द्वारा त्या धर्मानें लाग परदेशातहि नेऊन यौनविषेशी व्यवस्था करण्यात आली राज्यात गावोगाव अग्निमंदिरे स्थापन करण्यात येऊन तेथे अग्नि उपासनेची नवीन प्रथा चालू झाली अवेस्ताग्रथाचें मगल पठण ठिकठिकाणी ऐकू येऊ लागलें जनजनक अहुरमझ्दच्या पवित्र नावाचा गजर घोषहि गर्जू लागला जुन्या धर्मावरील लोकाची मनें विरत जाऊन, नवीन धर्मावर त्याची श्रद्धा व भक्ति दिवसेंदिवस वाढत चालली

पैगंबर झोरोष्टर हा पूर्वीचा झोरोष्टर राहिला नसून तो आता राज गुरु व धर्मगुरु म्हणवीत होता या त्याच्या श्रेष्ठ इभ्रतीला शोभेल व साजेल अशाप्रकारचा जवाजमा त्याचा मानमरातब राखण्यासाठी म्हणून त्याच्या दिमतीस देण्यात आला असून, तो मोठ्या थाटानें व वैभवानें देशात मिरवीत चालला याप्रमाणें ब्याक्ट्रियात सर्वत्र फिरून तेथें तेथें लोकाना सदुपदेश करून थोड्याच अवधीत तो समग्र देश मझ्दधर्मी बनवून टाकल्यावर त्याची दृष्टि आता मिडियाकडे-आपल्या जन्मभूमीकडे-वळली याखेपेचें चित्र काहीं निराळेंच दिसलें तो धर्मसंस्थापक व धर्मगुरु होऊन जेव्हा मिडियात गेला, तेव्हा पहिल्या भेटीतच तो जाईत तेथें जनतेनें मोठ्या उत्साहानें व प्रेमादरानें त्याचें जाहीर स्वागत केलें तेथील असख्य लोकानी त्याच्या धर्मात प्रवेश करण्याची आपली तयारी दाखविली व त्याप्रमाणें त्याची इच्छा पूर्णहि करण्यात आली सनातनी लोकाना उपसर्ग यावेळीं त्यास मुळींच पोंचला नाही आता झोरोष्टर पूर्वीप्रमाणें एकटाच नसून त्याच्याबरोबर मोठा परिवार व पाठराखीत म्हणून तेजस्वी

राजदड होता तेथें काहीं काल राहून लोकाना अवेस्ताधर्माची दीक्षा देऊन व प्रमुख प्रमुख ठिकाणी अग्निमदिरें स्थापून तेथून तो पुढें तुरानात शिरला

तुरान देश ह्मणजे फारच अडाणी देश लोक विचारात अत्यत मागासलेले व आचरणात मनस्वी खालावलेले ! तशात मूर्तिपूजेचें व मत्र तंत्रादिकाचें वडहि भयकर माजलेलें ! तेथें त्याला प्रथम प्रथम यावें तसें यश आलें नाहीं लोकाकडून फार मोठा अडथळा झाला तथापि अगदीच निराश न होता त्यानें नेटानें काम चालवून अखेर काहीं तुरानी लोकहि आपल्या धर्मात सामील करून घेतले ! त्यात प्रामुख्यानें उल्लेख करण्यासारखी महत्वाची व्यक्ति ह्मणजे **व्हराझ्चा** मुलगा **अस्तस्वंत** हा होय हा जन्माने तुरानी असला तरी त्याचें नाव अवेस्तात **झोरोष्टरच्या** प्रख्यात शिष्यगणात दाखल करण्यात आलें आहे त्याचप्रमाणें गाथेंत आढळणारी दुसरी एक उल्लेखनीय व्यक्ति ह्मणजे **फ्रियान** ही होय

(यस्न, ४६–१२)

त्याच सुमारास अस्पदीयार हा आपल्याबरोबर काही मोबेद ह्मणजे झोरोष्टरपथी पडित व धर्मगुरु घेऊन रूम ह्मणजे आशियामैनर येथेंहि त्यानें आपल्या तलवारीच्या जोरावर अवेस्तापथाचा प्रसार केला **रूम हें** अस्पदीयारचें आजोळ होतें हें वाचकास आठवत असेलच अस थोडक्यात ह्मणजे या दहापधरा वर्षाच्या काळात सबध ब्याक्ट्रिया, मिडिया, पार्स, खोरासान, तुरान, आशियामैनर इत्यादि देशात झोरोष्टर धर्माचा डका गाजू लागला इतकेंच नव्हे, तर पूर्वेस त्याचें लोण हिंदुस्थानातहि येऊन पोंचलें

याविषयीं सागण्यासारखी एक हकीकत झोरोष्टर ग्रथात आढळते ती अशी – हिंदुस्थानात एक अत्यत विद्वान असा ख्यातनाम पडित होता तो वेदपारगत, तत्त्वज्ञानविशारद व धर्मशास्त्रकोविद असा ऋषितुल्य महा

ज्ञानी असून त्याची दिगन्त ख्याति होती अर्थात् सकलविद्येत तो संपन्नाची असून त्याच्याजवळ पार मोठा शिष्यपरिवार निरनिराळी विद्या शिकण्यास म्हणून येऊन राहिला होता त्याचे नाव **चंद्रगाच** असें होतें त्याची कीर्ति भरतखंडभर—नव्हे परदेशातहि—जाऊन पसरली होती विश्तास्पाचा मुख्य मंत्री **जामास्प** हा त्याच्या हाताखाली शिकूनच तयार झाला होता अर्थात् जामास्पाचाहि तो गुरुदेव होता राजा **विश्तास्पहि** त्यास मानीत असे महात्मा **झोरोस्टरची** कीर्ती जाता जाता जेव्हा त्या पंडिताच्या कानावर गेली तेव्हा त्यानें विश्तास्पास एक पत्र लिहून कळविलें कीं झोरोस्टर हा महात्मा अगर प्रेषित नसून एक ढोंगया आहे सबब त्याच्या नादीं लागून जन्माचे नुकसान करून घेऊ नये त्याचा उदय हा हितावह होणार नाहीं

या पत्राला विश्तास्पानें उलट असें कळविलें कीं, आपण पत्रात जो मजकूर लिहिला तो मी वाचून पाहिला आपल्या म्हणण्याप्रमाणें करण्यास एकदम मन धजत नाहीं तर आपण येथें प्रत्यक्ष येऊन आपल्या म्हणण्याची आम्हास खात्री करून दिल्यास आमचेवर पार मोठे उपकार होतील आपण तसदी घेऊन येथवर येऊन आपल्या विधानाची सत्यता आम्हास पटवून दिल्यास आम्ही काहीं आपल्या शद्बाबाहेर जाणार नाहीं तर कृपा करून येथपर्यंत येऊन आमचा झालेला ग्रह महात्मा झोरोस्टरशी वाद-विवाद व चर्चा करून दूर कराल अशी आशा करतो

राजाच्या वरील विनंतीपत्रास मान देऊन आपला शिष्यपरिवार सगळा बरोबर घेऊन पंडित महाशय झोरोस्टरचीं वादविवादात खोड मोडण्यासाठीं म्हणून हिंदुस्थानातून बल्ख राजधानीत येऊन दाखल झाले राजाने तो हिंदुपंडित आल्याचा उद्देश महात्मा झोरोस्टरास कळवून दोघाच्या चर्चेचा दिवस मुक्रर करण्यात आला व त्याप्रमाणें राज्यात जाहीर खबर देण्यात आली पुढें ठरलेल्या दिवशी वाद व चर्चा खुद्द राजाच्या दरबारातच

होण्याचें ठरलें असल्यामुळें वेळेवर गावातील व बाहेरील मोठमोठे विद्वान लोक, मंत्री व सरदार व इतर प्रतिष्ठित लोक तो वादविवाद ऐकावयास म्हणून तेथें हजर झाले. राजा आला व त्याच्या मागोमाग महात्मा झोरोष्टर व चंग्रगाच हेहि आले व आपापल्या जागीं जाऊन बसले.

पुढें राजाकडून सूचना होताच चर्चेस प्रारंभ झाला. पण सांगावयाची गम्मत ही कीं प्रश्न बाहेर पडावयाच्या आधींच त्याचें उत्तर **झोरोष्टरकडून** समर्पक असें पुढें ठेविलेलें! त्या पंडितानें प्रश्नांची सारखी झोड उठविली पण झोरोष्टर कोठेंच अडखळला नाहीं! उत्तरहि तितकेंच जलद व तितकेंच समर्पक! हा चमत्कार पाहून पंडितजी मनातून हळुहळू नरमत व लजित होत चालले! काहीं विचारलें तरी उत्तराला विलंब असा नाहींच. धार्मिक, तात्त्विक, शास्त्रीय विषयावर वसून चर्चा चालली पण महात्मा कोठेंच पड घेण्याचें किंवा हार जाण्याचें लक्षण दिसेना! त्यानें विचारलेल्या बिकट प्रश्नाचें उत्तर **झोरोष्टरच्या** नस्क या ग्रथात आधींच देऊन ठेविलें होतें, असो. त्याचें भांडवल सपुष्टात येत चाललें, तसें त्याचें पाणी उतरत चाललें! अखेर तो झोरोष्टरापुढें हतबुद्ध व गलित वीर्य झाला! त्याला झोरोष्टरची योग्यता कळून आली व त्याच्या पुढें आता आपली डाळ शिजणें शक्य नाहीं अशी त्याची खात्री पटून, अखेर त्यास त्यानें जयपत्र लिहून दिलें! इतकेंच नव्हें तर मझ्द धर्माची दीक्षा घेऊन तो त्याचा शिष्य बनला व हिंदुस्थानात परत येऊन त्या धर्माचा जोरानें प्रसार करून, तेथेंहि त्या नव्या धर्माची अनेक लोकाना त्यानें दीक्षा दिली.

( जाक्सन कृत झोरोष्टर )

हा महात्मा झोरोष्टरचा फार मोठा विजय होय. त्याचप्रमाणे **काविग** घराण्यातील ' **कुंदह** ' चा विद्वान पण पासंडी मुलगा पुढें **झोरोष्टरचा** उपदेश ऐकुन त्याचा शिष्य बनला! याप्रमाणे **झोरोष्टर** धर्माचें तेज सूर्यप्रकाशाप्रमाणें देशोदेश फाकत व पसरत गेलें!

---

## अरेजत् अस्पाचा अरेरावी खलिता.

आता झोरोष्टर धर्माला शुक्ल पक्षाची तेजस्वी कळा विलसत चालली होती ! त्याचें वर्चस्व व विस्तार हीं वाढीस लागून, देशभर त्याचा बोलबाला व गौरव वाढत चालला होता विश्तास्पानें त्या धर्माचें पुढारीपण पत्करून, त्या धर्माचा प्रसार करण्याचें कंकण बांधून, त्याप्रमाणें जगभर आपल्या अंगीकृत कार्याचा धूमधडाका चालविला होता सबंध ब्याक्टिरीया देश आता झोरोष्टरपंथाखाली आला असून, शेजारचे देशहि त्याच्या वर्चस्वाखाली येत चालले होते कुदह राजाचा मुलगा कविग यानेहि झोरोष्टर धर्म स्वीकारून, त्या धर्माचा आपल्या राज्यात प्रसार करण्याचा उद्योग चालविला होता याप्रमाणें अवेस्ता धर्माला सर्वत्र तेजी व सहानुभूति वाढत चालली होती त्याला आता शत्रु असे कोणीच राहिले नव्हते

अगदीच नाहीं म्हणायला एकटा मात्र त्याचा प्रतिस्पर्धी निघाला तो म्हणजे खियोन लोकाचा राजा अरेजत् अस्प हा होय ! हा मूर्ति पूजक असून, करपपडिताचा तो मोठा चाहता व कैवारी होता त्याच्या दरबारात त्या लोकाचें प्रस्थ फार माजलें होतें शिवाय चेटुक, जादुटोणा इत्यादि वाम विद्यावरहि त्याची भक्ति व श्रध्दा होती या अरेजत् अस्पाने अवेस्ता धर्म स्वीकारावा म्हणून झोरोष्टरने विश्व प्रयत्न करून पाहिले पण करपपडिताच्या कारवाईमुळें त्याला त्यात यश आलें नाहीं अरेजत् अस्पानें त्याला जसलीच दाद दिली नाहीं याचा परिणाम पुढें असा झाला कीं झोरोष्टर पंथी विश्तास्प व करपपंथी अरेजत् अस्प याच्यात प्रथम मानसिक तेढ उत्पन्न होऊन पुढें त्याचें प्रकट द्वेषात रूपांतर झालें

याचा परिणाम असा झाला कीं, काहीं तरी कुरापत काढून **विश्तास्पाला** पेचात भरण्याचें विचार **अरेजत अस्पाच्या** मनात राहून राहून चमकू लागले. अखेर त्यास एक सबब सुचली विश्तास्प हा **अरेजत अस्पास** सालीना काहीं रकम खडणीवजा म्हणून देत असे. ती त्यान अलीकडे देण्याचें गरीच वर्षे बंद केलें होतें. **अरेजत अस्पास** गाजवून खरुन काढण्यास एवढें कारण पुरेसें झालें. त्यानें हें खडणीचें कारण वरपागी पुढें करून थकलेली बाकी लवकर आणून तिजोरीत भरणा करण्याविषयीं एक खलिता पाठविला. पण **विश्तास्पानें** त्याम दाद दिली नाहीं

काहीं दिवस वाट पाहून उत्तर न आल्यामुळें पुन दुसरा एक आणीबाणीचा जहाल खलिता त्यास पुन खास पाठविण्यात आला त्यात स्पष्ट म्हटलें होतें कीं, **विश्तास्पानें** थकलेल्या खडणीचा भरणा ताबडतोब तिजोरींत आणून सर्व बाकी चुकती करावयास पाहिजे. तरच दोघामध्यें सलोख्याचे नातें राहील शिवाय दुसरें असें कीं, त्याने स्वीकारलेला नवा झोरोष्ट्रपथ ताबडतोब टाकून दिला पाहिजे नाहींतर **अरेजत-अस्पाशी** लढण्यास तयार राहिले पाहिजे ही गोष्ट दोन महिन्यात घडून आली नाही, तर पुढें ओढवणाऱ्या प्रसगाला व आपत्तीला अरेजतस्प काही जबाबदार नाहीं ! हा खलिता त्यानें आपले प्रख्यात सरदार **बंदिरस्फ व नमखवस्त** याच्या सोबत खलरा राजधानीतून पाठवून दिला होता

या खलित्यातला मजकूर दरबार भरवून, त्यात झोरोष्ट्रासमक्ष सर्वांना वाचून दाखविण्यात आला **झोरोष्ट्रला** तो मजकूर ऐकून मोठें आश्चर्य वाटलें व तसेंच थोडी चीडहि आली तो दरबारात उठून उभा राहून राजास उद्देशून म्हणाला 'राजन्! **अरेजत अस्पाचें** दुर्दैव ओढवलें आहे ! त्याचें डोकें ठिकाणावरून उठलें आहेसें दिसतें ! म्हणूनच त्याला ही अवदसा आठवली आहे त्याचें नष्टचर्य ओढवलें आहे म्हणूनच कीं

## आकाश दणाणलें

विस्तास्पाच्या उत्तरानें **अरेजत्अस्प** हा भारीच चवळला व •यानिटरियावर स्वारी करण्याची त्यानें दरबारात घोषणा केली **झोरोष्टर** धर्माच्या विरुद्ध असलेल्या सर्व लोकांना जाहीर विनंति करून, त्यांचें सहाय्य व सहकार्य मिळविण्याची खटपट चालविली जिकडे तिकडे सैन्य जमविण्या- साठीं राजदूत पाठविण्यात आले हरतऱ्हेचीं शस्त्रास्त्रें व इतर युद्धोपयोगी उपकरणें तयार करण्याचा सपाटा चालविला थोड्याच अवधीत लाखो सैन्य उभारण्यात येऊन लढाईची रूपरेखा विचारपूर्वक आखण्यात आली शहानाम्यावरून पाहता हे सैन्य तीन लाखाच्या वर असावें, असें अनुमान निघतें

या सेनेचा सरसेनापति अरेजत्अस्पाचा भाऊ **गर्गसार** (कर्कसार) हा असून, त्याच्या हाताखालीं एक लाख फौज देण्यात आली त्याचा दुसरा भाऊ **वीदरफ्श** याजकडे एक लाख सैन्य देण्यात येऊन, मुख्य सैन्याची डावी बाजू सभाळण्याची जबाबदारी याजकडे सोंपविण्यात आली होती खुद्द राजा अरेजत्अस्प हा राखीव सैन्यासहित मध्यभागीं असून उजवीबाजू सभाळण्याचें काम सर सेनापति **गर्गसार** याने पत्करलें होतें पिछाडीचा भाग **अरेजत्अस्पाचा** मुलगा **खोहरम** याजाकडे होता **जयहून** नदीवर तळ पडला त्यावेळच्या मांडणीची ही अशी हकीकत आहे

**अरेजतअस्प** हा लढाईची जुळवाजुळव करीत आहे ही बातमी बल्ख येथे **विस्तास्पास** येऊन पोंचताच, त्यानेंहि आपली बाजू बळकट करण्याची सिद्धता चालविली पुढे विस्तास्प व अरेजतस्प याचदरम्यान जो रणसग्राम गाजला, त्याला झोरोष्टर धर्मग्रथात 'धर्मयुद्ध' असें म्हटलें आहे व ते **जयहून** नदीवर लढण्यात आलें **विस्तास्पाचे** एकदर सैन्य

नदेलजवळ दौडलास असून, त्याचें प्रमुख नेतृत्व **विश्तास्पाच्या** भाऊ जरीर याजकडे होतें व त्याच्या हाताखाली पन्नास हजार निवडक सैन्य देण्यात आलें असून, तो मध्यभागी राहून लढत होता

दुसरा महायोद्धा म्हणजे विश्तास्पाचा वडील मुलगा **अस्पदीयार** हा असून, त्याच्या हाताखालीं पन्नास हजार सैन्य देऊन उजवी बाजू सभाळण्याचें काम त्याजवर सोपविलें होतें आणि त्याचप्रमाणे डावीबाजू सभाळण्याचें काम **शेदस्पकडे** होतें नाव घेण्यासारखा तिसरा वीर म्हणजे झरीराचा मुलगा **नस्तुर** याजकडे पिछाडी सांभाळण्याची कामगिरी देण्यांत आली होती अर्थात् **विश्तास्पाची** छावणी ही आघाडी व पिछाडी या दोहोंच्यामध्यें असून तेथें राखीव सैन्य होतें अर्थात् या उभय सैन्याची योजना तक्त्यावरून दाखवावयाची झाली तर ती पुढील प्रमाणें दाखविता येईल



झरीर

| ५०००० सैन्य |

विस्तास्प

| राखीव सैन्य |

नस्तुर

| पिछाडी |

(शहानामा) अलेक्झांडर कृत. पृ. २९७-२९८) जाक्सन- झोरोष्टर पृ. १११ व ११३)

---

## धर्मयुद्ध पहिलें

हें पहिलें धर्मयुद्ध जयहून नदीवर लढलें गेलें या युद्धात **विस्तास्पाच्या** बाजूनें मागच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणें पुढीलवीर लढत होते. पहिली चकमक झडली तींत **विस्तास्पाचा** भाऊ झरीर यानें पुढाकार घेतला होता. शिवाय हे पुढील लहान थोर वीरहि हजर होते. झरीरचा मुलगा नस्तुर हा वयानें लहान होता तरी अभिमन्युसारखा मोठा पराक्रमी होता. दुसरा योद्धा म्हणजे खुद्द **विस्तास्पाचा** मुलगा अस्पदीयार हा होय हा म्हणजे भारतीय युद्धातला जणु काहीं धनुर्धारी अर्जुनच ! शंकरानें जसा अर्जुनास उदंड विजयाचा दिव्य वर दिला होता, तद्वतच अहुर-मज्दनेहि झोरोष्टर द्वारा तसाच वर यास दिला होता ! तिसरा सांगण्यासारखा वीर म्हणजे जामास्पाचा मुलगा **गेरामी** हाही मोठा शूर योद्धा

होता याशिवाय विश्तास्पाचे इतर मुलगे ह्मणजे अर्देशीर, नवझर, बेशोतान, तसेच अस्पदीयारचा मुलगा नुश आझर व शेदास्प इत्यादि वीरांनी त्या लढाईंत प्रामुख्यानें भाग घेतला होता

प्रथम अर्जास्पानें शिंग फुंकून लढाईची सूचना दिली व पुढें क्षण-भरांतच लढाईला तोंड लागलें अरेजतस्पाचे लोक पूर्व संकेताप्रमाणें मोठ्या आवेशानें **विश्तास्पाच्या** मध्यभागावर तुटून पडले त्याभागाचा पुढारी झरीर हा असल्यानें त्यानें चटकन आघाडीवर येऊन त्याचा प्रतिकार केला हा झरीर ह्मणजे भारतीय युद्धांतला प्रतीकर्णच ! अग्नि गवताच्या गर्जीत शिरला ह्मणजे जसा तो पेटत व भडकत जातो, तद्वत झरीर यानें शत्रुसैन्यात शिरून आपला अप्रतिम पराक्रम प्रकट केला त्याच्या प्रखर तरवारीला शत्रूचे असंख्य लोक बळी पडले !

त्याची ती विद्युल्लता प्रमाणें चकचकणारी तीक्ष्ण तल्वार ह्मणजे केवळी ती रणचंडी ! वरून शत्रूवर घसरून पडताना दहा व खाली पुन वर जाताना अकरा याप्रमाणें ती शत्रूची मुंडकी सपासप उडवीत होती ! अरेजतअस्पच्या खियान वीराचा एकच सहार चालला ! दोन्ही बाजूचे लोक जिवावर उदार होऊन परस्परावर निकरानें तुटून पडत होते रक्ताचे पाट वाहू लागले व वीरांच्या मुंड्यानी रणभूमि भरून व बुजून गेली ! त्यात झरीराचा पराक्रम ह्मणजे जगु काही तो कदन काळच !!

याप्रमाणें प्रहर दोन प्रहर पर्यंत लढाई जोरात चालली रणदेवतेला भारी रंग चढला ! वीरांच्या रणगर्जनेनें आकाशपाताळ एक झालें ! इतक्यात विश्तास्पाचा मुलगा अर्देशीर हा शौर्यानें लढत असता अचा-नक शत्रूच्या तरवारीला बळी पडला ! हा दु खद प्रकार पाहून झरीराला भारी त्वेष चढला व शेतकरी कोयत्यानें सुगींत पीक कापतो, त्याप्रमाणे तो आपल्या तलवारीनें शत्रूंची मुंडकी उडवीत चालला ! आपली तहान भूक

असून, त्यांना रणभूमीची मुळीच कदर नव्हती ! विश्तास्पाच्या युद्ध–मंडळानें ही सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन व आपली बाजू सत्याची आहे ही गोष्ट जमेस धरून आतां भावी लढाईची नवीन दिशा आंखली व सेनेचें अधिपत्य अस्फंदीयारकडे देऊन त्यास सरसेनापति केला.

आपल्या लोकांत चांगला रणोत्साह स्फुरावा म्हणून विश्तास्पानें लढाईंत पराक्रम गाजविणाऱ्यांस मोठमोठीं इनामें देण्याचें व तसेंच जो शत्रूच्या खुनी मनुष्याचा वध करील त्याला आपली उपवर मुलगी 'हुमाई' इजला बक्षीसदाखल लग्न करून देणेचे जाहीर केलें ! यावातमीनें तर त्या वीरलोकांचा रणोत्साह अधिकच उफाळला ! अस्फंदीयारच्या मदतीला नस्तूर व तुशआझर इत्यादि ख्यातनाम युद्धविशारद देऊन राजानें आपली बाजू आता नीट व्यवस्थित व चांगली बळकट केली.

इकडे अरेजतअस्पाचे लोक त्या तात्पुर्तिक विजयभावनेनें हुरळून जाऊन आनंदात व मजेंत राहिले. पुढील विचार त्यांनी फारसा केला नाहीं. त्यांची आतां अशी समजूत नव्हे खात्री–झाली होती की प्रस्तुत युद्धांत आपला विजय जसा कांहीं ठेवलेला ! विश्तास्प आतां पुनः डोके वर काढील की नाहीं यांची त्यांना वानवाच होती. फक्त रणांतून तो पाय मागें घेण्याचीच ते वाट पहात होते व तशी त्यांची लागीहि पण होती. अर्थात बेहोषपणा व बेसावधपणा त्यांच्यात भरभक्कम ओकाळून बसला होता.

जवळजवळ पंधरादिवस लोटले तरी विश्तास्प माघार घेण्यानें लक्षण कांहीं दिसेना. तेव्हां अरेजतअस्पाने दुसऱ्यादिवशी लढाईस सिद्ध .. .. आपल्या लोकांस हुकूम दिला. त्याच्या मनांत असा विचार चालला की आतां आगखी एक सणसणीत टोला लगावून. विश्तास्पास नेस्तनाबूद करून सोडायचा आणि झोरोष्टरची खोड मोडायची !

ही गुणगुण कशी कोण जाणे विदरस्पाच्या कानावर रात्रीच येऊन आदळली मग आता विलंब कसला ? त्यानें तावडतोब अस्पदीयार यास बोलावून घेऊन त्यास ती हकीकत कळविली. दुसरा दिवस उजाडतो न उजाडतो तो अस्पदीयारनें शिंग फुंकून सैन्यास लढाईचा इशारा दिला व सूर्योदय होताच अरेजतस्पाच्या सैन्यावर निकराचा हल्ला चढविला नस्तूर एका बाजूला व अस्पदीयार एका बाजूला या प्रमाणें दोन्ही बाजूनी त्यांनी एकाच वेळीं चढाई केली नस्तूरच्या लोकानी मोठा पराक्रम गाजवून अर्जास्पाची डावी फळी फोडली व वाघाच्या छातीनें आत घडकी मारून शत्रूच्या लोकात एकच प्रलय माजवून सोडला !

या आकस्मिक हल्ल्याला तोंड देणें हें अरेजतअस्पाच्या सैनिकाना साधलें नाहीं त्याच्यातील शिस्त बिघडली व सर्वत्र एकच गोंधळ माजून राहिला, इतक्यात अस्पदीयारनें शौर्याची पराकाष्ठा करून अखेर विदरस्पास घेरले इकडून नस्तूरहि शत्रूचें सैन्य कापीत कापीत त्यास येऊन मिळाला अस्पदीयारची व विदरस्पची झटापट होऊन, अस्पदीयारच्या तरवारीनें घायाळ होऊन विदरस्प खाली पडला, तो इतक्यात नस्तूर झटकन् पुढें होऊन त्याने त्या दुष्टाचें शीर आपल्या तरवारीनें धडापासून वेगळें केलें ! आणि आपल्या बापाचा कपटानें खून करणाऱ्या दुष्टाचा याप्रमाणे सूड उगवून घेतला !

अस्पदीयारनें आता आपला मोर्चा अरेजतअस्पाकडे वळविला वीदरफश पडल्याची बातमी ऐकून अरेजतअस्पाच्या सैन्यात घबराट उत्पन्न होऊन त्याचा धीर व उत्साह खचत चालला तो इतक्यात अस्पदीयारची काळधाड त्याच्यावर कोसळली ! यारोपेस झोराष्टरच्या लढवय्यानी अप्रतिम पराक्रम गाजवून शत्रूच्या सैन्यात एकच गोंधळ नि हाहाकार उडवून दिला ! शत्रूचा मारा सहन न होऊन अरेजतअस्पाचे लोक हलके हलके मागें

सरकू लागलें नीदरफश पडल्याची बातमी ऐकून अरेजतअस्पाचें काळीजच फाटलें आणि तो रणभूमीवर फारवेळ न थांबता आता आपली धडगत नाहीं असें पाहून स्वारीनें आपला जीव वाचविण्यासाठीं येथून पळता पाय काढला ! झालें राजा पळत आहे हें पाहून त्याच्या सैनिकांनी हाय खाल्ली व आपला प्राण वाचविण्यासाठी त्यानीहि तोच कित्ता गिरविला !

आता काय सांगावें त्याचे हाल नि दुर्दशा ! नस्तूर व अस्पदीयार या दोघानी आपले लोक त्या पळत्या शत्रूवर धाडून त्या तुरानी सैन्याची एकच कत्तल चालविली त्यांच्या तलवारींच्या आटोक्यात आलेला शत्रु एकहि जिवत सुटला नाहीं ! जीव घेऊन पळतापळता त्या पळपुट्याना मुष्टी थोडी झाली ! वीर नस्तूरनें अचाट पराक्रम गाजवून शत्रूच्या लोकाना दशदिशास उधळून लावले ! लढणारा असा एकहि शत्रु रणभूमीवर आता धड राहिला नाहीं ! याप्रमाणे अरेजतअस्पाची फट्ट फजीति होऊन हताश व निराश अंत करणानें तो राजधानीकडे वळला अर्थात् या महायुद्धात तुरान्याचा सणसणीत पराभव होऊन, विजयश्रीनें इरानच्या गळ्यात–महात्मा झोराष्टरच्या अवेस्तापथी विश्तास्पाच्या गळ्यात–विजयमाळ घातली ! या लढाईचें सर्व श्रेय वीरपुंगव अस्पदीयार यास लाभून, त्याचें नाव झोरोष्ट्री इतिहासात अजरामर होऊन राहिलें !

( शाहानामा ( अलेकझांडरकृत ) पृ ३०४ व ३०५ )

या लढाईत अरेजतअस्पाचे लाखावर लोक मारले गेले ! त्यात आठशे लहान थोर सेनाधिकारी होते शिवाय अगणित द्रव्यहानि झाली ती निराळीच ! **विश्तास्पाची** हानीहि काही कमी नव्हती त्याचे तीस हजार सैनिक कामास आले शिवाय त्याचा भाऊ झरीर, व त्याचे मुलगे अर्देशीर, आरमझ, नवझर, पातखुस्रव इत्यादि एक नव्हे, दोन नव्हे, अठ्ठावीस मुलगे आणि जामास्पाचा शूर मुलगा गेरामी इत्यादि श्रेष्ठ मोहरे

पतन पावले !! आतां या लढाईची एकंदर फलश्रुति थोडक्यांत सांगावयाची ह्मणजे अरेजत्‌अस्पानें पुढें विश्तास्पाशी तह करून धर्मांतराचा आपला आग्रह व खंडणीवरचा आपला हक्क कायमचा सोडून दिला ! याप्रमाणे या धर्म-युद्धाची ही अशी विजयकथा आहे.

---

## झोरोष्टरचा मननीय आदेश !

झोरोष्टरच्या वयाला आतां जवळ जवळ ७६ वर्षे उलटून गेलीं होतीं. तो आतां उतार वयांत आला होता. अर्थात्‌ पस्तीस वर्षेपर्यंत सतत झटून व परिश्रम करून अवेस्ताधर्माला ऊर्जितावस्थेत आणून, त्याचा गौरव व नावलौकिक इराणांत चांगला वाढविला होता. ठिकठिकाणीं पवित्र अग्निमंदिरें स्थापण्यांत येऊन, तेथें पवित्र अवेस्ता ग्रंथ पढण्याची सोय करण्यांत आली होती व लोकांत नीतिमत्तेचे नवीन धडे देण्याची प्रथा सुरूं झाली होती. जुन्या धर्मांतील अनिष्ट चालीरीतींना व दुष्ट आचार-विचारांना पायबंद घालून, सनातन पंडितांचें प्राबल्य हटविण्यात आलें होतें ! या सर्व गोष्टी झोरोष्टरच्या मनाप्रमाणें होऊन, त्याचें अवतार-कार्य समाप्तीची वेळ आली.

पुढें त्यास काय वाटलें कोण जाणें त्यानें आपल्या शिष्यवृंदांना-म्हणजे राजा विश्तास्प, आथ्रवन पुरोहित व इतर मुमुक्षु लोक-यांना एकत्र बोलावून घेऊन, त्यांना आपल्या धर्माविषयी एक मननीय उपदेश केला. अर्थात्

तो त्याचा शेवटचाच संदेश म्हटलें तरी चालेल. असाच संदेश भगवान् बुद्ध, प्रभु येशुख्रिस्त, व हजरत महंमद पैगंबर यांनीहि आपापल्या अनुयायांस अवतार समाप्तीच्या काळीं दिलेला त्यांच्या त्यांच्या चरित्रात आढळून येतो. धर्मसंस्थापकांची ही एक सामान्य प्रथाच पडून गेलेली आहे, असें म्हटलें तरी चालेल. असो.

या सर्व शिष्यवृंदाना अग्निमंदिरांत बोलावण्यात आलें होतें. निमंत्रित लोक व इतर भक्तजन तेथें जमल्यावर वेदीवर दिव्य व प्रखर कांतीनें तळपणाऱ्या अग्निनारायणासमोर उभे राहून तेथील भक्तवृंदांना उद्देशून –या सभेंत राजा विश्तास्प, मुख्य पुरोहित जामास्प, इतर आथ्रवन (अवेस्तापाठक) व सामान्य भक्तवृंद जमले होते– या सर्वांना उद्देशून तो गंभीर आवाजांत म्हणाला–' हे अहुरमज्दच्या उपासकानो ! अवेस्ताच्या भक्त जनांनो ! ऐका ! मी आज जें तुम्हांस सांगत आहे तें सर्व लक्षपूर्वक ऐका ! आपल्या धर्माचा मुख्य प्रभु जो अहुरमज्द तो सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वसमर्थ असा आहे ! त्यासारखा जगांत दुसरा प्रभु नाहीं ! त्या प्रभुरायानेच हें विशाल विश्व, ही विविध जीवसृष्टि व तशीच कलाकुसरपूर्ण जडसृष्टि निर्माण केली आहे ! त्याच्याच सत्तेनें हें सर्व विश्वजात आज स्थित आहे. हें वर पसरलेलें अफाट आकाश, हा सभोवती वाहणारा वायु, रात्रीं आकाश मंडळात चमकणाऱ्या दिव्य तारा, दिवसा प्रकाशणारा तेजस्वी सूर्य व रात्रीं आल्हाद देणारा मनोहर चंद्र इत्यादि सर्व त्या सर्व कलाकुशल परमेश्वराच्याच–अहुरमज्दच्याच–अगाध व अद्भुत–सूक्ष्म व नाजूक–कलाकृति आहेत.

अर्थात् हा आमचा अहुरमज्द प्रभु सर्वांत मोठा आहे ! सर्वांत श्रेष्ठ आहे ! तो सर्व कांहीं जाणतो व सर्व कांहीं पाहतो ! त्याचे जे सहा प्रतिनिधि आहेत, त्याच्याद्वारे तो या विश्वावर आपली अमोघ सत्ता

चालवितो अर्थात् तो सर्व जगाचा एकमेव सर्वाधिकारी आहे ! त्याची सर्वांवर सत्ता चालते पण त्याच्यावर मात्र कोणाचीच चालत नाहीं ! तो विश्वमंगल व भक्तकामकल्पद्रुम आहे ! मी त्याच्या पवित्र नावानें असा आदेश देतो कीं पवित्र अवेस्ताग्रंथातील त्याच्या मंगल आज्ञा तुह्मी सदैव पाळत जा !'

नंतर राजा विश्तास्पाला उद्देशून तो ह्मणाला— 'राजन् ! तू मोठा भाग्यवान राजा आहेस ! हा माझा धर्म जोंपर्यंत जगांत जिवंत राहील, तोंपर्यंत तुझें नांव इतिहासांत अजरामर होऊन राहील ! तुला या जगांत सुखसमाधानानें व शांतिसंतोषानें रहावयाचें आहे तर इतरांशीहि तू स्नेहप्रेमानेंच वागावयास पाहिजे ! आणि तसा तू वागशील तर जगहि तुझ्याबरोबर तसेंच वागेल ! आणि अखेर तुला प्रभुरायाच्या सुंदर स्वर्गांत शाश्वत सुखशांतीचें सुमंगल स्थान प्राप्त होइल ! अहिरमन कीं जो दुष्टाव्याचा मूर्तिमंत पुतळा हा मनुष्याच्या अंतःकरणांत सदैव दबा धरून बसलेला असतो आणि तो मनुष्याला इंद्रियसुखाचे देहतर्पणाचे—आमिष दाखवून, त्याच्या सद्भावनेला, सद्बुद्धीला, सत्प्रेरणेला मुरळ घालून आड मार्गास नेऊं पाहतो त्याच्या संगतींत रमणाऱ्या मनुष्याची अंतिम गति ह्मणजे दुःखमय नरक होय ! ही आपत्ति मनुष्यावर ओढवूं नये या उदार बुद्धीनें त्या सर्व दयाघन अहुरमझ्द प्रभूनें या लोकीं तुह्मास मुक्तीचा सुखाचा सत्य, शुभ व सरळ मार्ग दाखविण्यासाठीं आपला प्रेषित ह्मणून माझी येथें योजना केली आहे ! आणि मी तुह्मास माझ्या प्रभुरायाचा संदेश ह्मणून पवित्र अवेस्ताग्रंथ दिला आहे त्यामार्गानें तुह्मी आपली जीवनयात्रा चालवाल तर तो दुष्ट अहिरमन तुमच्या वाटेस येणार नाहीं आला तरी तुमचें कांहीं वांकडें करणार नाहीं, आणि तो करूं पाहील तर तुह्मी आपल्या प्रभावी विचारानें व पवित्र आचरणानें त्याचा पाडाव करण्यास समर्थ आहांच आहां ! ह्मणून माझा तुह्मा सर्वांना असा सल्ला आहे कीं

कोणाहि मनुष्यानें या पवित्र अवेस्ताग्रथाचें पारिशीलन करून, त्यातील सत्य व पवित्र ज्ञान ग्रहण करून व पथ्यकर व हितकर आज्ञाचें अनुकरण करून या मानवजन्माचें सार्थक करावें ! मला त्या परमेश्वराचा असा आदेश आहे की मनुष्याला दु खाकडे–नरकाकडे–नेणाऱ्या अग्रमइन्यूच्या दुर्मार्गा–पासून परावृत्त करून, तुह्मासाठीं–ह्मणजे पवित्र अवेस्ताग्रथाला चालून घेणाऱ्यासाठीं–इहपरलोकीचा सुखशातीचा कल्याणमार्ग सरळ व सुगम करून ठेवावा व त्याप्रमाणे मी या धर्मांत करून ठेविला आहे

पुन आणखी सागतो ऐक हे राजन् ! त्या बरोबरच हेंहि पण लक्षात ठेव कीं दुष्ट–पापी चाडाळ लोकाचें अतिम स्थान नरक हेंच आहे ! जगाचें स्वरूप नीट ओळखून ठेव ! त्याचें सत्यस्वरूप समजल्याशिवाय धर्माविषयीं खरी आवड उत्पन्न होणें हें शक्य नाहीं. एकच वाक्यात तुला जगाची कल्पना द्यावयाची ह्मणजे हें जग व त्यातील यच्चयावत् पदार्थ हे चचल व नश्वर आहेत यथें आपल मुलगे काय, आतइष्ट काय, सगेसोयरे काय, इष्टमित्र काय, कोणी झाले तरी चिरजीव होऊन राहणार नाहींत ! सर्वांना मरण हें मागेपुढें केव्हातरी गाठणारच गाठणार ! तें कोणाला चुकलें नाहीं अगर चुकविता येत नाहीं !

धर्मांचीच जो कास धरील तोच अखेर सुखी होईल ! त्यालाच शाश्वत शांति लाभेल ! इकडे तुझें सदैव अवधान असावें

शिवाय आणखी हेंहि ध्यानात घे कीं तू माझा प्रिय भक्त म्हणून तुझ्या पापाची–दुष्कर्माची क्षमा करावी व तुझ्या कृतकर्माचा भोग चुकवावा असा अहुरमज्द प्रभुरायाचा मला संदेश नाहीं कर्माचें फल ज्याचें त्याला भोगलेंच पाहिजे ! तेथें सुटका नाहीं ! पापाला शिक्षा व पुण्याला बक्षीस असा हा परमेश्वराच्या घरचा दंडक आहे हें विसरू नकोस ! आणि तो कोणाला मोडता यावयाचा नाहीं कीं बदलता यावयाचा नाहीं ! म्हणून भावी उद्धाराची अगर अधोगतीची जबाबदारी ज्याची त्याच्यावरच आहे ! अर्थात् तूच तुझा मित्र व तूच तुझा वैरी ! येथें पेरावें तसें पुढें उगवतें ! चांगलें बी पेरशील तर फळेंहि चांगली येतील नि वाईट पेरशील तर फळेंहि वाईटच ! हा सृष्टीचा नियमच आहे ! आणि तोच धर्मराज्यातहि आहे !

अर्थात् माझ्या सांगण्याचा भावार्थ असा कीं तू येथें राजा झालास म्हणून त्या सबबीवर स्वर्गात तुला विशेष सवलती मिळतील ही आशा अगदी व्यर्थ आहे ! देवाच्या राज्यात राव रंक असा भेदभाव मुळींच नाहीं ! तेथील परीक्षा (त्यानें सांगितलें कीं 'अकेमं अकाई, वंगउहिम अशीम वगहवे ) तुझ्या कर्मावर आहे, दर्जावर नाहीं ही गोष्ट तू व तुझ्यासारखे इतर लोक ओळखतील तर जग खरोखर सुखी होईल ! ('उश्ता अहम्माई, उश्ता कहम्माई चित्') जो दुसऱ्याला सुखी करतो, तोच जगात सुखी होतो तुझीं येथील पुण्यकर्में तुला परलोकीं सुरानंदाची प्राप्ति करून देतील आणि पापकर्में नरकाकडे ओढून नेतील ! तुला सत्य–सत्य सांगतो कीं दुर्बुद्धींत, दुर्वासनेंत, दुर्भावनेंत व दुराचरणात सुख व शांति यांचें नावच काढावयास नको ! हा सर्व माझा उपदेश, राजन् ! तू पूर्ण

लक्षात ठेव आणि त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न कर ! ह्मणजे इहपरलोकीं व सुखाचा भागीदार व भोक्ता होशील ! ! ”

नंतर तेथें जमलेल्या ‘ आथ्रवन ’ आचार्यांकडे वळून त्यांना उद्देशून तो पुढें ह्मणाला–‘ अहो आथ्रवन पंडित हो ! सर्वदयाघन अहुरमझ्द प्रभूच्या पवित्र अवेस्ता ग्रंथात जें धर्मज्ञान सांगितलें आहे त्याचा पूर्ण विचार करा आणि नीट लक्षात ठेवून त्याप्रमाणें आचरण करा ! तें ज्ञान आतापर्यंत जगात कोणालाच उपलब्ध नव्हतें तें ज्ञान तें दिव्य व श्रेष्ठ ज्ञान– सत्य व मंगल ज्ञान– अहुरमझ्दकडून ग्रहण करून तें मी येथें तुह्मास उपदेशिलें आहे ! तें इतकें पूर्ण आहे कीं त्यांत भर घालण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं व त्यांतून काढून घेण्यासारखेंहि कांहीं ठेविलें नाहीं ! इतकें तें परिपूर्ण व स्वयंपूर्ण आहे ! तें ज्ञान ह्मणजे निरंतर वाहणारा ज्ञानामृताचा मधुर झराच का म्हणाना ! पण त्याचें रूप मात्र गूढ व सूक्ष्म आहे ! तें सहजासहजीं समजण्यासारखें नाहीं ! मनुष्यमात्राला या जागतिक जीवनांतील–प्रापंचिक अवस्थेतील–सर्व हितकारक, सुखकारक व उपकारक अशा सर्व गोष्टींचा त्या पवित्र ग्रंथात संपूर्ण समावेश झालेला आहे आतापर्यंत अनेकांनी धर्माच्या गोड नांवाखालीं अज्ञ जगाला स्वार्थमूलक सौम्यानाम्या गोष्टींचा उपदेश केला आहे व हल्लीं करण्यात येत आहे तो सर्व या माझ्या पवित्र अवेस्ताग्रंथाच्या दिव्य निकषावर घासून परीक्षा करून पहा ! जगाची उत्पत्ति, स्थिति व लय याविषयीं काय सांगण्यात आलें आहे याचा बारकाईनें विचार करा ! दिव्यविबुध, जग व जीव यासंबधानें त्या पवित्र ग्रंथात जें विवेचन केलें आहे त्याचीहि दखलगिरी घ्या ! तो धर्म तुह्मी स्वत शिका व दुसऱ्यांना शिकवा ! या धर्माचा जगभर प्रसार होऊन अखिल मानवजात सुखी व कृतकृत्य व्हावी अशी त्या कल्याणमूर्ति विश्व–मंगल अहुरमझ्दची अपेक्षा आहे ह्मणून तुह्माला अखेरचें सांगतो कीं

दुसरी येथें सद्विचारानें, सद्भावनेनें, व सदाचरणानें वागून आपल्या भावी सुखमय परलोकाची सिद्धता करा ! सत्कर्माचें फल चांगलें व दुष्कर्माचें वाईट हें सदैव डोळ्यासमोर ठेऊन त्याप्रमाणें वागा व इतरांस धडा घालून जगासहि सुखी व सपन्न करा ! ! '

( फ्रामरोज रुस्तमजी ग्रंथाधारें )

हा महात्मा झोरोष्टरचा दिव्य संदेश जगाला मननीय नाहीं असें कोण म्हणेल ? खरोखर तो केव्हांहि–तेव्हांहि नि आजहि-मानवमात्राला हितकारक व उपकारकच ठरेल ! त्यात वावगें असें आक्षास तर काहीच दिसत नाहीं उलट त्यात आमच्या प्राचीन ऋषींच्या उज्वल उपदेशाचीच मधुर हाक मारते असें भारतीय अंत:करणाला वाटल्याशिवाय राहणार नाहीं. वरील उपदेश वाचून आम्हाला तर योगीश्वर याज्ञवल्क्यप्रभूंची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं विश्तास्पाला केलेला उपदेश म्हणजे याज्ञवल्क्यांनीं जनकाला केलेल्या उपदेशाचाच जवळ जवळ नमुना आहे असें म्हटल्यावाचून आमच्यानें राहवत नाहीं 'यथोपासते तदैव भवति' 'यथाकारी यथाचारी तथा भवति' 'साधुकारी साधुर्भवति पापकारी पापोभवति', 'पुण्य. पुण्येन कर्मणा भवति पाप. पापेन', आत्मैव सत्यं अन्यदार्तम् इत्यादि शतपथावरील तें एक छोटेंसें पण सुंदर प्रवचनच म्हटलें तर त्यात वावगें असें काय होणार ? असो.

---

## धर्मयुद्ध दुसरें

अरेजास्प हा मोठा धूर्त व कावेबाज होता पहिल्या लढाईला आता जवळ जवळ वीस वर्षें लोटत आलीं होतीं. या दरम्यान परिस्थितींत पुष्कळ फरक झाला होता. कांहीं कारणावरून विश्तास्पाची अस्पंदियारवर

इतराजी होऊन, राजानें त्यास तुरुंगात डांबून ठेविलें होतें. यामुळें **विश्तास्पावर** त्याच्या सरदाराची इतराजी होऊन ते अस्पदियारकडे वळले होते. अर्थात् सुरक्षिततेच्या दृष्टीनें राज्यातील जोम ढिला झाला होता शिवाय विश्तास्प हा राजधानीत नव्हता तो धर्मप्रसारार्थ बाहेर फिरत असून त्यावेळी त्याचा मुक्काम सिस्तानच्या झाल राजाकडे होता फरशिद्वर्द हा खोरासानमध्यें जाऊन राहिला होता. खुद्द राजधानींत नाव घेण्यासारखें कोणीच नसून, फक्त म्हातारा लोहरास्प तेवढाच तेथें होता. या सर्व गोष्टी अरेजत्अस्पास कळल्यावर मग तो गप्प बसतो कशाला ? ही नामी संधि कोण शहाणा फुकट दवडील ? तो मागच्या लढाईतला अपमान अद्याप त्याच्या मनात डिवचतच होता. योग्य संधीची वाट पहातच तो बसला होता. सुदैवानें त्याला ती यावेळीं आयती लाभली

अरेजत्अस्पाच्या मनात सूडबुद्धीनें आता उचल खाल्ली व या अनुकूल परिस्थितीचा फायदा घेण्याचें त्याने ठरविलें मग विलंब कसला ! तावडतोब सैन्याची जमवाजमव करून एकदम बल्ख राजधानीवर तो चाल करून गेला. यावेळी त्याला नशीब अनुकूल असल्यामुळें त्याला वाटेंत म्हणण्यासारखा अडथळा कोणी केला नाहीं. नवसशहराचें दुर्दैव आता ओढवलें ! अरेजतअस्प अगदी नजीक आला तेव्हा कोठें ती बातमी त्या वृद्ध लोहरास्पास कळली. पण तो आता करणार तरी काय ? जातीचा योद्धा खरा पण आता पिकलेलें पान ! शहरात म्हणण्यासारखें सैन्य नव्हतें तथापि जें काय थोडें होतें तें सर्व घाईघाईनें जमा करून क्षात्रधर्माला अनुसरून शहर लढविण्याची त्यानें तयारी केली तों इतक्यात शत्रूचें सैन्य शहराबाहेर येऊन थडकलेंच ! या वेळेस अरेजतअस्पाची जय्यत तयारी होती हें निराळे सागणें नकोच.

लोहरास्पाचे लोक वेशीतून बाहेर पडतात न पडतात तों अरेजतअस्पाचें सैन्य वाघाच्या छातीनें एकदम त्या लोकावर तुटून पडले लोहरास्पाच्या

लोकानीहि शिकस्त करून त्याला बाहेरच्या बाहेरच थोपवून धरलें पण हें किती वेळ चालणार ? शेवटी शत्रूचा लोंढा अनावर होऊन, त्याच्यापुढें बल्खच्या लोकाचा टिकाव धरवेना किती झालें तरी अरेतअस्पाचें सैन्य अफाट असल्यामुळें व ते यात्वेपेस मोठ्या निकरानें लढत असल्यामुळें त्याच्या अशा माऱ्यापुढें लोहरास्पाच्या मूठभर लोकाना टिकाव धरणे शक्य नव्हते आता हळुहळू त्याचा पाय मागे पडत चालला शत्रूच्या सैन्यानें सारखी लाडगैतोड चालवून त्याना मागे रेटीत एकेक पाऊल पुढे टाकीत अखेर शहरची वेस गाठली !

या धामधूमींत लोहरास्प हा अचानक शत्रूच्या हातीं सापडला व त्याच्याशी शौर्यानें लढता लढता शत्रूच्या तरवारीचा वार लागून घायाळ होऊन तटबदीनवळ खाली पडला तो कायमचाच ! पुन काही वर उठला नाहीं ! तेथेंच त्याचे प्राणोत्क्रमण झाले !

## दिव्य ज्योत मालवली !

लोहरास्पाचा याप्रमाणें बळी घेतल्यावर हा हा म्हणता शत्रूचें लोक वीरगर्जना करीत गावात घुसले ! काय सागावी नि किती सागावी त्या अनाथ व गरीब प्रजेची दुर्दशा ! प्रत्यक्ष प्रळयकाळच त्याचा तो ! पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें शत्रूचे लोक हा हा म्हणता गावात सर्वत्र पसरून, तेथें त्यानी एकच हाहा कार मानविला ! घूस घराख, धर मनुष्य की उडीव मुडकी ! जिकडे तिकडे लूटमार, फोडतोड नि जाळपोळ ! दुसरी बातच नाहीं ! त्यावेळीं जो अनर्थ गुदरला तो सागून पुरवत नाहीं ! बायकामुलाच्या आक्रोशानी आकाशपाताळ एक झालें ! कोणी वाली उरला नाहीं व कोणी शास्ता राहिला नाहीं ! सर्वत्र गोंधळच गोंधळ ! ती सुदर राजधानी थोड्याच वेळात रक्तानें सर्वत्र माखून गेली ! या धादलीत विश्तास्पाच्या

दोन मुली अरेजत्‌अस्पाच्या हाती लागल्या व त्याना बंदीवान् करून त्यानें आपल्याबरोबर घेतलें !

गावात याप्रमाणें प्रळय व हाह.कार चालला असता अरेजतत्‌अस्पाचे काहीं लोक 'खुद्दरम' च्या नेतृत्वाखाली लूटमार करीत करीत महात्म्या झोरोष्टराच्या प्रख्यात 'नुश आझर' या पवित्र अग्निमदिराकडे वळले. केवढें भव्य व सुदर पवित्र मदीर तें ! शत्रु मदिरात शिरले त्यावेळी वेदीवर ऐंशीएक आथ्रवन् (स्तुतिपाठक) अग्नीची प्रार्थना करण्यात गुतले होते जिकडे तिकडे सुगधित वातावरण दरवळलेलें असून तेथें अग्निनारायण आपल्या पवित्र तेजस्वी कातीनें तळपत होता ! केवढा सुदर देखावा तो ! किती गोड प्रार्थना ती ! परिमळ द्रव्याचा काय मधुर सुवास तो ! आथ्र-वनाचा तो शुभ्र पोशाख, अग्नीची ती तेजस्वी ज्वाला, मदिराची ती मनो-हर सजावट हें सर्व पाहून सज्जनाचें अत करण सहज तेथें खुलून जावयाचें ! पण दुष्ट व भ्रष्ट दुर्जनाना काय तें ! मदिरात शिरताचा त्या दुष्टानीं सरळ अग्निशाळेंत प्रवेश करून तेथील पवित्र अवेस्ता ग्रथ उचलून तो त्या अग्नी नारायणास आहुति म्हणून दिला ! आणि प्रत्येक पुरोहितास पकडून त्यास निर्दयपणें कठस्नान घालून त्याच्या पवित्र रक्तानें तो प्रदीप्त अग्नि पार विझ-वून टाकला !! आणि त्या सुवर्ण मदिराला आग लावली ! !

तेथेच महात्मा **झोरोष्टरहि** होता तो अग्नीची प्रार्थना म्हणण्यात रगला होता इतक्यात त्या दुष्ट **तुरबरातूर** तुराण्याची पापी नजर त्या पुण्यात्म्याकडे वळली व तो त्या सत्पुरुषावर धाऊन जाऊन त्यानें आपल्या तीक्ष्ण तरवारीनें प्रहार करून त्यास खाली पाडलें ! महात्मा खाली पडता पड-ताच हातातील जपमाळ त्याच्यावर फेकली, तों त्यातुन अग्नि प्रगट होऊन त्या दुरात्म्याची त्यानें तेथल्या तेथें राख रागोळी करून टाकली ! **झोरो ष्टर** खाली पडला न पडला तोंच त्याची दिव्य ज्योत त्याला सोडून निघून

गेली!' या धांदलीत त्या अग्निशाळेत पैकी आग्मेयनाचे मुडदे पाडून अग्निमंदिराला आग लावून ते नष्ट व दुष्ट शत्रु तेथून आनंद घोष करीत बाहेर पडले। (दिनदई, ५-३-२)

आला. तेथें सैन्याची जमवाजमव करून आपल्या शूर मुलासह अरेजत-अस्पास गाठण्यास म्हणून निघाला. अजून अरेजतअस्प हा विश्तास्पाच्या राज्यातच धुमाकूळ घालत फिरत होता. मजल दरमजल करीत त्यानें अरेजतअस्पास गाठलें व त्यावर निकराचा हल्ला केला. यावेळीं विश्तास्पाचे इतर मांडलिक व सुभेदार त्याच्या सहाय्यास फारसे आले नाहींत. त्यांची वाट न पहाता व मदतीची अपेक्षा न करता मिळवता आले तितकें सैन्य बरोबर घेऊन त्यानें पुढें दौड मारली. मात्र या चकमकींत जामास्प हा त्याच्या बरोबर होता.

विश्तास्प हा जातीचा मोठा शूर खरा व तसाच मोठा धाडसी ! पराक्रमांत त्याच्या तोडीचा तसा कोणी वीर नव्हता. या सर्व गोष्टी खऱ्या. पण लढाई म्हणजे अशी काही विलक्षण गोष्ट आहे कीं तेथें शौर्य व सामर्थ्य एवढ्यावरच भागत नाहीं. तेथें त्याच्या जोडीला दैवहि अनुकूल असावें लागतें ! तें नसलें म्हणजे बाकीचें सर्व असूनहि नसल्यासारखेंच ! या खेपेस विश्तास्पाचीहि अशीच स्थिति झाली. दैव त्याला अनुकूल नसल्यामुळें सगळें पारडें उलटलें व त्याला चांगलाच मार बसला ! यावेळीं अरेजतअस्पाचे ग्रह सगळे उच्च असल्यामुळें त्याची सरशी झाली व विश्तास्पाची बाजू पिचकी व लंगडी पडली ! त्याचा शूर मुलगा फरशिदवर हा जखमी होऊन धारा-तीर्थी पडला व त्याच्या सैन्याची वाताहत झाली !

विश्तास्प आता आपलें काहीं चालण्यासारखें नाहीं हें पाहून तो रणातून निसटून जगताई डोंगराच्या ओळींत शिरून, तेथें एका डोंगरात लपून बसला ! ही बातमी अरेजतअस्पाच्या कानावर येताच त्यानें आपला मोर्चा तिकडे वळवून त्या डोंगरास समोवतानें गराडा देऊन त्याची कोंडी केली व त्याची पाळत करीत तेथें तळ देऊन बसला. आता अरेज-तअस्पाचा आनंद म्हणजे काय सांगावा ! त्या आनंदापुढें त्याला स्वर्ग

देईल तुच्छ याटू लागला ! ! आणि यात आश्चर्य तरी काय ! अल्प विजयानें हुरळून जाऊन आनंदानें बेहोष होऊन नाचू लागणें हा क्षुद्र मनुष्याचा सहज स्वभावच आहे ! ( शहानामा, पृ ३०६ )

## सिंह पिंजऱ्यांतून सुटला !

या वेळी असदीयार मोकळा असता तर ! शाह चित्र काही निराळेंच रंगलें असतें ! पण हे भाग्य त्यावेळीं विश्तास्पाचें नव्हतें ! त्याला कोण काय करणार ! आता विश्तास्पाची फजीति झाली इतकेंच नव्हे तर राज्यावर पाणी सोडण्याची वेळ आली ! या आपत्तीतून उद्धार करणारा जर काहीं आशेचा तंतु आता शिल्लक राहिला असेल तर तो एक असदीयारच ! त्याच्याशिवाय आता तरणोपाय राहिला नव्हता पण त्याच्याकडे जाण्यास आता विश्तास्पास तोंड कोठें होतें ! त्यानेंच तर त्यास नगलाच सहाय घेऊन बंदीशाळेंत डांबून ठेविलें होतें मग आता कोणत्या तोंडानें त्याने त्याजकडे जावें ! आणि यदाकदाचित् गेला तरी तो मानील तरी कसा ! हें सर्व त्यास अवघड वाटलें हें ठीकच झालें पण त्याला सोडून हें संकट आता निवारणार तरी कोण नि कसें हाहि त्यास प्रश्न पडला

विश्तास्प आता मोठ्या संकटात पडला पेचात अडकला आणि अखेर निराशेच्या डोहात जाऊन गडप झाला ! अरेजतअस्पाची कोंडी इतकी घडक होती की बाहेरलें माणूस आत व आतलें बाहेर जाण्याची मुळीं सोयच नव्हती ! जिवाची आशा सोडूनच तसें धाडस करावयास कोणी तयार असेल तर ती गोष्ट निराळी, पण सुखासुखी हें होणें शक्य नव्हते कोंडीत सापडलेल्या लोकांची उपासमार इतक्या थरास येऊन पोंचली की जवळ असलेलें घोडे मारून त्यावर उदर निर्वाह करणें त्यास

भाग पडलें ! पण हें किती दिवस चालणार ? मात्र एक गोष्ट सुदैवानें अशी होती कीं अष्टावधानी व अष्टपैलू जामास्प त्यावेळीं राजाजवळ होता. त्यानें हा सर्व प्रकार नि परिस्थिती ताडली या पेचातून मुक्त व्हावयाचें तर अस्पदीयारकडे धाव मारल्याशिवाय गत्यतर नाहीं हें ओळखून त्यानें आपण होऊनच ती गोष्ट **विश्तास्पाजवळ** काढली व त्यास जाऊन भेटण्याची परवानगी मागितली राजाला तरी काय तेंच हवें होतें अर्थात जमास्पास ती देण्यात आली, हें उघड सागावयास नकोच.

रात्रीची वेळ. काळोख पडलेला अरेजत्अस्पाचे लोक अथरुणावर कोणी पडून तर कोणी बसून गप्पा मारीत होते पहारेकरी अधुनमधुन गस्त घालीत व पहारा करीत हिंडत फिरत होते अशावेळी एक तुरानी डोंगरावरून उतरून खाली आला व पायथ्याशी आल्यावर थोडावेळ थाबून पुन तो चालू लागला इतक्यात काही गस्तवाले आपल्याकडेच येत आहेत असें त्यास पादत्राणाच्या आवाजावरून समजून आल्यामुळें तो चटकन बाजूस होऊन एका झाडामागें लपला ते लोक तसेच पुढें गेल्यावर तो बाहेर पडून त्या तुरानी सैन्याच्या छावणींतून आडमार्गानें वळसे घेतघेत बाहेर पडला व पुढें सरळ **गुंबदान** किल्ल्याच्या रस्त्यास लागला.

हा तुरानी कोण हें वाचक समजले नसतील व तो एवढया रात्रीचा एकटाच का बाहेर पडला यानद्दलहि त्याना कोडे पडले असेल ! पण आता त्याना फार बुचकळ्यात ठेवणें हें योग्य होणार नाहीं म्हणून आम्ही आता एकदमच सागून टाकतो की तो तुरानी म्हणजे **विश्तास्पाचा** पतप्रधान जामास्प ! तुरानी वेष करून तो रात्रीचा अस्पदीयारकडे निघाला होता तसें केलें नसतें तर त्याला शत्रूची छावणी ओलाडून सहीसलामत बाहेर पडता आलें नसतें. तुरानीवेषातून बाहेर पडला म्हणूनच त्याचा निभाव लागला, व सरळ रस्त्यास लागला असो

पुढें तो चालत जाऊन गुनदान किल्ल्याजवळ आल्यावर येथें त्याला घाईंत अस्पदीयारचा मुलगा नुरा आझर हा भेटला त्यानें त्यास किल्ल्यावर नेऊन तेथें अस्पदीयारची भेट करविली प्रथम काहीं औपचारिक भाषण झाल्यावर जामास्पानें गोष्ट काढली तो म्हणाला- मी येथें आलो त्याचें कारण आता तुला सागतो तें ऐक अलीकडे अरेजतअस्पाने राज्यात भारीच अनर्थ माडला आहे तो बल्ख शहरावर चाल करून येऊन तें शहर त्यानें उद्‌ध्वस्त करून टाकलें ! तुझा वृद्ध आज धारातीर्थी पडला ! महात्मा झोरोष्टरचा खून झाला ! अग्निमंदिराला आग लागली ! अवेस्ता ग्रथ जळून भस्म झाला ! गावात लूटमार, जाळपोळ, फोडतोड याची तर गणतीच नाहीं ! शहर सगळें ओस पडलें आहे ! तुझ्या बहिणींना पकडून बरोबर नेलें आहे ! तुझा भाऊ फरशिद्वर हाहि लढाईंत मारला गेला, तुझा बाप पराभूत होऊन जगताई डोंगरात शिरून लपून बसला असून त्या डोंगराला अर्जास्पाचा वेढा पडून, आतील लोकाची फार कुचबणा चालली आहे ! यावेळीं तुझ्या सहाय्याची राष्टास अत्यत जरूरी आहे बापानें केलेला अपराध या आणीबाणीच्या वेळीं सर्व पोटात घालून व झालें गेलें तें सर्व विसरून तू पुन शस्त्र धारण करावेंस व शत्रूची खोडकी जिरवून बापास व देशास मुक्त करावेंस, ही माझी तुला विनति आहे ! राष्ट्रध्वजाचा मान व झोरोष्टर धर्माची लाज राखण्याची ही वेळ आहे ! प्रसग मोठा नाजूक आहे ! तेव्हा उशीर न करता, सर्व काही विसरून, देशाच्या रक्षणार्थ व आईबापाच्या मुक्ततेसाठी तुला लढणें प्राप्त आहे तर कृपाकर व येथून लवकर नीघ

थोर व उदार मनाचा अस्पदीयार तो ! जामास्पाच्या तोंडून ती दु खकारक व करुणास्पद स्थिति ऐकून त्याचें मन तडफडलें व कळवळलें ! व काही आढेवेढे न घेता जामास्पाच्या विनतीस मान देऊन, मागचें सर्व

विसरून देशावर व धर्मावर आलेलें सङ्कट दूर करण्यास तो तुरुंगातून बाहेर पडला व त्यानें हातात शस्त्र धारण केलें !

( शहानामा ( अलेक्झाडरकृत ) पृ ३०७ )

## रणचंडी भडकली

वीर अस्पदीयार तुरुंगातून सुटून बाहेर आला ही बातमी विश्ता स्पाच्या हाय खाल्लेल्या सैन्यात पसरताच, त्या हताश झालेल्या अत करणात पुन नवचैतन्य तेनाळलें ! त्याच्या वीरश्रीला पुन भरती चढली ! बाताहत होऊन इकडे तिकडे पागलेले सैनिक मधमाशाप्रमाणें पुन एकत्र जमून, इराणचा पडलेला नावटा त्यांनीं पुन उभा केला ! अस्पदीयारच्या पक्षाचे सुभेदार जे मागच्या सग्रामात अलिप्त होते ते आता त्याच्या आमत्रणावरून आपल्या सैन्यासहित त्यास येऊन मिळाले

अस्पदीयार हा तुरुंगातून सुटून लढाईची जुळवाजुळव करू लागला आहे ही बातमी अरेजतअस्पाला कळताच त्याच्या छातींत धडकीच भरली ! तो तुरुंगात डाबला गेला असून मोकळा नाहीं, या समजुतीनेंच त्यानें हें धाडस केलें होतें तो मोकळा असता तर त्यानें ही दगदग केली नसती अस्पदीयारचा हात तो मागच्या लढाईतच चागला ओळखून होता आता तो मोकळा सुटला या बातमीनें त्यानें हाय खाली व **विश्तास्पाचा** वेढा उठवून सर्व सैन्य एकत्र जमविण्याच्या उद्योगास तो लागला

शत्रूची आडकाठी गेली हें **विश्तास्पास** कळून येताच तो चटकन खाली उतरून अस्पदीयारला भेटावयास आला पितापुत्राची गाठ पडून सर्वंस आनदी आनद झाला जमलेल्या सैन्याचे तीन भाग पाडून मधल्या भागाचें धुरीणत्व **विश्तास्पाकडे,** झरीरचा मुलगा नस्तूर याजकडे उजवी बाजू व गरदोई ( कर्दीन ) याजकडे डावी बाजू सभाळण्याची

कामगिरी सोपवून अस्पदीयारने आपलें पथक निराळें व स्वतंत्र ठेवलें इकडे शत्रूकडे अरेजतास्प हा मध्यभागीं, वहरम हा उजवीकडे व चिगिलचा राजा हा डावीकडे अशी योजना आपल्यात आली त्या रणगाजी अस्पदीयारच्या नेतृत्वाखालीं त्या दुष्ट अर्जास्पची खोड जिरविण्यासाठीं इराणीसैन्य नम्यादमानें व गरुडगतीनें चालून जाऊन वाघाच्या आवेशानें शत्रूवर झडप घालण्यास सिद्ध होऊन उभें राहिलें

अरेजतस्पाचे लोक नजरेस पडताच आरमज्दच्या नावाचा व महात्मा **झोरोष्टरच्या** जयजयकार करुन अस्पदीयारनें आपल्या म्यानेतील तेजस्वी महाकाली चकचकीत सूर्यप्रकाशात सरकन् बाहेर उपसली ! छे, तलवार कसलीती, प्रथम रणचंडीच ! आता तो अस्पदीयार नव्हे, तर शत्रूचा कर्दनकाळ ! ती घोषणा नव्हे, तर खवळलेल्या सिंहाची काळीज थरारून सोडणारी भयकर डरकाळी ! अस्पदीयारने शिंग फुंकताच लढाईला तोंड लागलें चकमक सुरू होते न होते तोंच अस्पदीयारनें अरेजतस्पाच्या उजव्या फळीवर तुटून पडून शत्रूच्या कापाकापीस सुरवातच केली अस्पदीयारचा त्यावेळचा आवेश व पराक्रम पाहून त्या भागाचा पुढारी हा हाय खाऊन त्यानें रणातून पळ काढला ! नस्तूरनें शत्रूच्या डाव्या फळीवर हल्ला चढवून तेथें त्यानें प्रळय माडून सोडला हे सर्व पाहून अरेजतस्प हा घाबरून जाऊन आपल्या बाजूचें नेतृत्व गर्गसार याजकडे देऊन, आपण दूर एका टेकडीवर जाऊन तेथून लढाई पहात बसला पुढे अस्पदीयारनें **खुहरम** यास पिटाळून लावल्यावर अरेजतस्पाचा समाचार घेण्यासाठीं म्हणून मध्यभागाकडे वळला तेथें याला अरेजतस्प न दिसता त्याच्या जागीं गर्गसार हा दिसला त्या दोघात थोडी झोंबाझोंबी होऊन, अखेर अस्पदीयारनें मोठ्या कौशल्याने त्यास पकडून, गिरफदार करून छावणींत रवाना केलें ! अरेजतस्पानें डोळ्यानें

हें पाहिलें मात्र त्यानें मागच्या मार्गेच आपला पळता पाय काढला ! झालें ! खुहरम बेपत्ता झाला गर्गसार शत्रूच्या हातीं लागला व अरेजतस्प मागच्या मार्गेच फरारी झाला ! मग आता अरेजतस्पाच्या लोकानी लढावें तरी काणाच्या जिवावर ? अर्थात् त्याचाहि दम खचला व त्यानीहि शस्त्रें टाकून आपल्या राजाचेंच अनुकरण केलें !!!

यावेळी इराणचें सैन्य इतक्या शौर्यानें, नेटानें, धैर्यानें व जुटीनें लढलें की अरेजतस्पाचे लोक फार वेळ टिकाव धरू शकले नाहींत ! लवकरच त्याच्यात शिस्त व व्यवस्था बिघडून सर्वत्र एकच गडबड व गोंधळ माजला !! आता पुढें फार लिहण्याचें कारण राहिलें नाहीं थोडक्यात म्हणजे शूर व मर्द अस्पदीयारनें पहिल्याच सपाट्यात आपला हात दाखवून शत्रूस रणातून पिटाळून लावलें ! व त्याच्या छावणींत शिरून ती लुटून फस्त केली ! विजयश्रीच्या सुदर मालेनें कठ विभूषित करून, विजय घोष करीत तो आपल्या छावणीकडे परतला !!

( शहानामा अलेक्झाडर कृत पृ २०७ व २०८ )

दुसऱ्या लढाईतील अखेरची सैन्य रचना



## पूर्णाहुति !

विजयी असदीयार हा आता रणभूमिवरून निघून आपल्या बापास भेटावयास म्हणून त्याच्या छावणींत आला विश्वासरावास तो आल्याची बातमी लागताच त्याने बैठकीवरून उठून बाहेर येऊन आपल्या विजयी मुलाचे मोठ्या प्रेमानें स्वागत केलें व वचन दिल्याप्रमाणे त्यास आपली गादी देऊ केली पण असदीयारनें सांगितलें कीं गादीसाठीं मी काहीं हपाप-लेला नाहीं मला अजून पुष्कळ कार्यें करावयाचीं आहेत तीं पुरीं केल्या-शिवाय मला गादीविषयीं प्रेम वाटणार नाहीं प्रथम म्हणजे हें कीं अरे-जतस्पाच्या मला शोध लावला पाहिजे तो माझ्या हातातून निसटून रणांमधून पळून गेला आहे तर त्याच्या राज्यात शिरून त्याला पकडून योग्य प्रायश्चित्त दिल्याशिवाय-त्याच्या पापाचें माप त्याच्या पदरीं पूर्ण टाकल्या शिवाय-माझ्या जिवाला चैन पडणार नाहीं ! शिवाय माझ्या बहिणी त्याच्याजवळ बंदीवान होऊन आहेत त्यांची सुटका झाली नाहीं तर हा विजय मिळवून फायदा काय ?

मी आता त्या नराधम अरेजतस्पाच्या राज्यावर चाल करून जातो त्या दुष्टाला जेथें दडून बसला असेल तेथून शोधून काढून, त्याच्या रक्तानें माझ्या तलवारीला न्हाऊं घालतो ! त्याशिवाय मला अन्न गोड लाग लागणार नाहीं ! आणि माझ्या बहिणींची सुटका केल्याखेरीज मला स्वस्थ झोप येणार नाहीं ! त्या खल पुरुषानें आमचें राज्य लुटून आमच्या प्रजेची दाणादाण केली, त्याप्रमाणे त्याचेहि लुटून उध्वस्त करून येथून लुटून नेलेली संपत्ति सव्याज परत आणीन तरच व तेव्हाच मला या विजयाचा खरा आनंद होईल ! तोंपर्यंत मी दु:खीच समजा ! इतकें बोलून तो स्वस्थ झाला आणि विश्वासपहि त्यावर पुढें काहीं बोलला नाहीं

नंतर त्या अस्पदीयारनें आपल्याबरोबर काही निवडक सैन्य घेऊन तुराणावर चाल केली. अरेजतस्पाच्या राज्यात शिरला तरी त्याला अडथळा करण्यास कोणीच पुढें आले नाहींत! तसाच तो आगेकूच करीत करीत व त्या पळपुट्या अरेजतस्पाचा तपास करीत करीत अखेर तो ज्या किल्यात लपून बसला होता, त्या किल्याजवळ जाऊन तेथें आपला तळ दिला. किल्ला फार अवघड होता व वाटेंत अनेक अडथळे होते. त्याला वेढा देऊन लढून तो सर करणें हें काम सोपें नव्हतें त्याला वर्षोची वर्षे लागतीं म्हणून त्यानें एक युक्ति लढवून तें काम सुकर करण्याचें योजिलें-

ती युक्ति म्हणजे अशी - तो स्वतः वेषांतर करून एक बडा व्यापारी बनला व बरोबर शभर उंट घेतले त्यांत दहा उंटावर सोन्याचे नाना तऱ्हेचे अलंकार, पाच उंटावर हिरेमाणकाचे दागिने व इतर जड-जवाहीर व पाच उंटावर चायनाची जरीचीं वस्त्रें ( Brocades ), लादून बाकीच्या ऐंशी उंटावर प्रत्येकीं दोन दोन मोठाले पेटारे लादून ठेविले प्रत्येक पेटाऱ्यात हत्यारबंद असा एकेक वीर बसविला याप्रमाणें व्यवस्था करून व आपल्यामागें तेथील सैन्याचें नेतृत्व आपला भाऊ पेशोतन यास देऊन व त्याला काही कानगोष्टी सांगून तो तेथून निघाला आणि त्या व्यापारी वेषांत वाटेतील अडथळे निस्तरून अखेर त्या किल्ल्यात शिरला

किल्ल्यात शिरल्यावर आंत लोकांनी त्यास कोण, कोठून व का आला असें विचारता, आपण दूरदेशाचे व्यापारी असून राजास काहीं जडजवाहीर व सोने चांदी याचे दागदागिनें दाखवावयास आलो असें त्यानें त्यास उत्तर दिलें काहीं जणानी त्यास दागिनें दाखवावयासहि सांगि-तलें. पण त्यानें अरेजतस्पास अगोदर दाखवून मग राहिलेला माल तुम्हास

दाखवीन असें सांगून वेळ मारून नेली नंतर तो सरळ राजाच्याकडे निघाला तेथें आल्यावर अरेजतखास वर्दी पोंचविल्यावरून तो तेथें आला व त्याच्याशीं विचारपूस केल्यावर आपल्या वाड्याशेजारीच एक मोठा वाडा त्यास उतरावयास दिला व त्या वाड्यामागेंच उघड्या जागेंत उटाची सोयहि केली

नंतर अस्पदीयारनें वाड्यात जाऊन आपलें सर्व सामान व्यवस्थित लावलें व दुसरे दिवशीं अरेजतखास बोलावून त्यास सोन्याचांदीचे व जड-जवाहिराचें सुंदर सुंदर दागदागिनें व वस्त्रें दाखवून त्यास हवे असलेले जिन्नस अगदीं सोयीच्या भावात देऊन त्यास अगदीं खुष केलें त्याचप्रमाणें इतर सरदार मानकऱ्याखहि त्यांनीं पसंत केलेलें सामान तशाच हलक्या दरानें दिलें या व्यवहारात त्यानें आपल्या वस्तूचा भाव रुपयाचा चार हिस्सा आण्यावर आणला होता याप्रमाणें सौदा करून त्यानें तेथील लोकांना अगदीं खुष केले या वेळीं तो राजाच्या भेटीसाठीं राजवाड्यात जात येत असता त्याच्या बहीणी बाहेरचे पाणी वाहून आणण्याचें दासीचें काम करीत होत्या त्यानीं यास ओळखलें व यानेंहि त्यास ओळखलें पण दोघानीं शहाणपणा करून ती ओळख बाहेर कळू दिली नाहीं

याप्रमाणें अस्पदीयारनें आपलें वजन राजावर लवकरच बसवून त्यास एके दिवशीं मोठीं मेजवानी देण्याचा घाट घातला व त्याप्रमाणें तेथील सर्व सरदार दरकदार व इतर लहान बडे अधिकारी यास आमंत्रण दिलें मेजवानीची वेळ रात्रीची ठरवून, उत्तमोत्तम खाद्यपेयाची सुंदर तयारी करण्यात आली त्यादिवशीं वाड्यावर व किल्ल्यावर रोषनाई करण्याची परवानगी घेऊन तें कामहि चोख बजावण्यात आलें तटावर मोठा विस्तव पेटवून त्याचा उजेड दूरवर दिसेल असें करण्यात आलें

पुढें ठरल्याप्रमाणें राजा अरेजतस्प व सरदार मंडळीं व इतर आमंत्रित प्रतिष्ठित लोक वेळेवर एकामागून एक जमूं लागले सर्व मंडळीं जमल्यावर मेजवानीला सुरवात झाली. जेवण्यात दारूची उत्तम सोय केली असल्यामुळें मेजवानीस चांगला रंग चढला होता. सर्वांनीं दारूवर यथेच्छ झोड दिली. पुढें नाचरंग होऊन सभा बरखास्त झाली. अरेजतस्प आपल्या शयन मंदिरात दारूच्या धुंदीतच पलंगावर जाऊन पडला. कांहीं लोक दारू पिउन झिंगून जेथल्या तेथेंच पडून राहिले. व कांहीं घरीं गेले. लवकरच सर्वत्र सामसूम झाली.

ही वेळ आपणास अनुकूल आहे असें पाहून अस्पंदीयारनें आत येऊन ते पेटारे उघडून आतील वीराना बाहेर काढले. व त्याना शस्त्रास्त्र घेऊन लवकर सज्ज होऊन राहण्यास सांगून तो तेथून चटकन् राजवाड्यात गेला. तेथें गेल्यावर बहिणी–हुमाय व दुसरी बहीण– झोपल्या होत्या तेथें जाऊन त्याना उठवून तानडतोब तेथून निसटून बाजारातील आपल्या वखारींत जाऊन बसण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या तशाच सडया तेथून निघाल्या व तडक वखारींत येऊन दाखल झाल्या. नंतर तो पुनः आपल्या वाड्यात आला. त्या दरम्यान ते सर्व वीर लढाऊ पोशाख करून सज्ज होते. त्या एकशें साठ वीराच्या त्यानें तीन तुकडया केल्या. एका तुकडीस किल्ल्यातील लोकावर, दुसरीस किल्ल्याच्या दरवाजावर व तिसरीस वाड्यात दारू पिऊन तेथेच जे झिंगून पडले होते त्याच्यावर हल्ला करण्यास सांगितलें. तटनंदीवर रोषनाई प्रीत्यर्थ विस्तव पेटवून उजेड केला होता. त्याचें इंगित म्हणजे जे त्याचे बाहेर सैन्य होते त्याना तानडतोब किल्ल्यावर चढाई करून येण्याचा इशारा होता. त्याप्रमाणें पेशोतननें तयारी करून रातोरात किल्ल्यावर हल्ला चढविला.

याप्रमाणें व्यवस्था केल्यावर असंदीयार आपण स्वतः तलवार घेऊन राजवाड्यांत शिरला. आणि जो सांपडेल त्यावर तलवार चालवून त्यास जमिनीवर लोळवीत सरळ अरेजतस्प झोंपला होता तेथें आला. इतक्यांत वाड्यांतील आरडाओरड ऐकून त्याम जाग आली व तो गादी वर उठून बसतो न बसतो तों इतक्यात दरवाजा उघडून असंदीयार आंत शिरलाच ! त्याला पाहून व प्रसंग ओळखून तेथेंच खुंटीला टांगून ठवलेली तलवार त्यानेंहि हातांत घेतली.

मग आतां काय ? दोघांचीहि झुंज लागली. दोघहि एकमेकाच्या शस्त्रानें घायाळ झालें. असंदीयारच्या शरीरांतून रक्त वाहूं लागलें. दोघांची क्षणभर तेथें चांगलीच चकमक झडली. कोण कोणाला हार जाईनासें झालें. याप्रमाणें दोघेहि जिवावर उदार होऊन निकरानें लढत असतां असंदीयारच्या तलवारीचा एक वार अरेजतस्पाच्या वर्मी लागून तो धपकन् खाली पडला. लागलीच असंदीयारनें पुनः मोठ्या शिताफीनें आणखी एक अचूक व हुकमी वार करून त्या दुष्ट अरेजतस्पाचें शीर धडापासून तोडून खाली जमीनीवर पाडलें ! झालें सगळा ग्रंथ आटोपला ! रणदेवतेला पूर्णाहुति पोंचली ! आणि भटकलेली रणचंडी आता शांत व तृप्त झाली ! याच वेळेस त्याचे काही लोक वाड्यांत शिरून, तेथें दारू पिऊन झिंगून पडलेल्या लोकांना परलोकाची वाट दाखवून धांवत तेथें आलें आणि त्या तुराणी दुष्ट व उन्मत्त अरेजतस्पाच्या मृत होऊन पड-लेल्या शवासमोंवती जमून सर्वांनी एक शेवटचा मोठ्यानें विजयघोष केला !

नंतर तेथून निघून (बाजारात) वखारींत येऊन असंदीयारनें बहिणींची भेट घेतली. केवढा आनंद त्यांचा ! त्या बहिणींचा ! असंदी-यारला पाहतांच धावत जाऊन त्यास त्यांनी कडकडून मिठी मारली!

व अस्पदीयारनें त्याच्या पाठीवरून प्रेमाने कुरवाळलें ! नंतर त्या राजकन्या दासी वेषाला रजा देऊन राजकन्याच्या झगझगीत वेषात चमकू लागल्या याप्रमाणें या लढाईचा शेवट गोड होऊन सर्वांना आनदी आनद झाला, आणि हें दुःख व शोकप्रद लढाईपर्व एकदाचें पूर्ण विराम पावलें

पुढें पेशोतनच्या सैन्यानें किल्ला जिंकून आत प्रवेश केला, व विजयी अस्पदीयारला भेटून त्याच्या नावानें जयजयकाराचा आनद घोष करून तेथील वातावरण निनादून टाकण्यात आलें तुराणी राजधानीची व तेथील इतर मोठमोठ्या शहरांची लुटालूट करण्यात येऊन अलोट सपत्ति जमविलेंत आली व त्यातील बराचसा भाग अस्पदीयारनें आपल्या सैन्यातील रणगाजी लोकास सढळ हातानें खैरात करून त्यास खुष व आनदी आनद करून टाकलें व राहिलेली सपत्ति उटावर लादून सर्व लोक विजय घोष करीत तेथून आपल्या बल्ख राजधानीकडे वळल अरेजतस्पानें बल्ख लुटून मिळविलेली सपत्ति शभर उटावर लादून खल्लक्र कडे आणली होती तर अस्पदीयारने तिच्या दसपट म्हणजे एक हजार उटावर तेथील लूट लादून बल्खकडे आणली !! ही बातमी विस्तास्पास समजताच त्याचा आनद गगनी मावेनासा झाला. त्याने हर्षोत्फुल्ल अतःकरणाने आपल्या विजयी अस्पदीयारचें मोठ्या प्रेमाने व थाटानें स्वागत केलें, हें आता उघड सागावयास नकोच

(अलेक्झाडरकृत शहारनामा पृ ३३४ ते ३४१)

## झोरोष्टरचें व्यक्तिमत्व

महापुरुषांचें जीवनचरित्र सामान्य जनतेला कोठेंहि व केव्हांहि अनुकरणीय व आदरणीय असेंच असते अर्थात् ते मानववशाचे जसे

काही दीपस्तंभच आहेत, असे म्हटल्यास त्यात काही वावगे होणार नाही म्हणून महात्मा झोरोष्टरचे गुण व स्वभाव येथे थोडक्यात वर्णन करून वाचकास त्याच्या जीवनचरित्राचे मर्म व रहस्य थोडक्यात पटवून देण्याच्या उद्देशाने आम्ही त्याच्या स्वभावगुण दर्शनाचा उन्त उन्त परामर्श घरू इच्छितो प्रथमत म्हणजे तो दिसावयास मोठा सुदर व आकर्षक होता तो रगाने चांगला गोरागुमटा असून, त्याच्या मुखावर ज्ञानाचे सात्विक तेज स्पष्ट तळपत होते तो आजानबाहू असून शरीर यष्टि उंच व धिप्पाड होती कपाळ उच, गाल डाळेभोर, नाक सरळ व चेहरा रेखीव, आकर्षक व पाणीदार होता तो बांध्याने चांगला बळकट व मनाने मोठा खबीर असून, त्याची प्रकृति सुदृढ व निरोगी होती, तो वर्तनाने सरळ असून अत करणात तितकाच पवित्र होता

त्याचे बुद्धिवैभवहि शरीर सौंदर्याप्रमाणेच मोठे दिव्य व अपूर्व होते त्याच्या अवेस्ताग्रथावरून दृष्टि फिरविली म्हणजे त्याच्या विशाल ज्ञानाची व अलौकिक प्रतिभेची साक्ष पटल्यावाचून रहात नाही त्याच्या शिकवणीवर बारीक नजर फिरविल्यास त्याच्या अगाध व अपूर्व बुद्धिमत्तेची सूक्ष्म निरीक्षण शक्तीची, खोल परीक्षण व विशालग्रहण शक्तीची प्रचीति कोणालाहि सहज येते अर्थात् तो त्या कालातला मोठ्यातला मोठा व पवित्रातला पवित्र असा एक प्रतिभासपन्न महाकवि होऊन गेला, ही गोष्ट त्याच्या छदोबद्ध अवेस्ता ग्रंथावरून स्पष्ट होते आपला ऋग्वेद ग्रथ जसा छदोबद्ध आहे तसाच झोरोष्टरचा अवेस्ताग्रथहि छदोबद्ध पद्यात आहे, हे विसरू नये तो अवेस्ता ग्रथ वाचीत असता मधुन मधुन सुदर काव्याचे मधुर फवारे तेथे तेथे नाचत असल्याचे पाहून मन आनदाने दग लागते। त्यात आम्हा हिंदूना बिचकण्यासारखे व डिवचण्यासारखे असे काहीच नाही उलट त्यात वैदिक विचारांचे प्राबल्यच सर्वत्र दिसून येते त्याची वाणी

गोड, भाषा मधुर व शैली आकर्षक असल्यामुळें तो व्यासपीठावरून बोलूं लागला म्हणजे लोकांच्या मनावर त्याची पकड हां हां म्हणतां बसत असल्यास त्यांत कांही नवल नाहीं. त्याला बुद्धीची परमेश्वरी देणगी मोठी विलक्षण होती. त्याचे ते उदात्त विचार, बौद्धिक तेज व आत्मिक सामर्थ्य हीं लक्षांत घेतल्यास या मानवकोटींत आतांपर्यंत ज्या अविस्मरणीय व संस्मरणीय विभूति चमकून गेल्या त्यांतच त्याची गणना केल्यास ती अस्थानी असें म्हणतां येणार नाहीं. तो एक महान् युगपुरुष होऊन गेला.

त्याची तपश्चर्या फार मोठी व भावनापूर्ण होती. म्हणूनच त्याला जगदात्म्याशी तादात्म्य पावतां आलें. त्याच्या अहुरमज्दच्या प्रार्थना व स्तुतिस्तोत्रें भक्तिरसानें परिपूर्ण ओथंबलेली व श्रद्धेनें नितांत भरलेली आहेत. डोंगरावर जाऊन एकांतांत बसून एकनिष्ठेनें केलेल्या अहुर-मज्दच्या उपासनेनें व त्याच्या उदंड ध्यानचिंतनानें त्याच्यावर अखेर परमेश्वरी प्रसाद होऊन पूर्वी कोणालाहि घडलें नाहीं असें मज्दप्रभूचें मंगल व दुर्लभ असें पवित्र दर्शन त्यास प्रत्यक्ष घडलें व त्याच्या दिव्य प्रतिनिधींचें वेळोवेळीं सहाय व मार्गदर्शनहि लाभलें. परमेश्वरी ज्ञान, पर-मेश्वरी इच्छा, परमेश्वरीरूप, परमेश्वरी स्वभाव, परमेश्वरी शक्ति व परमे-श्वरी नियम याचा त्याला साक्षात् परिचय घडून येऊन, त्या रोखानें त्याने जो जगास उपदेश केला आहे तो केव्हांहि व कोणालाहि सर्वस्वी मननीय व आदरणीय असाच आहे. 'माझ्या पवित्र आचरणाने व ध्यान-चिंतनानें मी त्या जगन्नायकाचें-परममंगल मज्दप्रभूचें-प्रत्यक्ष दर्शन घेतलें व त्याच्या सह अमेशास्पेंतांचें मंत्रिवर्यांचें संपूर्ण सहकार्य मिळविलें अशी त्याची यस्नमध्यें (४०, ५-८) स्पष्ट कबूली आहे

वीस वर्षें एकांतवासांत राहून, दीर्घतपश्चर्या करून अहुरमज्दचा मंगल वरप्रसाद मिळविल्यावर अहुरमज्द घोकत घोकत तो गुहेमध्यें

जाऊन स्वस्थ बसला, असें कधीं झालें नाहीं. तर त्या आपल्या ज्ञानाचा फायदा जगालाहि देण्याच्या इरादानें जगाच्या स्वार्थप्रचुर आखाड्यात धैर्यानें उडी मारून विषयपंकात रुतलेल्या, अज्ञानात बुडालेल्या, तापत्रयानें पोळलेल्या सामान्य जनतेला कसलीहि व कोणाचीहि भीडमुर्वत न ठेवितां निस्पृहपणे व निर्भयपणें सत्यज्ञानाचा व कल्याणमार्गाचा सदुपदेश करण्यास त्यानें लवमात्रहि मर्गेपुढें पाहिलें नाहीं ही एकच गोष्ट त्याची लोकसेवेची व लोककल्याणाची तळमळ केवढी तीव्र होती याची ढळढळीत साक्ष देते ज्ञानी मनुष्याने गिरिकंदरात जाऊन केवळ परमार्थ चिंतनांतच अखंड रमून व रगून न जाता आपल्या श्रेष्ठ ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा अज्ञजनालाहि द्यावा अशा मताचा तो महा कर्मयोगी होता. ज्ञानीयाचें ज्ञानीपण व साधूचें सतपण तें हेंच की तें आपलें उर्वरित आयुष्य लोकशिक्षण व लोकसेवा यातच गुंतवून त्याना उदंड सुखसमाधानात पाहून आपणास धन्य व कृतार्थ मानणें नाहीतर त्या ज्ञानी सताच्या ज्ञानाचा व भक्ताच्या भक्तीचा लोकाना काय फायदा? लोकानीं त्याचे देव्हारे काय म्हणून माजवावे? खरा देवभक्त हा खरा लोकसेवक असला तरच त्याच्या भक्तीला व ज्ञानाला कांहीं अर्थ आहे, ही गोष्ट त्याने जगाला स्पष्ट करून दिली थोडक्यात म्हणजे अहुरमज्दशी त्यानें जसें सख्य व ऐक्य जोडलें तद्वतच जगाशी देखील आत्मसमर्पण करून तो तादात्म पावला हा सागण्याचा भावार्थ

तपश्चर्या करून, मज्दचा अनुग्रह मिळवून, जगाच्या आखाड्यांत जेव्हां तो उतरला तेव्हा लोक हे अज्ञानात, आळसात, व अनीतींत गुरफटलेले पाहून त्याला त्याचा फार कळवळा आला 'बुडती हे जन। पहावेना डोळा' अशी त्याची स्थिति झाली. खोट्या भावनाच्या आहारी जाऊन लोक दुष्टचालीमध्यें नसें गुरफटून गेले आहेत हें पाहून त्याला

त्याची मोठी कींव आली व त्याना त्या हीन दीन स्थितीतून वर काढून त्याना सुखात पाहाण्याची त्याची बुद्धि दुणावली त्यावेळचा तो एक मोठा सत्यधर्माचा उपदेश करणारा मनुष्याचा हितकर्ता व त्याच्या अनिष्ट चाली सुधारणारा कडा सुधारक होता लोकाच्या अंतःकरणात खोल जाऊन रुतलेले धार्मिक भोळे विचार व तन्मूलक अगवळणी पडलेल्या दुष्ट चाली यांचे निर्मूलन करण्याचा मनात निर्धार करून त्याप्रमाणें तो आपल्या उपदेशात त्यावर सडेतोड शद्बात कठोर प्रहार करून त्याचे वास्तव हीन स्वरूप लोकापुढें माडण्यास त्यानें मार्गेपुढें मुळींच पाहिलें नाहीं आणि त्याचवेळीं आपल्या नवीन धर्माचें सत्य व शिव स्वरूप विशद करून श्रोतृवर्गावर त्याचा ठसा स्पष्ट ठिंगवून मज्दप्रभूविषयीं अनुकूल मह घनविण्यासहि कमी केलें नाहीं

प्रथम प्रथम त्याचा उपदेश लोकाना आवडला व मानवला ही गोष्ट खरी असलीतरी त्यानें हातीं घेतलेलें कार्य तडीस जाईल कीं नाहीं याची त्याना वानवाच वाटली जुन्या धर्मावर चालविलेली बडखोरी व केलेले कठोर प्रहार यानीं सनातनी मडळी कवि व करप पण्डित चिडून जाऊन त्याच्यावर कडक टीकास्त्र रोखून अखेर त्यास देशत्याग करावयास लावण्यापर्यंत त्यानीं मजल नेली ही गोष्ट त्याच्या सत्यप्रियतेची व निस्पृहतेची ढळढळीत साक्ष देते फार काय त्याचे आप्तमित्र, भाऊबद, स्नेहीसोबती हे सुद्धा त्याला विरुद्ध झाले त्यास सोडून गेले पण त्यापासून कच खाऊन आपलें अंगीकृत कार्य शेवटपर्यंत त्यानें अर्धवट टाकण्याचें मनातहि आणलें नाहीं त्यासाठीं त्याला गृहत्याग नव्हे देशत्याग—करावा लागला तरी ती आपत्ति आनदानें पत्करून आपलें ब्रीद शेवटपर्यंत अढळ राखलें सनातनी करप व कविग पण्डितानीं प्रथम त्यास आळवून पाहिलें, नंतर छेडून चिडविलें, त्यानतर त्याला मानाचे व पैशाचे आमिषहि दाखविले पण

त्याचा जीव तिळतिळ तुटत असे. त्याची ही दयाळुवृत्ति लहानपणापासून लोकांच्या निदर्शनास आली होती. गरीब शेतकऱ्यांनी कष्ट करून वाढविलेली गुरे-ढोरे व शेतांतील तयार केलेलें, पीक चोरट्यानीं अगर लुटारूं टोळ्यांनीं चोरून लुटून नेल्यावर त्या गरीब बिचाऱ्यांची जी दैना उडे व जे हाल होत ते पाहून त्याचे काळीज पिळवटून निघे ! चोरांच्या या उपद्रवाला त्रासून व वैतागून ' देवा ! नको हा धंदा ' असें म्हणून तें जेव्हां हताश व निराश होऊन जमीनीस हात टेकीत, तेव्हां त्यांना प्रेमळ शब्दांत शेतीचें महत्व पटवून देऊन पुनः त्यांचे मन तिकडे वळवी. अर्थात् शेतकऱ्यांना तो एक उत्साहाचा जिवंत झराच होता असें म्हटल्यास त्यांत कांहीं बिघडणार नाहीं.

त्याच्यावर अनेक संकटें आलीं. तथापि त्याची धीरगंभीरवृत्ति रतिभरसुद्धां ढळली असें सहसा झालें नाहीं. गृहत्यागाचा प्रसंग आला, देशत्यागाचा आला, शेवटी सनातनी पंडितांच्या कपट कृतीमुळें कारागृहाचा प्रसंगहि ओढवला, अन्नपाणी तुटलें, लोकांत मानहानि झाली, तथापि त्या सर्वांना सिंहाच्या छातीनें तोंड देऊन अखेर ढगांतून सूर्य जसा बाहेर येतो तद्वत् त्या सर्व संकटातून बाहेर पडून आपल्या निष्पाप व निर्दोष वृत्तीनें पुनः चंद्राप्रमाणें चमकूं लागला ! सतत उद्योगानें, दीर्घ प्रयत्नानें, उदंड जागरूकतेनें, श्रेष्ट बुद्धिवैभवानें, कडक तपश्चर्येनें आणि अहर्निश मद्दचिंतनाने आपल्या अंगीकृत कार्यांत अखेर प्रलोभनीय विजय संपादून मानवकोटींत आपलें नांव अजरामर करून टाकले ही गोष्ट काय सामान्य झाली !

आतांपर्यंत आम्ही जें त्याच्या अष्टपैलू स्वभावाचें निरुपण केलें त्याचा सारांश रूपानें दिनकर्द मध्ये उल्लेख आढळतो तो असा—तो शूर व धैर्यशाली होता. निश्चयी व कर्तव्यदक्ष होता श्रेष्ट व एकनिष्ट मद्दभक्त होता. तो

# उत्तरार्ध

## झोरोष्टरच्या पश्चात् इराणी राष्ट्राचा इतिहास

झोरोष्टरच्या मरणानतर त्याचे प्रमुख शिष्य व अनुयायी म्हणजे राजा विश्तास्प, जामास्प, अस्पंदीयार, फरशोस्तर इत्यादि लोक जीवत होते झोरोष्टरच्या पश्चात् जामास्प हा मुख्य धर्मगुरूच्या पीठावर आला पुढे तो पधरा वर्षे त्या पीठावर होता विश्तास्प हा वर्षे वीस जीवत राहिला आणि या सर्व शिष्यवृंदानी झोरोष्टर धर्माच्या प्रचाराचे व प्रसाराचे कार्य अहोरात्र झटून जोराने व नेटाने चालविले व लवकरच इराणभर अवेस्ता धर्माचा प्रसार करून गावोगाव पवित्र अग्निमंदिरे उभारली व तो सर्व देश झोरोष्टर पथी बनविला याप्रमाणे पुढे दोन अडीचशे वर्षे या धर्म-प्रसाराचे काम अव्याहत चालून या अवधीत इराण व त्याच्या आस पासचा सगळा प्रदेश अवेस्ता धर्माच्या छत्राखाली आला व तेथील लोक अहुरमज्दचे नि सीम उपासक बनले

या धर्माच्या प्रसारामुळे नव विचाराचा व नव आचाराचा सूर्योदय होऊन इराणच्या जीवनात मोठी क्राति घडून आली सनातनी मूर्तिपूजा बद पडली पशुयज्ञाला रो बसला मंत्रतंत्र, जादूटोणा, भूतपिशाच, इत्यादि जुन्या समजूती वितळून गेल्या अर्थात् इराणात आता नव चैतन्य खेळू लागले याप्रमाणे विश्तास्पाचे कविघराणे दोनशे अठ्ठावन वर्षे टिकून झोरोष्टरधर्माचा परमोत्कर्ष झाला

कवि घराण्यातील झोरोष्टरपथीय राजे

| नाव | कारकीर्द |
|---|---|
| १ विश्तास्प | ९० वर्षे |
| २ बोहुमन अस्पदीयार | ११२ वर्षे |

चिघळत जाऊन त्यात अखेर फिलिपचा खून झाला (इ. स. पू. ३३६). त्यात अथेन्स व इराण याचा आतून हात होता अशी म्यासिडोनियन दरबारची समजूत होऊन ती जनता फार भडकली.

या फिलिपचा मुलगा म्हणजेच जगज्जेता अमरकीर्ती अलेक्झांडर हा होय. यावेळीं तो केवल वीस वर्षांचाच होता पण मोठा शूर व तेजस्वी होता तो अरिष्टाटलचा शिष्य असून, त्याची छाति सिंहाची, पराक्रम वाघाचा व बळ हत्तीचें होतें शिवाय युद्धकलेंत तो तितकाच चतुर व निष्णात होता यावेळी इराणच्या गादीवर डरायस तिसरा येऊन जवळ जवळ दहा वर्षे लोटली होती व त्याचे वर्चस्वहि जगावर सगळींकडे चांगलें गाजत होतें

फिलिपच्या मरणानतर अलेकझाडर हा लहान व अननुभवी आहे असें पाहून त्यासधीचा फायदा घेऊन आसपासच्या मांडलिक राजांनी स्वतत्र होण्याच्या बुद्धीनें आपापसात कट करून म्यासिडोनियाविरुद्ध बडाचा बावटा उभारून राज्यात गोंधळ व गडबड माजविली पण अलेकझाडर हा वेळींच सावध झाला. त्याने राज्यातील वावटळीला न घाबरता, बडखोरावर शौर्यानें चढाई केली व आपल्या प्रखर समशेरींचें पाणी पाजून त्याना लवकरच वठणीवर आणलें या बडात अथेन्सच्या डेमास्थेनीसचे प्रमुख अग असून त्याला आतून इराणची फूस होती या सर्व गोष्टी अलेकझाडरला कळून चुकल्या होत्या

पुढें त्यानें ' थीन्स ' येथें बडखोराचे पारिपत्य करून त्याच्यातील मुख्य पुढारी जो डेमास्थेनिस त्याची नागी जिरवून, दातींतृण धरून त्यास शरण यावयास लावलें राज्यात सर्वत्र पुन स्थिरस्थावर झाल्यावर त्याची नजर आता इराणी साम्राज्यावर वळली बरोबर तीस हजार पायदळ व साडेचार हजार घोडे घेऊन इ स पूर्वी ३३३ साली तो आशियावर म्हणजे इराणी साम्राज्यावर चाल करून आला

अलेकझांडर हा इराणावर चाल करून येत आहे ही बातमी इराणास लागताच डरायसचा क्षत्रप मेनोन ( Menon ) हाहि मोठें सैन्य घेऊन त्यास सामोरा गेला दोघाची भेट ग्रेनिकस ( Grenicus ) नदीवर घडली त्याठिकाणीं दोघात भयंकर रणकदन माजलें हत्ती-वाघाची झुज होती ती एकमेकानी एकमेकास रजीस आणण्यासाठीं मोठीं शर्थ केली शेवटी विजयश्रीनें अलकझांडरच्या गळयात माळ घातली व इराणचा पराभव झाला !

या चकमकींत इराणी सैन्याचा पार धुव्वा उडविला जाऊन त्यास दशदिशेला पिटाळून लावण्यात आलें हा अलेकझांडरचा आशियातील पहिला विजय होय या लढाईंत इराणच्या बाजूने वीस हजार पायदळ व वीस हजार घोडेस्वार मोठ्या निकराने लढत होते पण दुर्दैवापुढें कोणाचें काय चालणार आहे !

यावेळपर्यंत इराणला अपजय असा सहसा माहीत नव्हता या ग्रेनिकस रणभूमीवरचा पराजय हाच त्याचा पहिला पराभव होय या लढाईत इराणी सैन्याची पूर्ण वाताहत झाली ही अपमानकारक व शोकजनक बातमी डरायस यास लागताच त्याचें पित्त खवळले व तळ-ळयाची आग मस्तकास जाऊन भिडली अलेकझांडरचें हें धाडस पाहून त्याला लहान तोंडीं मोठा घास घेतल्याचा भास झाला अर्थात् होतीच तशी परिस्थिति इराणी साम्राज्यापुढें म्यासिडोनियन राष्ट्र काहींच नव्हे हत्ती पुढें रेटकू ! एका तडाख्यात त्या मुलाला चिरडून टाकू असा त्याचा पूर्ण विश्वास. भ्रम म्हणा पाहिजे तर ! नुसत्या आपल्या अफाट सैन्याचें प्रचड प्रदर्शन करून अलेकझांडरला दराहत बसवून त्याला चागला वठणी-वर आणू या घमेंडीने मोठें सैन्य जमा करून त्याचा नशा उतरविण्या-साठी म्हणून तो मोठ्या अवडबरानें मोहिमेवर निघाला

त्याची अशी समजूत झाली होती कीं आपण त्यास पहिल्याच तडाख्यात पार ढेकणाप्रमाणें चिरडून टाकूं अशा घमेंडीत त्याने आपल्या-बरोबर त्या मोहिमेत आपली आई, बायको, मुली व दासदासी इत्यादि खासगी परिवार घेतला व तो मोठ्या थाटात निघाला. वाटचाल करता करता त्याची व अलेक्झांडरची इसस (Isus) येथे गांठ पडली तेथे दोघामध्यें चांगलाच रणसंग्राम गाजला डरायसनें आपल्या शौर्याची शर्थ केली. पण अलेक्झांडरला दैव अनुकूल असल्यामुळें डरायसला माघार घ्यावी लागली. त्याचा पराभव झाला, व त्याने रणातून पळता पाय काढला त्या धामधुमींत त्याची आई, बायको, व मुली हीं सर्व अलेक्झांड-रच्या हातीं लागलीं त्या सर्वांना बंदीवान करून त्यानें त्यास आपल्या बरोबर नेलें. या लढाईत अलेक्झांडरला अगणित संपत्ति लाभली या प्रसंगी इराणचे अगणित घोडेस्वार व असंख्य सैन्य। कामास आलें ही लढाई इ सन पूर्व ३३३ मध्यें लढली गेली.

डरायसचा याप्रमाणें पराभव केल्यावर अलेक्झांडरची नजर इजित-कडे वळली तेथेहि गडबड चालली होती म्हणून तेथील बंडखोर लोकांची नांगी ठेचून काढण्यासाठीं त्यानें आपला मोर्चा आता तिकडे वळविला. वाटेंत त्यानें 'गाझा' व 'टायर' हीं बंदरें जिंकून घेतलीं. यावेळीं त्या शहरास वेढा देऊन तेथें तळ देऊन तो बसला असता डरायसकडून दोन रायभारी त्याच्याकडे निरोप घेऊन आले

महानशहा डरायसनें त्याच्याकडे निरोप पाठविला होता तो असा :- अलेक्झांडर जर डरायसची आई, बायको व मुली यांची मुक्तता करून आपल्या स्वाधीन करील व त्यामुलीपैकीं एकीशीं विवाह करील तर डरायस हा त्याला मित्र समजून त्याचा दोस्त होऊन राहील शिवाय त्याला युफ्रेटीस व हेलिस्पाट यामधील प्रदेश तोडून देऊन वर चाळीस लाख रुपये खंडणी म्हणून देईल

त्याला अलकझांडरनें उलट निरोप पाठविला तो असा – डरायसची आम्हाला खंडणीहि नको व त्याची मैत्रीही पण नको शिवाय त्याच्या मुलीशी विवाह करणें, न करणें हें आपल्या खुषीवर अवलंबून असून, त्याला डरायसच्या सम्मतीची जरूरी नाहीं मात्र इतकेंच कीं त्याला जर आमच्याशी सरळ व इभ्रतीनें वागावयाचें असेल तर आम्हाला इराणचा सम्राट समजून आपला मांडलिक होऊन राहण्याचें डरायसनें पत्करलें पाहिजे आता सर्व इराणी साम्राज्याचा मालक अलेक्झांडर हाच झाला असून, त्यावर डरायसची कसलीहि साम्राज्यसत्ता राहिली नाहीं ही गोष्ट डरायसला कबूल असेल तर पुढचें बोलणें, नाहीं तर अलेकझांडरचा शत्रु होऊन त्याचा बरावाईट परिणाम सोसण्यास त्यास तयार झालें पाहिजे

अलेकझांडरचें हें निर्भीड व खरमरींत उत्तर पाहून डरायसला मोठा प्रश्न पडला त्याला ती गोष्ट आवडली नाहीं, मानवली नाहीं अर्थात् त्याच्या म्हणण्याला रुकार देणें, ही अत्यंत अपमानास्पद अशी लाजिरवाणी गोष्ट होती 'अलेक्झांडरचें– म्हणजे कालच्या पोराचें – मांडलिक होऊन राहणें म्हणजे काय ! त्यापेक्षा मेलेलें काय वाईट ! वैभवशाली इराणी साम्राज्याच्या निष्कलंक नावलौकिकास काळोखीं फासणें हाच त्याचा अर्थ नव्हे काय ? छे, छे, तसें होणें शक्य नाहीं हा डरायस मेला तरी बेहत्तर पण इराणच्या लौकिकास केसाचा धक्का देईल लागू देण्यास हा शहानशहा तयार नाहीं ' असें त्याच्या मनानें घेतलें अर्थात पुन एकदा रणदेवतेला कौल लावून नशीबाची परीक्षा पाहण्याचें त्याच्या मनानें घेतलें इकडे अलेकझांडर हा ' टायर ' सर करून पुढें इजिप्तमध्यें गेला व तोहि प्रांत तलवारीच्या जोरावर घशाखालीं घालून पुन डरायसचा समाचार घेण्यास इराणांत त्यानें धडक मारली

या दरम्यान जवळ जवळ २ वर्षांचा काळ लोटला होता. या अवधींत डरायसला युद्धाची तयारी करण्यास चांगलीच फुरसत मिळाली. या अवधींत त्यानें आपल्या साम्राज्यांतील सर्व भागांतून म्हणजे सिरियापासून सिंधुनदीपर्यंत व कास्पियन समुद्रापासून इराणी आखातापर्यंत दोन लाख खडे सैन्य तयार केलें. शिवाय चाळीस हजार घोडेस्वार, दोनशे रथ व पंधरा हत्ती, इतकी लष्करी सामुग्री तयार करून भावी लढाईची त्यानें जय्यत सिद्धता केली. अर्थात् साम्राज्यातील सर्व सत्रपांनी या मोहिमेंत भाग घेतला होता. यावेळीं इराणी साम्राज्याचें होतें नव्हतें तेंवढें सर्व सामर्थ्य व पुण्याई एकत्र करून पणास लावण्यांत आली.

या खेपेस डरायसनें सूक्ष्म व खोल विचार करून अलेकझांडरला तोंड कोठें द्यावें, हें मोठ्या कुशलतेनें ठरविलें होतें. मेसेपोटोमियातील अरबेला नजीकचें विस्तीर्ण मैदान, हेंच लढाईस प्रशस्त म्हणून पसंत करण्यांत येऊन त्याप्रमाणें सेना प्रमुखास कळविण्यांत आलें. या मैदानाच्या एका बाजुला तिग्रस नदी व दुसऱ्या बाजुला कुर्डिस्थान पर्वत असून दोहोंच्या मध्यें हें मैदान अफाट पसरलेलें असून, तेथून अरबेला हें शहर फक्त वीस मैलांवर होतें. या अरबेला शहरांतच युद्ध–साहित्याचें कोठार व खजिना एका बंदिस्त जागेंत सांठवून जपून ठेवण्यांत आला होता.

डरायस हा सैन्य जमवून लढाईस सिद्ध झाला. त्याचा रोख अरबेलाच्या मैदानाकडे होता. त्यादिशेनें तो वाटचाल करीत आहे, ही बातमी अलेक्झांडरास लागतांच त्याचे बाहू स्फुरण पावूं लागून सैन्याला त्यानें त्या दिशेकडे वळण्याचा आदेश दिला. यावेळीं त्याच्या जवळ चाळीस ,पायदळ आणि सात हजार घोडेस्वार असून रथ व हत्ती यांचा पूर्ण अभाव होता. डरायसच्या मानानें हें सैन्य लहान असलें तरी युद्धकलेंत तें चांगले कसलेलें व पूर्ण तरबेज होतें. तें पहिल्या प्रतीचें लढय्ये

असून त्याच्यातील शिस्त, व्यवस्था व टापटीप अगदी वाखाणण्यासारखी होती त्याची शस्त्रास्त्रें तीक्ष्ण व प्रखर असून रणोत्साह तितकाच भारी दांडगा होता अलेकझांडरनें आता मनात निश्चयच केला कीं हा जो टोला हाणायचा त्यात डरायसची सगळी रग व खुमखुम जिरून जाऊन पुन डोकें वर काढण्यास कोठें म्हणून त्यास वाव राहू नये

याचें कारण असें होतें कीं 'इसस' च्या लढाईत जयापजयाचा प्रश्न लागावा तसा पूर्ण निर्णयात्मक लागला नव्हता अजून आशेला थोडी-बहुत जागा होती म्हणून आता या अरबेलाच्या मैदानावर पुन एकदा म्यासिडोनियनचा प्रखर हात चालवून त्या प्रश्नाचाहि सोक्ष अगर मोक्ष करून टाकायचा असें मनात ठरवून त्याप्रमाणें आपलें सैन्य घेऊन कुर्डिसन पर्वताच्या ओळीतील एका लहान टेकडीवर त्यानें आपला तळ दिला डरायसचें सैन्य आधीच मैदानात तळ देऊन बसलें होतें

तो इ स पूर्व ३३१ मधला दिवस आक्टोबर महिना पहिली तारीख सकाळची वेळ सूर्य नुकताच उदयाचलावर डोकावत असलेला अशा वेळीं अलेकझांडरचें सैन्य हळुहळु टेकडीवरून खाली उतरू लागलें सर्व सैन्य खाली मैदानावर उतरल्यावर अलेकझांडरनें आपल्या व डरायसच्या सैन्यावर एकवार धावती नजर फिरवून दोन्ही बाजूच्या बला-बलाचा अदाज घेतला तों त्याला काय आढळून आलें ? आपलें सैन्य शत्रु सैन्यापुढें अगदींच लहान डरायसचें सैन्य समुद्राप्रमाणे अफाट पसरलेलें ! रथ, हत्ती, घोड्याची रेलचेल पायदळाचा पसारा विचारावयासच नको ! तथापि अलेकझांडरला काहीच वाटलें नाहीं उलट त्याच्या वीरश्रीला अधिकच चेव आला !

इतक्यांत दोन्ही सैन्यांत, शिंगांची गर्जना सुरू झाली व शस्त्रास्त्रें हवेंत परजूं लागली. सैन्याची हालचाल सुरू झाली व लागलीच लढाईला तोंड लागलें. या खेपेस लढाईचा विशेष असा होता कीं इराणची सैन्य-रचना मोठ्या खुबीनें व चातुर्यानें करण्यांत आली होती व त्याचे लोकहि युद्धकलेंत मोठे तरबेज होते. सुरवातीस रथिकांनी अलेक्झांडरच्या लोकांत शिरून मोठा अनर्थ मांडला. घोडेस्वारांनीहि मर्दुमकी गाजविली. पायदळाचें तलवारीचें पाणी शत्रूला चांगलेंच झोंबू लागलें.

हें सर्व खरें! इराणची बाजू वरचढ दिसूं लागली. शूरांच्या वीर-गर्जनेनें व तलवारीच्या खणखणाटाने व रणवाद्यांच्या कर्कश आवाजानें सगळें वातावरण दणाणून गेलें. डरायस रथांत बसून आपल्या लोकांस चेतवीत फिरत होता. लढाई मोठ्या रंगांत चालली होती. तोंच शत्रू-सैन्यांतून बाण आले व त्यांनी डरायसच्या रथाच्या घोड्यांना व सारथ्याला नेमके घायाळ करून टाकले. अलेक्झांडरच्या सैन्यानें मोठ्या शौर्यानें लढून शत्रुसैन्यांत मुसंडी मारली व तेथें असा मारा चालविला कीं त्यामुळें तेथील शत्रुसैन्याची शिस्त विस्कळली व गोंधळ माजला. इतक्यांत अलेक्झांडरची नजर इकडे वळली व शत्रुची फळी फुटली असल्याचें व सैन्यात गोंधळ माजल्याचें त्याच्या नजरेस आलें. मग तो उशीर करतो कशाला? त्या संधीचा फायदा घेऊन त्यानें आपला घोडा शत्रु-सैन्यांत फेकला व रणचंडी मडकविली. इतक्यांत डरायसचा घोडा शत्रूच्या तडाख्यानें घायाळ होऊन खालीं पडला व सारथ्यानें आपटी खाल्ली. तो पुनः वर उठलाच नाहीं. झालें! डरायसनें हें पाहिलें. त्याच्या तोंडचें पाणी पळालें व धैर्य खचलें! मागचा पुढचा विचार न करता त्यानें एकदम रथातून उडी मारली व प्राण वांचविण्यासाठीं घोड्यावर बसून रणांतून मागच्या मार्गे त्यानें पळ काढला!

यावेळीं डरायस्च्या सैन्यानें दुसरीकडे मोठया नेटानें व हिम्मतीनें लढून आपली बाजू नीट सावरून धरली होती पुढें येता येता लढाईला उग्र स्वरूप आलें व उभय पक्षाच्या वीरगर्जनेनें दशदिशा दणाणून गेल्या डरायसचे लोक शौर्यानें झुजून शत्रूस मार्गे रेटीत चालले असता मधेंच राजा पळून गेल्याची अवसानघातकी वार्ता तेथें येऊन आदळली या दुर्वार्तेनें त्याच्या उत्साहावर पाणी पडलें व धीर खचून त्यानींहि मग रणातून पाय मार्गे घेतला यापुढें जो अनर्थ गुदरला तो सांगवत नाहीं ! अलेक्झांडरच्या लोकानीं याचा फायदा घेऊन जो कहर माजविला व शत्रूची दाणादाण केली, ती शोककथा येथें वर्णन करवत नाहीं ! अर्थात् इराणी साम्राज्याचे आता बारा वाजले इराणी राष्ट्रध्वज कोलमडून पडला साम्राज्य–लक्ष्मी अलकेझांडरला जाऊन मिळाली या अरबेलाच्या लढाईत अलेकझांडरच पूर्ण विजयी होऊन इराणी साम्राज्याचा बादशहा झाला

नतर मोठया विजयोत्सवानें बाबिलोन शहरात प्रवेश करून आपण इराणचा बादशहा झाल्याचा त्याने सर्वत्र डांगोरा पिटविला नतर त्यानें मुख्य राजधानी जी पर्सिपोलिस तेथें प्रवेश केला व मोठ्या थाटानें विजयोत्सव केला त्यानें आनदोत्सवात आकठ दारू पिऊन त्या धुंदीत राजवाड्याला आपल्या हातानें अग्नि लावून त्यानें तो पेटवून दिला व तो जळत असता त्यानें त्यात पवित्र अवेस्ताग्रथ फेकून देऊन त्याची राखरांगोळी केली तेथून झोरोष्टर धर्माला साडेसाती लागून पुढें त्याला क्षयाची भावना झाली व दिवसदिस तो झुरणीस लागला! Historians History of the world vol VIII

## धर्मग्लानि

धर्मसस्थेचें सरक्षण, सपोषण व सवर्धन व्हावयाला त्याला राज–दडाचा भक्कम आश्रय असावा लागतो त्याशिवाय तो कल्पवृक्ष अग

धरून फोफावून जनतेची बौद्धिक व आत्मिक उन्नति व विकास करू शकत नाहीं, अशी इतिहासाची साक्ष आहे. राजकारणापेक्षां धर्मकारण हें श्रेष्ठ असून, त्याच्या रक्षणासाठीं राजकारणाचा जन्म व अवतार आहे. म्हणून राजदंड निःसत्व झाला, अगर गळून पडला अथवा हिरावून नेला गेला तर धर्माचें जीवन व चैतन्य कुंठित होऊन, व्यक्तीच्या व समाजाच्या स्वास्थ्याला, प्रगतीला व सुस्थितीला त्यामुळें जबरदस्त धक्का पोंचल्यावाचून राहत नाहीं. इतकेंच नव्हे तर नैतिक परागतीला व आध्यात्मिक अधःपाताला सुरवात होऊन, कालांतरानें त्या समाजाचे चैतन्य व संस्कृति ही क्रमशः क्षीण होत जाऊन, त्याची बसलेली सुव्यवस्थित सामाजिक घडी विस्कळित व अस्ताव्यस्त होते. याचा कटु अनुभव आम्हां भारतीयाना पुरेपूर आला असून तोच प्रसंग इराणांत आतां झोरोष्टर धर्मावरहि गुदरला आहे, हें सांगण्याचा आमचा उद्देश.

प्रथम विश्तास्पाच्या घराण्याच्या अमदानींत त्याला चांगला आधार मिळून अवेस्तापंथाला चांगली ऊर्जितावस्था आली. त्या अवधींत त्यानें जवळजवळ राष्ट्रीय धर्माची पायरी गांठली. त्या घराण्याकडे इराणचा राजदंड जवळजवळ अडीचशे वर्षेपर्यंत राहिला. त्या अवधींत चांगलें अंग धरून जोमाने तो वाढला पण पुढे डरायस तिसरा याच्या कारकीर्दींत त्या घराण्यातील राजसत्ता नष्ट होऊन तेथें अलेक्झांडरची परकीय हुकमत उदयास आली—हा भाग वर देण्यांत आलाच आहे—व तेव्हांपासून हा पंथ ढुरणीस लागला.

## अलेक्झांडरच्या पश्चात्

पुढें अलेक्झांडर हा बेवारस होऊन इ. स. पू. ३२३ मध्यें मृत्यु पावल्यामुळें त्याच्या पश्चात् सैन्यातील पुढारी म्हणजे सेल्यूसिड सत्रप हे

आपणच लोकांचे प्रतिनिधी आहोत व अलेकझांडरच्या मृत्यूनंतर आपणच राज्याचे मालक व अधिकारी आहोत असे जाहीर करून ते ते सत्रप आपल्या हाताखालील प्रांताचा राज्यकारभार स्वतंत्रपणे चालवू लागले पण अलेकझांडरने जिंकून घेतलेला सगळा मुलूख त्यांना एका सत्तेखाली आणता आला नाही त्यामुळे राज्याचे तुकडे पडले व कारभारात एकसूत्रीपणा न रहातां वैचित्र्य व वैगुण्य आले

याप्रमाणे कांही दिवस गेल्यावर मुख्य गादीविषयीं वाद उत्पन्न होऊन सत्रपांत चुरस व संघर्ष उत्पन्न झाला तशा परिस्थितींतच ॲंटिगोनस हा मुख्यगादी विषयीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांशीं भांडत असतां सिल्यूकस यानें उचल खाऊन त्याचा पराभव करून इराणी साम्राज्याचा सर्व भाग बळकावून बाबीलोन ही त्यानें आपली राजधानी केली याप्रमाणें सत्रपांचा राज्यकारभार लवकरच संपुष्टांत आला

प्राचीन काळीं सायरस यानें अस्त्याजिस (Astyages) याचा इ स पूर्व ५५० साली पराभव करून महान् आखामिनियन साम्राज्याचा पाया घातला अर्थात् हे आखामिन लोक पारसीयन म्हणजे इराणी वंशाचे होते त्यानीं इराणावर साम्राज्य सत्ता मिळविली होती तरी त्यांच्या धार्मिक संस्कृतीवर मागीं उपाध्यायांचीच हुकमत चालत होती त्यानीं झोरोष्टर पंथाचा स्वीकार केला असला तरी त्या धर्माला त्यानीं म्हणण्यासारखा पाठिंबा देऊन उचलून धरले नाहीं इतकेंच नव्हे तर इतर पंथाविषयी ते आदरपूर्वक सहानुभूति दर्शवीत होते यामुळें तेथें अनेक नास्तिक पंथ जोरानें वाढीस लागले होते त्यानीं जवळ जवळ पांचशे वर्षे राजसत्ता चालविली सेल्यूसिनी राजे ग्रीक संस्कृतीचे असल्यामुळें झोरोष्टर धर्माविषयीं उदासीनच होते त्यांच्या अमदानींत झोरोष्टर धर्माची जोपासना झाली नाहीं पुढें आखामिनी राजवटींतहि त्याची आबाळच झाली अर्सेसिस यानें इ स

पूर्व २४८ च्या सुमारास पार्थियन राज्याची स्थापना केली. पुढें फ्रायटीझ यानें ब्यक्टिरियाच्या राजाशीं लढाई करून सिंधुनदापर्यंत पार्थियन राज्याचा विस्तार केला. हें घराणें इ. स. पूर्व २२९ पर्यंत म्हणजे जवळ जवळ ३५० वर्षें टिकून राहिलें.

अर्थात् अलेक्झांडरच्या नंतर पांचशे वर्षांच्या काळांत झोरोष्टर धर्म राजाश्रयाच्या अभावी मंदतेज व क्षीणबल होऊन कसाबसा जीव धरून राहिला. मात्र हें सांगितलें पाहिजे कीं झोरोष्टर धर्माला या काळांत राजाश्रय मिळाला नसला तरी झोरोष्टर पंथीयांचा राजकीय लोकांकडून छळ झाला नाहीं. पण ग्रीकसत्तेमुळें इराणावर ग्रीक संस्कृतीची दाट छाया पसरून जनमनावर त्या संस्कृतीचा व तदंतर्गत विलासी रहाणीचा जबर-दस्त पगडा बसून त्या मानानें झोरोष्टर धर्माविषयीं जिव्हाळा व आस्था यांस गळती लागली होती. धर्माकडे लोकांचा कल राहिला नव्हता. जिकडे तिकडे जनतेत औदासिन्य पसरत चाललें होतें. धर्मग्रंथ बहुतेक जळून गेल्यामुळें लोकांत अज्ञान पसरत जाऊन धर्मगुरूंची पकड त्या मानानें ढिली पडत चालली होती. अग्नि-उपासनेला मांद्य आलें होतें. आचारविचारांत विस्कळितपणा शिरला होता.

## पुनरुत्थान

पुढें पार्थियन घराण्यातील शेवटचा राजा आर्टबेनस चौथा याच्या कारकीर्दीत हा मनु पालटला. इ. स. २१२ च्या सुमाराची गोष्ट. सासान घराण्यांत एक लोकोत्तर व्यक्ति उदयास आली. ती म्हणजे पार्सिस येथें राज्य करणारी अर्देशीर नावाची व्यक्ति होय. त्याच्या कारकीर्दीस इ. स. २१२ पासु प्रारंभ होतो. सासानचें राज्य फारसें नांव घेण्यासारखें मोठें नव्हतें. प्रथम वेतांचेंच होतें. अर्देशीर गादीवर आल्या-

वर त्याला ऊर्जितावस्था आली. प्रथम त्यानें लहान लहान लढाया करून आसपासची छोटीमोठी राज्यें बळकावून राज्याचा विस्तार केला. पुढें इ. स. २२९ साली पार्थियन घराण्याचा राजा जो आर्टेबेनस चौथा याचा तीन वेळा पराभव करून शेवटीं त्यास शेवटच्या लढाईंत ठार मारून तें इराणी साम्राज्य त्यानें परत मिळविलें.

हा अर्दसीर स्वतः झोरोष्टरपंथी असल्यामुळें त्यानें झोरोष्टरधर्माचा कैवार घेऊन हतप्रभ झालेल्या अवेस्ता पथाला पुनः उजाळा दिला. व साम्राज्यभर त्याला जी औदासीन्यता व अवकळा आली होती ती घालवून पुनः त्यात नवचैतन्य ओतलें. साम्राज्यभर पुन. ठिकठिकाणीं अग्निमंदिरें उभारण्यात येऊन, तेथें 'यस्न'चा मगल पाठ पुन. घुमूं लागला. येथपासून झोरोष्टर धर्माला पूर्ववत् राजाश्रय मिळून पुन: त्याला नवी पालवी फुटून चांगली टवटवी व ऊर्जितावस्था प्राप्त झाली. त्याने आपल्या उपाध्यायाला बोलावून घेऊन अवेस्ता ग्रथाचे विस्कटलेले भाग पुन: शक्य तितकें जुळवून तो सुव्यवस्थित व सुसगत करण्यास त्यास सांगितलें त्याप्रमाणें काम चालू झालें. पण त्याच्या कारकीर्दीत तें समाप्त झालें नाहीं या दृष्टीनें अर्दसीर हा विस्तासाच्या तालीपाल झोरोष्टरधर्मातला एक मोठा सस्मरणीय राजा होऊन गेला. तो मोठा धोरणी व पराक्रमशाली असल्यामुळें त्याच्या कारकीर्दीत इराणी साम्राज्य पुनः चैतन्यमय झालें

पुढें त्याचा मुलगा शापुर पहिला यानें 'शहानशहा'—म्हणजे जगाचा सम्राट—ही पदवी धारण करून त्याप्रमाणें जगाला जाहीर केलें. या सासान घराण्याच्या राजवटींत झोरोष्टर धर्माला चांगला राजाश्रय मिळून अहुरमझ्द ही राष्ट्रीय देवता झाली ती घोड्यावर स्वार झालेली देवता असून, उपासकाला ती विजय व जगाचें राज्य प्राप्त करून देते

असा त्यावेळीं सार्वत्रिक समज झाला होता. या काळात इतस्ततः पांगलेल्या धर्मग्रंथाची पुनः एकत्र जुळवाजुळव होऊन अवेस्ता व वेंदिदाद यास राष्ट्रीय पवित्र धर्मग्रंथाची मान्यता लाभली. या अमदानीत झोरोष्टर धर्माचे जे काय टीकात्मक ग्रंथ आहेत, ते सर्व पहलवी भाषेंत लिहिण्याची प्रथा सुरूं झाली. सासान राजे अवेस्थापंथी असल्यामुळें झोरोष्टर धर्माला ऊर्जितावस्ता आणण्यासाठी इतर धर्मसांप्रदायावर बेकायदेशीरपणाचा शिक्का मारून त्याची मुस्कटदाबी करण्यात आली

या दरम्यान पॅलेस्टाइनमध्यें एका नवीन धर्मानें डोके वर काढलें होतें. तो धर्म म्हणजे प्रभू येशू ख्रिस्त-प्रणीत ख्रिस्ती धर्म होय. तो धर्म हळुहळु हातपाय पसरीत मेसोपोटेमिया व बाबिलोन येथें आपलें बस्तान बसवीत चालला होता. पुढें लवकरच रोमन राज्य ख्रिस्ती बनून त्या धर्माला चांगलाच आधार व उठाव मिळाला. पुढें नार्सेहशहाच्या कारकीर्दीत अरमेनियातील राजानें इ. स. २९४ च्या सुमारास ख्रिस्ती-धर्माची दीक्षा घेतली. व तेथील ख्रिस्ती लोकानी नास्तिक सासान लोकाची सत्ता झुगारून देण्याची चळवळ चालविली. आणि त्या कामीं त्यानी प्रबल रोमन लोकाची मदत मिळविण्याविषयीं सधान बांधलें.

याचा परिणाम असा झाला कीं, सासान राजाना झोरोष्टर-पंथाला जोरानें उचलून धरणें भाग पडलें. व त्या धर्माचा बचाव करण्यासाठीं म्हणून त्या धर्मावर शिंतोडे उडविणाऱ्याना अगर हात उगारणाऱ्याना किंवा त्याचा त्याग करणाऱ्याना इराणी साम्राज्यात देहांत शिक्षा ठोठावण्याचा कडक कायदा करण्यात आला. पुढें पुढें ख्रिस्ती व झोरोष्टी धर्मांत चुरस उत्पन्न होऊन त्या दोघांत संघर्ष व खटके उडण्यास सुरुवात झाली. होतां होतां ख्रिस्ती लोकानीं इराणी साम्राज्यातून पुढून

स्वतंत्र होण्याकरता रोमन लोकांच्या मदतीने प्रयत्न चालविल्यामुळे इराणी राष्ट्राला रोमन लोकांशीं लढावें लागलें.

पुढें इ. स. ३१० साली होर्मिझ्द तिसरा हा मरण पावल्यामुळे त्याच्या जागीं शापुर दुसरा हा गादीवर आला. इराणी साम्राज्याच्या दृष्टीनें सासान घराण्यातील अत्यंत महत्वाचा राजा म्हणजे शापुर दुसरा ( इ. स. ३१०–३७९ ) हा होय. याच्या कारकीर्दीत इराणी साम्राज्य पुनः वैभव शिखरास जाऊन पोहोंचलें व झोरोष्टर धर्मानें परत उचाक गाठला. त्यावेळीं त्याच्या साम्राज्यात पार्थिया, मीडिया, खोराम्मिया, ब्याक्ट्रिया, ॲराकोशिया, प्यालस्टाइन, म्यासिडोनिया, इजिप्त इत्यादि प्रांताचा समावेश झाला होता. म्हणजे पूर्वेस सिंधुनदी, पश्चिमेस ग्रीस, इलिरिया, भूमध्यसमुद्र, लिबिया हे प्रांत, दक्षिणेस इराणी-आखात व अरेबिया, व उत्तरेस सिरिया, उरलसमुद्र, कार्वेससपर्यंत, काळा समुद्र याप्रमाणे या साम्राज्याचा विस्तार होता. व त्याचप्रमाणें वैभवहि कळसास जाऊन पोहोंचलें होतें. झोरोष्टर धर्माचा अत्यंत भरभराटीचा काळ म्हणजे तो हाच होय. झोरोष्टर धर्माचें वर्चस्व सर्व साम्राज्यभर गाजू लागलें तें याचवेळीं. या राजाच्या कारकीर्दीत साम्राज्यातली ख्रिस्ती राष्ट्रें अगर इतर राष्ट्रें विशेष गडबड न करता त्यास। कचवून व नमून होतीं. इतका दरारा होता त्या राजाचा ! शापूर दुसऱ्याचा !!

या सासान घराण्याच्या राजवटींत झोरोष्टर धर्माला चांगला उजाळा व उत्तेजन मिळून त्याची सर्वांगीण वाढ व विकास होण्यास भरीव मदत झाली. झोरोष्टरपंथी विसकटलेल्या वाङ्मयाची जुळवाजुळव व निर्मिति याच काळात झाली, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. अलेक्झांडरच्या स्वारीपासून सासानिय राजवटीपर्यंत—म्हणजे जवळजवळ

पांचशे वर्षांच्या काळांत नष्ट झालेल्या धर्मग्रंथाचा भाग म्हणण्या–इतका मोठा नसला तरी तो फार महत्वाचा होता. तथापि उपलब्ध असलेल्या प्राचीन अवेस्तादि धमग्रंथांचे इतस्ततः विस्काळेत झालेले भाग पुनः काळजीपूर्वक एकत्र जुळवून त्याना लेखनद्वारा सुसंगत व सुसंबद्ध स्वरूप देण्यांत आलें. अवेस्ताग्रंथाचें एकंदरींत सहा भाग पाडण्यांत आले असून ते (१) यस्न (२) विस्पेरद (३) यस्तप्त (४) न्याइशे, गाह, सिरोझा अफ्रिंजन वगैरे अप्रधान स्तोत्र ग्रंथ (५) वेंदिदाद व (६) हादोख्त नस्क या नांवाने प्रसिद्ध आहेत. असो

याप्रमाणे उपलब्ध धर्मग्रंथाचें संशोधनपूर्वक लेखन संकलन, व संग्रह व त्याचप्रमाणे अग्निमंदिराची स्थापना व अग्नि–उपासना, पुरोहितांना राजाश्रय व लोकमान्यता आणि जनतेंत अहुरमज्दविषयीं श्रद्धा व भक्ति यांना उत्तेजन मिळून झोरोष्टरधर्माला एक प्रकारचें स्पृहणीय व वैभवशाली रूप प्राप्त झालें. एकंदरींत शापुर दुसरा याच्या साठ, पासष्ट वर्षांच्या कारकीर्दींत अवेस्ता पंथाचा राष्ट्रभर प्रसार होऊन जिकडे तिकडे पवित्र ग्रंथाचा मंगल व मंजुळ पाठ ऐकू येऊं लागला. हा सासान राजवटीचा तीनशे वर्षांचा काळ झोरोष्टरधर्मांत अत्यंत संस्मरणीय व लोकोत्तर असा झाला. ( M. N Dhalla Ph. D.)

## मतामतांचा गलबला

सासानची राजवट येण्यापूर्वी इराणची धार्मिक स्थिति अत्यंत शोचनीय व फार अनुकंपनीय झाली होती. अलेक्झांडरच्या पश्चात् अर्देशर गादीवर येईपर्यंत म्हणजे जवळ जवळ पांचशे वर्षांच्या काळांत त्या धर्माला उचलून धरणारा असा कोणीच वाली लाभला नसल्यामुळें त्याची पार आबाळ झाली. त्या धर्मदीपावर ग्लानीची काजळी

येऊन तो मदतेज व क्षीणबल झाला होता परकीय संस्कृतीच्या पारतंत्र्य-राजवटींत खितपत पडलेल्या झोरोष्ट्री जनतेची अवेस्ता ग्रंथावरील श्रद्धा व भक्ति डळमळीत होऊन दस्तुराची पकड ढिली व ठिसूळ बनली होती अर्थात् झोरोष्ट्र धर्माचा तो ग्रहणकाल होता

अशा विपन्न स्थितींत सासान राजवटीचा उदय होऊन राजा अर्देसर याने त्याला उचलून धरून त्याचा पुनरुद्धार करण्याचे विध प्रयत्न चालविले. ही गोष्ट खरी असली तरी त्या काळीं ज्यू, खिस्ती व इतर नास्तिकमताच्या जमातींनी तो देश व्यापून गेला होता त्यावेळीं इराण हा एकधर्मीय व एकदेशीय असा राहिला नव्हता तेथें नाना धर्मांचे व विविध मतांचें निबिड जाळें पसरून तेथील जनता हतबुद्ध व हतप्रभ होऊन किंकर्तव्यमूढ बनली होती नास्तिकमताना मोठा ऊत आला होता आचार विचारात विस्कळितपणा माजून लोकांचीं मनें चलबिचल झालीं होतीं याची सविस्तर हकीकत देण्याच्या भरीस न पडता अर्देसराच्या वेळीं नास्तिकांचें बंड किती व कसें माजलें होतें, याचा आढावा येथें घेण्याचें आम्ही योजिलें असून त्याची ढोबळ माहिती येथें देत आहो

झोरोष्ट्र धर्मांत नास्तिकता हा मोठा गुन्हा मानला असून नास्तिकाला देहांत प्रायश्चित्त देण्याचें कायद्यानें ठरविण्यात आलें होते तथापि अर्देसरच्या वेळीं त्या धर्माला अवकळा आली होती त्यामुळें तेथें फार बंड माजलें होतें नाव घेऊन सांगण्यासारखा एक अट्टल नास्तिक म्हणजे मानि हा होय

## नास्तिकाग्रणी मानी

हा नास्तिकाग्रणी मानी झोराष्ट्र धर्माचा प्रबल प्रतिस्पर्धी होता त्याने झोरोष्ट्र धर्मावर जोराचा हल्ला चढविला पार्थियन राजवटीतील शेवटचा

राजा जो आर्दवन त्याच्या कारकीर्दीत हा जन्मला व तेरा वर्षांचा झाला, तेव्हा त्याला ईश्वरी प्रेरणा होऊन तो आपणास देवाचा शेवटचा प्रेषित म्हणवूं लागला. त्यानें आपल्या मताचा प्रचार करण्यास सासान राजवटीतील अर्देशर राजाच्या अमदानींत प्रारंभ केला. अर्देशर हा झोरोष्टरी पंथाचा असल्यामुळें त्यानें झोरोष्टर धर्मास उचलून घरलें असलें तरी इतर मताविषयीं तो सहिष्णु होता. इतकेंच नव्हे तर या मानीच्या मताविषयीं त्याला मोठा आदर व सहानुभूति होती. त्याच्या मताची पकड इराणी जनतेवर बसत जाऊन शापूर पहिला याच्या अमदानींत त्याला मोठा ऊत आला. खुद्द शापुरच त्याचा अनुयायी होऊन, त्याच्या मताला त्यानें पुष्टि दिली.

हा मानीचा धर्म झोरोष्टर धर्माशीं स्पर्धा करीत करीतच वाढीस लागला. सामान्य जनतवर त्याच्या मताची पकड दिवसेंदिवस वाढतच चालली. पण पुढें बेहराम पहिला हा गादीवर आल्यावर झोरोष्टर धर्माचा कैवार घेऊन त्याला डिवचणारीं व न मानवणारीं अशीं जीं नास्तिक मतें होतीं त्याची खच्ची करण्याचें सत्र त्यानें चालविलें. त्या जाळ्यांत मानी हा पकडला जाऊन शेवटी त्याला इ. स. २७६–७७ साली जाळून ठार मारण्यात आलें. व त्याच्या अनुयायाचे असंख्य मुडदे पाडले गेले. यामुळें त्याच्या मताला इराणात गळती लागली.

या मानीची शिकवण कशा प्रकारची होती व ती झोरोष्टर धर्माला कशी बाधक होती, याविषयीं दोन शब्द सांगणें हे येथें युक्त आहे. या नास्तिकाचीं धर्मतत्त्वें झोरोष्टर, बुद्ध, ख्रिस्त व सीरीयन या धर्मतत्वावर आधारलीं होतीं. तथापि तीं झोरोष्टर धर्माला मानवणारीं नसून उलट तीं मारक अशीं होतीं. त्याच्या मताची मुख्य तत्त्वे अशीं होती. (१) पहिलें तत्त्व दैन्यस्तुति (२) दुसरें ब्रह्मचर्य उर्फ इंद्रियनिग्रह, (३) तिसरें वैराग्य

म्हणजे विषयवासना त्याग, (४) चौथें म्हणजे उपवास. व अखेरचें पांचवें (५) म्हणजे निष्कांचन मत. या पांच तत्वांवर त्यानें आपल्या मताची उभारणी केली होती. पण हीं पांचहि तत्वें झोरोष्टर धर्माला बावडी व म्हणून नापसंत होतीं. पाहिलें म्हणजे संन्यासमत हें झोरोष्टर पंथाला मान्य नव्हतें. तो जागतिक दृष्टीचा धर्म असून जगाचा उपभोग त्याला मान्य होता. म्हणून गृहस्थाश्रमाचा तो कैवारी झाला. शरीर हें जड तत्वाचें बनलें असल्यामुळें तें नाशवंत असून अखेर दुःखालाच कारणीभूत आहे. जीवाला पुनर्जन्म नाहीं असा मानीचा सिद्धांत असून झोरोष्टर धर्म त्याचा कडकडून निषेध करणारा आहे. देह–सुख–वासना दुःखाचें मूळ असून तिचा सर्वस्वी त्याग करणें हें श्रेयस्कर होय. उदंड आनंदरूपी मोक्ष मिळवावयाचा झाला, तर देहतपणर्बुद्धीचा सर्वस्वी उच्छेद केला पाहिजे, अशी मानीची शिकवण होती. तो स्वतः मोठा त्यागी असून आचरणानें शुद्ध व पवित्र होता.

ही मानीची शिकवण झोरोष्टर धर्माला सर्वस्वी विरुद्ध व म्हणून अनिष्ट होती. मानीला संन्यास हा उक्त व मान्य होता. पण झोरोष्टरी धर्म हा संन्यासवृत्तीचा नाहीं, तो जागतिक वृत्तीचा आहे. म्हणजे उद्योगधंदा, शेतीवाडी, नोकरीचाकरी करून मनुष्यानें उदरनिर्वाह केला पाहिजे अशी त्याची शिकवण आहे. ब्रम्हचर्य उर्फ इंद्रियनिग्रह हा मानीचा धर्म असून झोरोष्टरी धर्म त्याचा खडसून निषेध करतो, जागतिक सुखोपभोग घेणेसाठीं व मानववंशाचें सातत्य राखण्यासाठीं प्रत्येक मनुष्यानें विवाह हा केलाच पाहिजे, असे तो कटाक्षानें सांगतो. देवधर्म, नेमव्रत, दानधर्म हें आध्यात्मिक उन्नतिसाठीं करावयाचे असून त्यासाठीं विवाहाची अत्यंत जरुरी आहे असें तो निक्षून सांगतो. उपवास हा मानीच्या दृष्टीनें धर्म्य आहे, पण झोरोष्टरपंथाला तें मान्य नाहीं. याप्रमाणें मानी व झोरोष्टर यांच्या शिकवणीमध्यें परस्पर विरोध असल्यामुळे मानीची शिकवण झोरोष्टरधर्मांत नास्तिकांत मानली गेली असें

म्हणणें ओघानेंच प्राप्त झालें. जो कोणी झोरोष्टर पंथाच्या शिकवणी—विरुद्ध त्याच्या आचारविचाराविरुद्ध बोलतो, चालतो अगर उपदेश करतो तो नास्तिक समजावा असें दिनकर्दमध्ये नमूद करण्यात आलें आहे.

मानीची शिकवण इराणातून हद्दपार करण्यात आली तरी ती सर्वस्वी खच्ची झाली अगर समूळ नाश पावली असें मात्र झालें नाहीं. इराणातून ती अदृश्य झाली, हें खरें असलें तरी इराणाबाहेर ती वाढतच गेली. पूर्वेस ती वाढत वाढत चीनपर्यंत जाऊन थडकली व पश्चिमेस रोमपर्यंत तिचा प्रसार झाला. रोमचा राजा अगस्टाइन यास या मानींची शिकवण पसत पडून तो त्या पंथाचा अनुयायी झाला पण पुढें त्यानें खिरस्तधर्माची दीक्षा घेतली. तेव्हा त्याला तेथूनहि माघार घेणें भाग पडलें असो हा मानीपंथाचा थोडक्यात इतिहास आहे.

## मझ्दाक.

दुसरा एक नाव घेण्यासारखा कट्टर नास्तिक म्हणजे 'बमदात' चा मुलगा मझ्दाक हा होय. झोरोष्टर धर्माचा तोहि एक प्रबल प्रतिस्पर्धी होता. त्याच्या शिकवणीचा मुख्य पाया नैतिक तत्त्वावर उभारलेला असून, मनुष्यास आडमार्गास नेणारे मत्सर, राग व तृष्णा हे तीन प्रबल शत्रू जगातील सर्व दु:खाला कारण आहेत, अशा त्याच्या शिक्षणाचा रोख असे. जगात प्रत्येक मनुष्याला आपलें ध्येय साधण्यासाठी— इष्टसिद्धि मिळविण्यासाठीं—समान संधि असावी व ती देण्यात यावी त्याचप्रमाणें जागतिक सुखसोयींचा समान वाटाहि इतरांबरोबर त्यास मिळाला पाहिजे प्रत्येक मनुष्यास त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें जागतिक सुखसंपत्ति मिळविण्याची पूर्ण मुभा असली पाहिजे. सर्व मनुष्यें सारखीच असल्यामुळें त्यांना सारखेच अधिकार व सवलती व संधी असल्या पाहिजेत अर्थात् ही शिकवण काहींशी आधुनिक समता-

रमणींशी विवाह बंद होऊन त्यांच्याशी शरीरसंबं       इतकेंच नव्हे तर खुद्द इराणचा राजा यज्देगर्द पहिला याने ज्यूकन्येशी लग्न करून तिला राणीपदावर घेतलें ! या ज्यू लोकांच्या आचार विचारांची छाप इराणी जनतेवर पडूं लागून त्यांचा धर्म झोरोष्टर धर्माशी स्पर्धा करूं लागला अर्थात् ज्यू लोकाची धार्मिक चळवळ व स्पर्धाहि तेथें धुडगूस घालूं लागली

अशा स्थितींत ख्रिस्ती धर्मानेंहि उचल खाली व त्याचे पाद्री लोक गावोगाव शिरून झोरोष्टर धर्मावर शितोडे उडवीत आपल्या धर्माचा प्रसार करूं लागले दस्तूरानी प्रतिकार करण्यास प्रारंभ केला पण मिशनरी त्याना दाद देईनासे झाले दोघानी एकमेकांवर हल्ले प्रतिहल्ले करण्यास सुरवात होऊन प्रसंगोपात रक्तपातहि होऊं लागला हा ख्रिस्ती धर्म पार्थियन राजाच्या राजवटींत इराणात शिरून बसला असून सासान राजवट जेव्हां सुरू झाली, तेव्हा तो धर्म तेथें चागला रुजून बसल्याचें आढळून आलें सर्व परकीय धर्मपथात हा ख्रिस्तीधर्म मोठा आक्रमणशील होता ख्रिस्ती मिशनऱ्याचे इराणी जनतेला भुलवून व फसवून व इराणी-धर्माची नालस्ती करून त्याना आपल्या कळपात ओढण्याचे प्रयत्न कसून चालले होते यामुळें झोरोष्ट्रियन व ख्रिश्चन पंडितामध्यें नेहमी वादविवाद व अभद्र बोलाचाली होऊन शेवटीं प्रसंग एकमेकाच्या प्राणावर येऊन बेतत पुढें हे धर्मांतर बंद करण्याच्या इराद्यानें जे धर्मांतर करतील त्याना देहात प्रायश्चित्त देण्याचें व त्याना कोर्ट कचेरींत ओढून त्याना शासन करण्याचे कायदे करण्यात आल्यावर या परधर्मीय अनिष्ट चळवळीला पायबंद बसला व अखेर झोरोष्टर धर्म यशस्वी झाला

अशी जरी स्थिति असली तरी कांहीं ससानियन राजानीं ख्रिस्ती युवतींशीं लग्न करून त्यास घरात घेतले व कांहीं मान्यवर झोरोष्टरी पंडित स्वधर्म सोडून ख्रिस्ती बनले यज्देगर्द पहिला व होरमिझ्द चौथा यानी त्या

धर्माला काही सवलती दिल्या व नौशिरवान याच्या एका मुलाने ख्रिस्ती मुलीशी लग्न केले व खुश्रुपार्वेझ हा ख्रिस्ती संस्कृतींतच वाढला. परविझराजाने आपल्या बायकोस खुष करण्याकरता ख्रिश्चनासाठीं एक मठ बांधवून दिला. यस्देगर्द राजा हा मोठा पुण्यशील राजा म्हणून ख्रिस्ती लोक त्याचा स्तुतिपाठ गाऊं लागले, तर झोरोष्टर-पंथीलोक तो महापापी म्हणून त्याची निर्भत्सना करूं लागले. या प्रमाणें ख्रिस्ती धर्माची ही अशी हरागी कथा आहे. याप्रमाणें सासान राजवटींत झोरोष्टर धर्माला राष्ट्रीय धर्माचा श्रेष्ठ दर्जा मिळाला होता तरी तेथें इतर धर्मांचे व मताचे नास्तिक लोक यांची सुळबुळ अखेर पर्यंत चाललीच होती हें सांगण्याचें तात्पर्य

M. N Dhalla, Ph. D.

## इस्लामची काळघाड

राज्य संपादन करणे अगर वाढविणें हें कठीण तर खरेंच, पण तें टिकविणें अगर राखणें हें त्याहूनहि कठीण. शूर, पराक्रमी व महत्वा-कांक्षी वीर पुरुषांनी आपल्या अलौकिक कर्तबगारीवर जगावर मोठ-मोठालीं राज्यें-साम्राज्यें स्थापून, ते इतिहासांत अजरामर झाले आहेत, ही गोष्ट खरी असली तरी पुढें कालांतरानें त्याच घराण्यांत मूर्ख, आळशी, व्यसनी, विलासी व नामर्द असे खुशालचेंडू पुरुष निर्माण होऊन तीं साम्राज्यें अखेर रसातळास जाऊन पोंचल्याची दुर्दैवी कथा तोच इतिहास पुढें सांगत नाहीं काय ?

जसजसा राज्याचा विस्तार होत जाईल, तसतसें त्याचे रक्षण करणें कठीण होत जाऊन राज्यकारभाराच्या सोयीसाठीं त्याचे लहान मोठे विभाग पाडून त्यावर योग्य व विश्वासू अधिकारी नेमावे लागतात. यांना सुभेदार म्हणण्याची प्रथा असून ती जागा परंपरेने चालवावयाची

असते. पण ह्या अधिकारांचा लोभ व मोह इतका जबरदस्त असतो की पुढें हेच सुभेदार कालांतरानें मूळ मालकाला विसरून अगर बाजूस सारून आपल्या मुलखाचा कारभार राजाप्रमाणें स्वतंत्र व निरंकुशपणें पाहूं लागतात. आणि वरकरणी मात्र आपण गादीचे नम्रसेवक म्हणून मिरवीत असतात. केव्हा केव्हां शिरजोर होऊन प्रसंग येतांच मूळ गादीची सत्ता राजरोस झुगारून देऊन आपण स्वतंत्र आहो असें सांगण्यास देखील मागेंपुढें पहात नाहींत. असा ह्या साम्राज्यशाहीचा कोठें झाला तरी दुर्दैवी इतिहास असून इराणी साम्राज्य झालें तरी याला अपवाद नसणें हें कसें शक्य आहे ! होय, तेथेंहि हा रोग जडून राहिला होता असें सांगितलें तर तें अन्यथा होणार नाहीं.

या इराणी साम्राज्याचा विस्तार आतां फार मोठा वाढला असून तेथें लहान थोर सुभेदार नेमले गेले होते, त्यांना क्षत्रप म्हणत. ते आपापल्या प्रदेशांत जवळ जवळ आपलीच सत्ता चालवीत असत. त्यांना आपल्या प्रांताच्या संरक्षणासाठी व सुव्यवस्थेसाठी स्वतंत्र सैन्य उभारण्याची व ठेवण्याची मुभा असल्यामुळें कांहीं कांहीं क्षत्रपांनी योग्यतेनुसार आपापल्या हाताखालीं पगारी सैन्य ठेविलें होतें. त्यांत ग्रीक लोकांचा भरणा विशेष होता. कारण उत्तम लढवय्ये म्हणून त्यांचा नांवलौकिक गाजत होता.

सासान घराण्यांत शापूर दुसरा होऊन गेल्यावर एकहि पुरुष कर्तृत्ववान निघाला नाहीं, असें म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. पुढें जे राजे झाले ते सर्व विलासी, आळशी, स्त्रीलंपट निघून सुखोपभोगांत व ऐषआरामांतच कृतार्थता मानून त्यांतच अहोरात्र रंगून व गढून बसले होते. राज्यकारभाराकडे असावें तसें लक्ष व क्षत्रपांवर असावें तसें वर्चस्व व दरारा मुळींच राहिला नव्हता.

तथापि खुसरू परविझच्या काळीं मात्र ही स्थिति थोडीशी सुधारली अर्थात् खुसरूच्या पश्चात् इराणची साम्राज्य–घडी विस्कटून राजघराण्यात दुही व दुफळी माजून अतस्थ कलहास व सघर्षास तोंड फुटलें राज्यातील काही महत्वाकाक्षी क्षत्रपानी त्याचा फायदा घेऊन, आपल्या सैन्यातील लोकांस वडाची चिथावणी देऊन राष्ट्रीय बळकटीस व स्थैर्यास एका परीने सुरुग लावला राजकुटुबात फूट पडून, तेथें हेवादावा द्वेषमत्सर याना फूस मिळून राजसत्ता काबीज करून घेण्याच्या बाबतींत, एकमेकात स्पर्धा चालू राहिली

खुद्द राजकुटुबातील लोक आळशी व विलासी व निर्बुद्ध निघाल्यामुळें त्याचा वोज व दरारा दरबारी लोकावर व प्रजेवर राहिला नाहीं आतून फद फितुरीला वाव मिळून राज्ययत्र दिवसेदिवस खिळखिळे बनत चाललें तशातच दुष्काळ व रोगराई यानी कहर माजविण्यास प्रारभ केला राष्ट्रभक्ति व धर्मश्रद्धा याना गळती लागली खानदानीच्या घराण्यात परकीय लोकाचें अनुकरण करण्यात अहमहमिका चालून तेथें अनेक दुर्गुण व दुर्व्यसनें शिरून बसलीं व सर्वत्र अनीतीचे व दुराचाराचें प्रस्थ माजून राहिलें अर्थात् देशात सर्वत्र अनवस्था प्रसग ओढवून बसला

अशा वेळी अरेबियात अरबाचे एक नवीन इस्लामी राष्ट्र नुकतेंच उदयास आलें असून, त्याच्या प्रसरणशील व आक्रमणशील लढावू वृत्तीला अपूर्व रग व जोम चढला होता अर्थात् या नवराष्ट्राचा मूळ सस्थापक हजरत महमद पैगबर हा असून त्याचे मुख्य पीठ मदीना येथें होतें तोच इस्लामी धर्माचा आद्य प्रणेता व इस्लामी राष्ट्राचा आद्यजनक असून त्या धर्माच्या झेंड्याखाली इस्लामी राष्ट्राचा नुकताच नवोदय झाला होता

या इस्लामी धर्मोपदशकाचा आपल्या अनुयायाना एक आदेश असा होता कीं जे लोक इस्लामी धर्म मानीन नाहींत त्या राष्ट्रावर झडप घालून तरवारीच्या जोरावर त्याला इस्लामी दीक्षा देऊन येथील अखिल मानवमात्राना सत्तीने एक जात मुसलमान करून सोडायचे ! यासाठी ज्या लढाया करावयाच्या त्यास इस्लामी धर्मांत 'धर्मयुद्ध' ऊर्फ जिहाद असें नाव असून पैगंबराच्या पश्चात् पहिला खलीफ म्हणून अबुबकरला नेमण्यात आल्यावर तरवारीच्या जोरावर इतर राष्ट्राना इस्लामी दीक्षा देण्याचें सत्र जोरानें सुरू झालें. अबुबकरच्या कार-कीर्दींत त्याप्रमाणें इराक व म्यासिडोनिया प्रातावर स्वारी करण्यात येऊन, खलिद सेनापतीच्या नेतृत्वाखाली युफ्रेटीसपर्यंत धडक मारण्यात आली व दमास्कस शहर काबीज करण्यात आलें.

यावेळीं परशियन म्हणजे इराणी साम्राज्याचा विस्तार फार मोठा होता इराक, बाबिलोनिया, सिरिया इत्यादि प्रात इराणी बादशहाच्या आश्रयाखाली होते. अबूबकरच्या पश्चात् खलीफाच्या जागेवर ओमरची स्थापना झाली. त्याच्या कारकीर्दींत युफ्रेटिस नदीच्या तीरावरील अनबार व हीरा ही प्रसिद्ध शहरे काबीज करण्यात आलीं त्यातील हीरा ही राजधानी ख्रिश्चन राजाच्या ताब्यात असून तो इराणचा फार जुना आश्रित व मित्र होता. त्याचा लढाईत पराजय होऊन तो ठार मारला गेला व त्याच्या मुलाला पकडून मदीनाकडे रवाना करण्यात आलें

याप्रमाणें ख्रिश्चन राजाचा पराभव झाल्यावर या ओमरची काकदृष्टि वैभवशाली परशियन साम्राज्याकडे वळून 'दीन दीन' करीत त्याची धाड त्या रोखानें चालू झाली ही बातमी परशियन दरबारात पोंचताच तेथील सरदारांचें व धर्मगुरूचें पित्त खवळलें त्याच वेळेला जनताहि प्रक्षुब्ध झाली त्यावेळेला इराणच्या गादीवर अझरमिडोख्त ( Azarmidokht ) नावाची

राणी गादीवर होती पण तिचा कारभार म्हणण्यासारखा समाधानकारक नव्हता म्हणून तिला पदच्युत करण्यात येऊन तिच्या जागी खुसरूचा नातू यझदेगर्द या पघरावर्षांच्या पोरास गादीवर बसविण्यात आलें व अरबाना तोंड देऊन इराणचें पाणी दाखविण्याची झटून व कसून तयारी करण्यास प्रारंभ झाला

पण राजा हा ऐनवेळीं त्या मोहिमेचें धुरीणत्व पत्करण्यास तयार नसल्यामुळें त्याला वगळूनच ती मोहिम झुंझार वीर रस्तुमच्या नेतृत्वाखाली पुढें चालविण्यात आली व इराणच्या राज्य रक्षणार्थ एक लाख वीस हजार सैन्य उभारण्यात येऊन रुस्तुमला त्याचा नायक करण्यात आलें

ओमरास ही बातमी लागताच त्यानेंहि तीस हजार कडवे अरबी सैन्य घेऊन इस्लामी झंडा नाचवीत नाचवीत तो त्यास सामोरा आला दोन्ही सैन्याची भेट कडेसियाच्या मैदानावर झाली

तें इ स ६३६ वें साल व कडेसियाचें मैदान हे रणक्षेत्र पहाटे उजाडताच लढाईस तोंड लागलें दोन्ही पक्षाचे वीर मोठ्या शौर्यानें लढू लागले व लढता लढता एकमेकांस येऊन भिडले तलवारीच्या खणखणाटाने कानठळ्या बसल्या व वीरगर्जनेने आकाश—पाताळ दणाणून गेलें दोघाची झुज रात्रंदिवस सारखी तीन दिवस चालली होती रणभूमि दोन्ही बाजूच्या सैनिकाच्या रक्तानी न्हावून निघाली कोणाला मिळावे व कोणाला सोडावें याचा विजयश्रीला मोठा प्रश्न येऊन पडला यालेपेस इराणी फौजेने नेटाने लढून शत्रूस जेयल्या तेथें थोपवून धरलें होतें रणसंग्राम मोठ्या निकरात चालला असून रणचंडीला भयंकर स्फेव चढला होता

पण इतक्यात एक दुर्दैवी घटना घडून आली. लढाई चागली रंगात आली असता ऐनवेळी अकस्मात् निसर्गकोपाने एक मोठें वादळ उत्पन्न होऊन धुळीचा प्रचंड लोळ उठून तो इराणच्या सैन्यात शिरला. दशदिशा धुंद झाल्या व इराणी सैन्याच्या नाकात व डोळ्यात धूळ शिरून त्याची मोठी गाळण व धादल उडाली. अर्थात् इराणची बाजू कमजोर झाली. शत्रूच्या ही संधि आयतीच पथ्यावर पडली. लागलीच त्यानी याचा फायदा घेऊन 'दीन दीन'च्या डरकाळ्या फोडीत इराणी सैन्याची फळी फोडून आत मुसडी मारली व तेथें लाडगेतोड चाल-विली. वादळाने इराणी सैन्याला तोबातोबा करून टाकले होते. शत्रूला तोंड देण्याइतका त्याच्यात उत्साह राहिला नव्हता.

आता त्याचें दुर्दैव उभें राहिलें. शत्रूचा मारा असह्य होऊन त्याचे धैर्य खचत चालले. यावेळी सर सेनापति रुस्तुम हा आपल्या शिबिरात विश्राति घेत पडला होता. शत्रूचा 'दीन दीन' आवाज व तरवारीचा खणखणाट त्याच्या कानावर आला. तेव्हा तो उठून बाहेर येऊन पाहतो तों शत्रु अगदीं आपल्या दारात. तो प्रकार पाहून त्याची घाबरगुडी उडाली. कोणाला न सागता, न सवरता मुकाट्याने घोड्याजवळ जाऊन, स्वार होऊन मागच्या मार्गे त्यानें पळता पाय काढला. काहीं अं., तो दूर गेला तोंच एका धिप्पाड अरबानें त्याचा पाठलाग करून त्यास मधेंच गाठलें व त्या पळ-पुट्या रुस्तुमला घोड्यावरून खाली खेंचून त्थाना तरवारीनें तेथेंच गुडदा पाडला व त्याचें शीर भालाच्या टोकास रोवून, जयघोष करीत तें शत्रू सैन्यात तो मिरवीत फिरू लागला

त्या वादळाने इराणी सैन्याची फार यातायत झाली सर्व शिस्त निघून गोंधळ व गडबड माजून राहिली. तशात इस्लामी सैन्य घुसून त्याचा मारा जोराचा झाला तशातच आपल्या सेनापतीचें शीर पाहून

त्यांचें होतें नव्हतें तेवढें सर्व धैर्य खचलें व त्यांनीं जीव घेऊन अखेर रणातून पळ काढला ! झालें ! सर्व कारभार आटपला. इराण पडला व इस्लाम विजयी झाला ! या लढाईंत असंख्य लोक मारले गेले व अपार संपत्ति लूट म्हणून शत्रूच्या हाती लागली ही लढाई रात्रदिवस सतत तीन दिवस चालली होती या लढाईनें इराणीराष्ट्राचें धैर्य खचलें व धर्मसंस्थेला मोठा धक्का बसला. इस्लामी धर्मांचा हा एक प्रचड विजयच होय. हा सग्राम इ. स ६३६ साली लढला गेला

Historian's History of the World, Vol VIII

## इराणी राष्ट्राचे अधःपतन

पानिपतच्या भीषण संग्रामाची हृदयविदारक शोककथा ऐकून महाराष्ट्राच्या अंत करणाला जो हादरा बसला व दु ख-शोकाग्नीचा जो वणवा भडकला, तीच अवस्था–ततोतत तीच करुण कहाणी–या कादिशियाच्या वज्राघाताची वार्ता ऐकून आता पर्शियन राष्ट्राची झाली राजा यज्देगर्दानें तर काळीज चरकविणारी ही बातमी ऐकून जमीनच धरली ! त्याचें सगळें अवसान खचून, तो गर्भगळित झाला

यावेळीं तो राजधानीत नसून होलवन येथें होता. या बातमीनें भयभीत होऊन तेथून आपलें तळ हालवून पर्शिस्तानच्या डोंगराळ प्रदेशात शिरून तेथें तो लपून बसला. त्या मर्मभेदक दुर्वार्तेनें सबध इराणी राष्ट्र हतबुद्ध होऊन, भाबावून गेलें तथापि त्याची स्वाभिमान–ज्योत मात्र सपशेल मालवली गेली, असें मात्र झालें नाहीं.

पर्शियन साम्राज्य म्हणजे त्या काळीं कमी प्रभावी व वर्चस्वी होतें, असें नव्हे. त्याकाळी त्याचें वैभव व बोलबाला शिखरास जाऊन पोंचला

होता त्यावेळीं त्याचें वर्चस्व सिरिया इराक पासून चीन तार्तरीपर्यंत पसरलें होतें, हें इतिहासावरून स्पष्ट प्रतीत होतें कादेसियाच्या लढाईनंतर काहीं काळ तें हतबुद्ध व हतप्रभ झालें पण काहीं काळ लोटल्यावर पुन चैतन्यपूर्ण होऊन त्याची वीरश्री पुन जागृत झाली राजा यज्देगर्द हा फर्सिस्तानच्या डोंगरात असहाय होऊन जाऊन बसला आहे, ही बातमी जनतेला लागताच हजारो इराणी तरुणाच्या अगात वीरश्री सळसळावयास लागून ते तलवार उपसून अरबाची खोड मोडण्यासाठीं म्हणून हमदान पर्वताच्या दक्षिणेस पुन एकत्र जमा झाले थोड्याच अवकाशात त्याची सख्या दीड लाखाच्या घरात जाऊन पोंचली व राजा पुन त्यास येऊन मिळाला

ही बातमी त्या करड्या अरबास जाऊन पोंचताच लागलीच त्यानी आपला हिरवा विजयी झेंडा त्या राखानें हलविला व आगेकूच करीत करीत दोन्ही सैन्याची गाठ नोहावेंद येथें पडली तेथें फार मोठें रणकदन माजून असख्य वीर कामास आले जिकडे तिकडे रणभूमीवरून रक्ताचे पाट वाहून हाडामासाचा चिखल झाला ठिकठिकाणी प्रेताचे व घायाळ होऊन पडलेल्या वीरांचें ढीगाचे ढिग पडून राहिले इराणी वीरांनी या खेपेस शर्थ करून चागलाच नेट धरला काही काळ रणदेवीनें उग्र रूप धारण केलें व वीराच्या रणगर्जनेनें दाही दिशा दणाणून गेल्या

पण इराणी लोकाचें दुर्दैवच ओढवलें होतें की काय कोण जाणे ! अखेर लढाईचा रग पालटत गेला मुसलमानाच्या प्रभावी तलवारी पुढें इराणचे तेज फिक्के पडत चाललें आणि अखेर विजयश्रीनें मुसलमानाच्या गळ्यात माळ घातली या लढाईत इराणी राज्याचे कचरडें मोडून तें कोलमडून पडलें व राष्ट्रध्वज शत्रूनें हिरावून नेला राज्यलक्ष्मी शत्रूच्या गोटात जाऊन पडली आणि इराणची स्वातत्र्य-ज्योत मालवली जाऊन सर्वत्र निराशेचा काळोख पसरून राहिला अर्थात् इराणचा सर्व कारभार आता

रापुष्टात येऊन त्याच्या राजकीय नाड्या पार गारठून गेल्या ही लढाई इ. स. ६४१ साली झाली व तेव्हापासून इराणचें जें नष्टचैर्य ओढवलें तें सागून पुरवत नाहीं हा इराणी साम्राज्याचा आत्माच अंतर्धान पावला ! अर्थात् वैभवशाली इराणीराष्ट्राचा हा अध पातच होय ! !

Historian's History of the
World Vol VIII

## इराणचे शोकपर्व

या नौहावेंदच्या लढाईनंतर इराणी साम्राज्य सपशेल कोलमडून पडलें, तें पुन वर उठलेंच नाहीं. पर्शियन साम्राज्याचा तो अंतच म्हटलें तरी चालेल याचा परिणाम असा झाला की अधाशी अरबाना यथेच्छ चरण्यास हें सुपीक कुरण सगळें मोकळें झालें पुढें लवकरच हिरात, मेरोन व बल्ख हीं संपन्न शहरें पडून त्याच्या बुरुजावर इस्लामी हिरवा झेंडा फडकू लागला राजा यज्देगर्द हा जीव घेऊन पळून जात असतांना एका तुर्की स्वारानें त्याच्या अंगावरील जडजवाहिऱ्याचे दागिने लुबाडण्याच्या आशेनें त्याचा पाठलाग करून त्यास एका नदीवर गाठून ठार मारून टाकलें पुढें जें नष्टचर्य ओढवलें ते सागून पुरवत नाही

इकडे विजयी अरबानीं राजवाड्यात शिरून तेथील राजस्त्रियाना पकडून त्याच्याशी जबरीने निका लावून त्याना आपल्या रंगमहालातील बीबी बनविलें आणि ही दाडगाई पुढें अशीच चालू राहून इराणच्या खानदानी घराण्यातील सुंदर महिला कृदारर झडप घालून मुसलमानाचीं अंत पुरें त्यानीं चिकार भरून टाकलीं लुटारू अरबाचा लोंढा राजवाड्यांत व शहरातील प्रत्येक घरात शिरून तेथील उंची व कलाकुसरीच्या उत्तमोत्तम वस्तु, सोन्या चादीचे नक्षीदार प्रेक्षणीय सामान, हिऱ्यामोत्याचे मौल्यवान् दागदागिने,

उंची वस्त्रप्रावरणें व इतर सुंदर सुंदर चीजवस्त लूटमार करून सगळा इराण देशउध्वस्त करून टाकला

वाचकहो ! किती सांगावे या इस्लामी गुंडाचे अनन्वित प्रकार ! इस्लाम म्हणजे शांति अशी कांहीं लोक मोठ्या अभिमानानें व दिमाखानें व ढाई मारत असतात पण जगाला ती गोष्ट पटली आहे काय ! ती त्यांनी पटवून दिली आहे काय ? जगाचा कौल काय सांगत आहे ! इस्लाम म्हणजे जाळपोळ, लूटमार, जोर जुलूम, फोडतोड, मारहाण हाच अर्थ जगाला प्रतीत झाला नाहीं काय ! इस्लाम म्हणजे शांति खरी पण ती स्मशानशांति असें म्हणणें जास्त शोभेल ! हाच कटु अनुभव भारताला आला नाहीं काय ! मुसलमान लुटारूनीं इस्लामेतर राष्ट्रांवर झडप घालून जो अनाचार अत्याचार व भ्रष्टाचार केला, व छळ व लूटमार करून जो धुमाकूळ घातला तो मानवतेला लाजविणारा व काळिमा फासणारा असून तो पाहिला म्हणजे विचारी मनुष्याच्या अंगावर आजहि शहारे येतात व डोकें सुन्न होऊन जातें ! तीच हृदयद्रावक कथा इराणांतहि कशी घडून आली हें सांगण्याचा दुर्दैवी प्रसंग आला आहे

या शेवटच्या लढाईनंतर इराणी साम्राज्याचें बारा वाजून त्याचें सगळें अवसान खचून त्यानें जमीन धरली व तो सुसपन्न अफाट देश वाऱ्यावर उघडा पडला त्याबरोबरच झोरोप्टर धर्माचीहि दुर्दशा झाली आता त्याचा वाली कोणी राहिला नाहीं विजयी अरबांचा लोंढा एका हातांत कुराण व एका हातांत तलवार घेऊन 'दीन दीन' च्या डरकाळ्या फोडीत व 'धर्म तरी सोडा अगर जीव तरी सोडा' अशा आरोळ्या ठोकीत सर्व देशभर थैमान घालू लागला गांवोगांव फिरून, घरोघर घुसून तेथील संपत्ति व मौल्यवान चीजवस्त पद्धतशीर लुटण्याचा व घरांतील लोकांस तलवारीच्या धाकानें इस्लामी दीक्षा देण्याचा धूमधडाका

त्यानीं चालविला. जे धर्मांतरास विरोध करतील अगर नाखुष असतील त्यांचे हाल दुःख, छळ व कष्ट यांचें यथार्थ वर्णन करणें हें ब्रम्हदेवालाहि शक्य नाहीं. नवऱ्याला बांधून त्याच्या समोर बायकोला ओढून तिच्यावर आसुरी अत्याचार करणें, बायको समोर नवऱ्याला धरून त्याला कंठस्नान घालणें, भावासमक्ष बहिणी-वर, आईसमक्ष मुलीवर, मुलासमक्ष आईवर विनयभंग करून त्यांना छळमार करण्याचे एकच सत्र चालू झालें. घरोघर रक्ताचे पाट वाहूं लागले, बायकांच्या आक्रोशाने व मुलांच्या किंकाळ्यानीं दशदिशा भरून गेल्या. ठिकठिकाणी घराला आगी लावण्यांत आल्या, अग्निमंदिरें जाळण्यांत आलीं. कित्येक लुटण्यांत आलीं. कित्येक जमीनदोस्त करण्यांत आलीं. व कित्येकांचे मशीदींत रूपांतर करण्यांत आलें. अथर्वनाची सारखी लांडगेतोड चालू झाली. पवित्र धर्मग्रंथ–भांडाराची अग्नीला आहुति दिली गेली. असंख्य स्त्रियांना पकडून त्यांची मदीनाकडे रवानगी करण्यांत आली.

कित्येक कुलीन कुटुंबानीं अब्रू बचावण्यासाठी स्वतःच्या घराला आगी लावून, त्यांत आपला स्वाहाकार केला! कित्येक घरं-दाज स्त्रियांना इस्लामी गुंडानी पकडून दासी म्हणून विकण्यासाठीं त्यांची स्वदेशांत रवानगी केली. कित्येकांशी जबरीनें निका लावून त्यांना झनान्यांत डांबून ठेवण्यांत आलें. कित्येक साध्वी स्त्रियानीं अरबांचा जाच व जुल्म सहन न होऊन अब्रु बचावण्यासाठी विहीरींत उड्या, व तळ्यांत जलसमाधि घेतली. कित्येकांनीं रानावनाचा रस्ता सुधारला. कित्येक लोकांनी अरबांच्या जुल्म जबरदस्तीस भावरून जीव रक्षणार्थ झोरोष्टर धर्मावर पाणी सोडून इस्लाम पंथाचा स्वीकार केला. कैक कुटुंबानी घरदार, जमीनजुमला, धनदौलत तेथल्या तेथें टाकून जीव घेऊन रानावनाचा रस्ता सुधारला. कैक मुलें पोरकी झाली. कैक स्त्रिया उघड्या पडल्या. कैक कुटुंबे नागवलीं गेलीं, बागबगीचे ओस झाले,

थोडक्यात अखिल इराण दुःखशोकानें, जाळपोळीनें, लूटमारीनें, जुलूम जबरदस्तीनें होरपळून निघाला !

या दुर्दैवी इराणची शोककथा किती लिहीली तरीं ती संपावयाची नाहीं. हें सर्व थोडक्यात सांगावयाचें म्हणजे खलीफ ओमर या खलीफाच्या कारकीर्दीतच मुसलमानानीं तलवारीच्या जोरावर छत्तीस हजार लहानमोठी गांवें व शहरें काबीज केलीं चार हजार ख्रिस्ती, इस्त्रायली व झोरोष्टरी देवळें पाडून तीं उध्वस्त केलीं आणि ठिकठिकाणी चौदाशें मशीदी उभारल्या. माणसें किती मारलीं, स्त्रिया किती पळविल्या व संपत्ति किती लुटली, याचा पत्ताच नव्हता, असें तत्कालीन एक इतिहासकार (खोंडमीर) हा म्हणतो.

या सर्व शोकपर्वाचा शोचनीय आढावा घ्यावयाचा म्हणजे तो असा घेता येईल. अरबानीं इराणात जो अनर्थ व उत्पात माडला, तें सांगण्यास शब्द असमर्थ आहेत. फार काय, इस्लामच्या 'दीन दीन' आरोळ्यानीं सगळा इराणदेश हादरून गेला ! राजवाड्यावर मोठ्या तोरानें व वैभवानें फडफडणारा झोरोष्टरी राष्ट्रध्वज उखडला जाऊन त्याच्या जागीं नक्षत्रचंद्राकित हिरवा इस्लामी ध्वज फडफडूं लागला पवित्र ! अग्निमंदिरें उध्वस्त होऊन तेथें मशीदी उभारण्यात आल्या ! अवेस्ता ग्रंथाला अग्निसंस्कार मिळून, तेथें कुराणचा घोष ऐकूं येऊं लागला ! अहुरमझ्दची जागा अल्लानें पटकावली ! शहानशहाच्या राजपीठावर खलीफाची मूर्ति विराजमान झाली ! महात्मा झोरोष्टरचें स्थान हजरत महमद पैगंबरनें पटकावलें ! अथर्वानाचें आसन इमामानें मंडित केलें ! आणि अग्यारीतील मधुर व मंजुल गाथा पठणाच्या जागीं मशीदीतील मिनाऱ्यावरून 'अल्ला हो अकबर'चा मुबाशिनाचा उच्च घोष हवेंत गर्जूं लागला ! अशा रीतीनें हजार वर्षे

मोठ्या वैभवात व सुखासमाधानांत नांदत आलेला झोरोष्टर धर्म थोड्याच अवधींत इराणातून पार हद्पार होऊन त्याची स्मृति देखील पुढें काळाच्या प्रचंड व अगाध उदरांत गडप होऊन बसली !' ही अशी एकंदर इराणची शोककथा आहे

Historians History of the World
VLO VIII

## इराणचा वनवास

इराण पडल्यावर तेथें इस्लामी धर्मवेडयांनीं व अंधभक्तांनीं चालविलेली दंडेली, जुल्म व अत्याचार सहन करणें हें मानवी सहनशक्तीला असह्य झालें यामुळें कित्येक झोरोष्टरी पंथाच्या भक्तानी व अनुयायानीं इस्लामी क्रौर्याला कटाळून घरदार, शेतीवाडी व मालमत्ता यावर पाणी साडून बायकामुलें घेऊन गांवाला रामराम ठोकून वनवास पत्करला व खोरासान येथील डोंगराळ प्रदेशात जाऊन मुक्काम केला व तेथें राहून काही दिवस अरबांशीं टक्कर दिली तेथें त्यानीं जवळजवळ शभर वर्षे काढलीं मोकळा चालून डोंगराळ प्रदेश तरी पण तशा निर्जन प्रदेशातच तग धरून अरबाना दाद न देता आपला जीवनक्रम यथा तथा चालविला व झोरोष्टरपंथाची जोपासना केली पुढें तेथेंहि मुसलमानाचा त्रास दिने दिने अधिकाधिक वाढू लागला

त्या धर्मवेडया रक्तपिपासु राक्षसाचा त्रास व छळ चुकविण्याच्या इरादानें तेथूनहि तळ हालवून काहीं कुटुंबानीं दक्षिणेंत इराणी आखातातील आरमझ बेटाचा आश्रय केला तेथें त्यानीं जवळजवळ पंधरा वर्षे काढलीं तेथें कांही दिवस शांति मिळाली हें खरें पण ती फार दिवस टिकून राहिली नाहीं तेथेंहि त्याला लांडग्यानीं झडप घालून त्रास देण्यास सुरवात केली त्या निरुपद्रवी कोंकराचा छळ मांडला

तेथें राहणेंहि त्यांना आतां अशक्य झालें. मग आतां जावें कोठें व जगावें कसें? कृतांत काळच त्यांच्यामागे हात धुवून लागला होता की काय न कळे!

येथेंहि आपली घडगत नाहीं व वनवास चुकत नाहीं हें पाहून कित्येक घाडशी पारशी कुटुंबांनीं अहुरमज्दवर श्रद्धा ठेवून त्या बेटालाहि अखेर रामराम ठोकून होडीत बसून तेथून पाय काढला. आतां त्यांची स्वस्थपणे जगण्याची सर्व आशा निष्फळ ठरली होती. 'दे माय धरणी ठाय' असें त्यांना झालें होतें. समुद्रांतून वल्ही वल्हवीत वल्हवीत येतां येतां अखेर काठेवाडच्या दक्षिणेस खंबायत आखातातील दीव बेटावर येऊन ते उतरले. तेथें त्यांना स्वर्ग दिसला व जगण्याची आशा अंकुरली! तेथें पुढें त्यांना सुरक्षित स्थान लाभलें व झोरोष्टर धर्माला नवचैतन्य स्फुरलें.

दीव येथील सुस्थिति व सुरक्षितपणा ऐकून पुढें पारशी निर्वासित कुटुंबांचे थवेच्या थवे एकामागून एक तेथें येऊन राहूं लागले. येथें आल्यावर त्यांना शत्रूंचा उपसर्ग पोंहोचेनासा झाला. येथें जवळ जवळ वीस वर्षे राहून त्यांनीं सुखासमाधानानें कालक्रमणा केली. या अवधींत हिंदुस्थानांतील लोकांशीं दळणवळण ठेवून त्यांचा स्वभाव, धर्म, त्यांचे आचारविचार व चालीरीती, यांचा परिचय करून घेतला; व त्याप्रमाणें आपल्या चालीरूढीला मुरड देऊन त्यांचा स्नेह व सहानुभूति संपादण्याचा प्रयत्न चालविला. या वीस वर्षांच्या काळांत दीव बेट सगळें पारशी निर्वासितांनीं चिकार भरून गेलें व ती पारशांची थवळ जवळ वसाहत बनली. आणि त्या गांजलेल्या दुःखी लोकांना येथें सुखशांतीचे दिवस पुनः लाभले.

(Pay master)

# अखेर भारताने हात दिला.

दीव येथें आल्यावर त्यानी जवळ जवळ वीस वर्षें तेथे मुलासमाधानात काढली. येथें येऊन राहिलेल्या लोकाची सुस्थिति व सुरक्षितपणा ऐकून आरमझ पेटातील व इराणातील कित्येक त्रस्त व ग्रस्त लोक हळु हळू इकडे येऊं लागले. त्याना येथें आल्यावर नरकाचा स्वर्ग दिसू लागला. व मुसल्मानाच्या राक्षसी छळापासून व जुलुम जबरदस्तीपासून ते निर्धास्त बनले. अर्थात् ते येथें आल्यावेळीं हिं लोकाची दीव येथे वस्ती होती. त्यांच्याशी या निर्वासित लोकानी नम्रतेनें व सभ्यरीतीनें वागून त्याची सहानुभुति मिळविली व त्याच्यामध्यें मिळून मिसळून त्याचे आचारविचार व रीतीभाति याचा परिचय करून घेतला.

पुढें होता होता तें बेटहि त्याना अपुरें वाटूं लागलें. तेव्हा त्यानीं एकत्र जमून हिंदुस्थानात येऊन राहण्याचा विचार केला, त्याप्रमाणें काहीं कुटुंबे तेथून निघालीं व हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील संजान येथें येऊन उतरलीं. तेथील हवापाणी व देश परिस्थिति पाहून ते स्थान पसंत पडून तेथें कायमची वसहात करून राहण्याचा त्यानीं बेत केला.

त्यावेळीं तो प्रात यादव राणा ( जदी राणा ) याच्या ताब्यात होता. त्या प्रांतावर त्याची सत्ता चालू होती, तो तेथें आपणास राजा म्हणवीत होता. त्याच्या जवळ जाऊन त्याची अनुमति घेण्यास एक शिष्टमंडळ नेमून त्याचे पुढारीपण दस्तूर नयोंसग याजकडे देण्यात आलें. आणि त्याच्याबरोबर काहीं मौल्यवान नजराणे पाठविणेंत आले. सर्व तयारी करून पारशाचें शिष्टमंडळ राजाच्या भेटीस राजधानीत आलें. त्या शिष्टमंडळाचें राजाने आदरपूर्वक स्वागत करून आपल्याकडे येण्याचा त्यांचा उद्देश व हकीकत ऐकून घेतली. तेव्हां त्या धर्मगुरु नयोंसगाने आपली पूर्वकथा सागून

इस्लामी गुडानी त्याची दुर्दशा व दु स्थिति कशी केली याचें हृदयद्रावक वर्णन केले आणि राजाच्या आश्रयाखाली कायमची वस्ती करून राहण्यास परवानगी मागितली त्यावेळीं त्यानी इराणी धर्माची व चाली रीतीची हकीकत निवेदन केली, त्याचा अनुवाद 'षोडश श्लोका ' या श्लोकबद्ध सोळा श्लोकात सागण्यात आला आहे तिचा आम्ही तात्पर्य रूपाने थोडक्यात भावार्थ पुढील प्रमाणें देत आहो मूळ श्लोकच दिले असते पण वाचकास त्याचा अर्थबोध समजण्यास जड जात असल्यामुळें, त्या भरीस न पडता फक्त मराठींत त्याची रूपरेखा देत जातो

तो दस्तूर म्हणाला— हे राजन् ! ऐक, आम्हा पारशी लोकांचा वृत्तात ऐक तो थोडक्यात असा आहे —

आम्ही पारशी लोक इराणातील मूळ रहिवासी असून आम्ही आर्यकुलोत्पन्न आहोत वर्णानें आम्ही गोरे, शरीरानें सदृढ, तसेंच धीर व वीर अशा गभीर वृत्तीचे आहोत सर्वशक्तिमान, सर्वज्ञानी, सकलगुणसपन्न, व परमदयाघन अशा मज्द प्रभूचे आम्ही उपासक आहोत अवेस्ता हा आमचा पूज्य व पवित्र ग्रथ आहे सूर्य, अग्नि, वायु, पृथ्वी, आकाश व उदक याचें दिवसातून तीन वेळा आम्ही ध्यान करतो आणि स्वर्ग, मृत्यु, पाताळ हे तीन लोक आम्ही मानणारे आहोत आम्ही स्नान करून अगांत सदरा व कमरेंत निपदरी शुभ्र लोकरीची कुस्ती धारण करतो व डोक्यावर दुपदरी टोपी व त्यावर रुमाल गुडाळतो स्नान प्रार्थना, पवित्र ग्रथपठण, अग्निहवन भोजन, मुखशुद्धि व मलमूत्रोत्सर्ग इत्यादि करताना मौनव्रत पाळतो शुष्क लाकूड, कापूर, अगरु, धूप, गध इत्यादि परिमळ द्रव्यानी आम्ही अग्नि प्रीत्यर्थ नित्य पाच वेळा होमहवन करतो आम्ही अन्नदान करतो घर बाधणें, पूल उभारणें, धर्मशाळा व दवाखाने उघडणें, सत्पात्र याचकाना धन दान करणें व अतिथिअभ्यागताचा सत्कार

इत्यादि जनहिताच्या उपयुक्त गोष्टी करण्यात आम्ही तत्पर असतो. आम्ही एकपत्नी व्रत पाळतो. वेश्यागमन आम्हास निषिद्ध आहे. आम्ही पितराचे श्राद्धकर्म पाळणारे आहोत लग्नकार्यासारख्या मंगल प्रसंगीं आमच्या स्त्रिया सुस्वर गायन व मंजुल वादन करतात. त्या देहानें परिशुद्ध असून अंगास सुगंध द्रव्याची उटी लावतात. त्या गौरवर्ण असून सुंदर वस्त्रें परिधान करतात. त्या धर्मकार्यात परम श्रद्धालु असून गृहकृत्यात सदैव दक्ष असतात. रजस्वला झाल्या म्हणजे सात दिवस विटाळ पाळतात व बाळंत झाल्यास महिनाभर अशौच पाळून मग शुद्ध होतात, दोषक्षालनार्थ प्रायश्चित्त म्हणून गोमूत्र घेऊन स्नान करून व ठराविक काल मतरय राहून पुनः शुद्ध होण्याची आमची वहिवाट आहे. आमच्या विचारात, भाषणात व वर्तनात एकसूत्रीपणा राखणें हें आमचे परम कर्तव्य आहे. आम्ही शास्त्र व गुरुवचन पाळतो. व्यवहारांत न्यायनीतीनें वागणे हा आमचा धर्म आहे. थोडक्यात, राजन् ! हा आमचा असा धर्म व चालीरीति आहेत. एकंदरींत आम्ही पारशी लोक कुलवान, नीतिमान, धैर्यवान, वीर्यवान असून इस्लामी जुलूम-जबरदस्तीमुळें देशत्याग करून निर्वासित होऊन वणवण फिरत आहोत तर आपल्या राज्यात कायमची वस्ती करून राहण्यास व आमचें संरक्षण करण्यास आपण कृपावंत होऊन मान्यता देऊन आम्हास आश्रय द्यावा अशी सरकारजवळ आमची प्रार्थना आहे !" याप्रमाणे त्या दस्तुरानें आपला वृत्तांत सांगितला

त्या धर्मगुरूचें हें वरील भाषण ऐकून त्या उदार राण्याच्या मनात त्याच्याविषयीं सहानुभूतीचा अंकुर फुटला व त्याची असहाय व निराधार करुणास्पद स्थिति पाहून त्याचे अंतःकरण दयार्द्र बनले. भारतीय उदात्त परंपरेला अनुसरून त्या राण्यानें त्यास पुढील अटीवर, भारतभूमी मातृभूमि समजून येथें कायमची वसाहत करून राहण्यास परवानगी दिली व त्याचें शत्रूपासून रक्षण करण्याचें अभय वचनहि दिलें.

त्यानें अटी घातल्या त्या ह्या (१) पारशानीं येथील देशीभाषा वापरावी (२) त्याच्या स्त्रियानीं हिंदूप्रमाणे वेषभूषा करावी. (२) त्यानीं आपले विवाह दिवसा न करता रात्री करावेत (४) त्यानीं शस्त्र धारण करावयाचें नाहीं. (५) शेतशेतकी करून उदरनिर्वाह करावा.

या अटी पारशानीं मान्य केल्या व संजान येथें राहण्यास त्याना राजशासन मिळालें. तेव्हापासून पारशी लोक हे भारतमातेचे कायमचे नागरिक होऊन येथें सुखासमाधानानें, गुण्यागोविंदानें व प्रामाणिकपणे नादू लागले. त्यानीं झोरोष्टर धर्माचें पुनरुज्जीवन करून, अग्नीच्या उपासनेंत आपलें जीवन सुखमय करून घेतलें. अर्थात् ही भारतभूमी त्याची मातृभूमि झाली व तिचें ते सुपुत्र होऊन निर्भयपणें सुखाचा संसार याद्न राहिले आहेत. झोरोष्टर धर्माची व धर्मीयाची ही अशी उत्तरकथा आहे.

उ रार्ध समाप्त



# झोरोष्टर धर्मातील दिव्य सृष्टि.

## अहुर मझ्द्

### ( आदि पुरुष )

' ब्रम्ह वा इदमग्र आसीत् ' — ही सृष्टि उत्पन्न होण्याच्या अगोदर ब्रह्म या नावाची एकमेवाद्वितीय अशी सद्वस्तु होती ब्रम्ह याचेंच दुसरें नाव प्रजापति असें आहे ( प्रजापतिर्वा इदमग्र आसीत् ) त्यानेंच ही सर्व स्थावर जगम सृष्टि निर्माण केली (' स इद सर्वमसृत् ) असें भारतीयाच्या प्राचीन वेदात सागितलें आहे आता झोरोष्टर धर्मात याविषयी काय सागितले आहे हें थोडक्यात पाहू

वैदिक वाङ्मयात ब्रम्ह उर्फ प्रजापतीला सृष्टिक्रमात जें स्थान आहे, जवळजवळ तेंच स्थान अवेस्ताधर्मात अहुरमझ्दला देण्यात आलें आहे त्याचें वर्णन तेथें आढळतें तें असें –

अहुर मझ्द हा प्रकाशापासून उत्पन्न झाला असून तोच जगाचें आदिबीज आहे (यश्न ३१–७) तो गरोन्मन म्हणजे पृथ्वीचा व सत्प्रवृत्तीचा जनक आहे (यस्न ३७–१) त्याचप्रमाणे सूर्य, चद्र, नक्षत्रें व वायु, आप, तेज इत्यादि महाभूताचाहि जनक आहे (यस्न ३७–१) त्यानें अग्नीला निर्माण केलें (यस्न १५–४२) पृथ्वीला जन्म दिला (यस्न ३७–१) उषा, दिवस व रात्र हीं त्याच्यापासूनच झालीं (यस्न ४४–५) तो वायूला वाहावयास लावतो व पावसाला वर्षावयास प्रेरणा देतो (यश्न ५–१२०) त्यानें उभ्दिजसृष्टि निर्माण केली (यश्न ३७–१)' अश्वगवादि पशु निर्माण केले (यस्न ९–१) तसेच चिमणी, कावळा इत्यादि पक्षी व मत्स्यादि जलचर प्राणी उत्पन्न केलें (यस्त ८-४८) त्याने मनुष्य निर्माण केला (यस्न ३१–११) अर्थात् हें सर्व भूतजात व जीवजात त्यानेच निर्माण केलें

त्यानें निर्माण केलेली वरील सर्व सृष्टी ही विकारवश व नश्वर आहे. पण तिला निर्माण करणारा अहुरमझ्द हा स्वतः निर्विकारी व अविनाशी आहे. त्याला आदि नाहीं व अंतहि नाहीं. अर्थात् तो अनाद्यनंत आहे. तो मागे होता, आता आहे व पुढेहि असणार. अर्थात तो नित्य व शाश्वत आहे (यस्न २४-९ व ३९-३) तो सर्वज्ञ आहे (यस्न १२-१). जगांतील सर्व घडामोडीं त्याला दिसतात व कळतात (यस्न २९-४) अर्थात् तो सर्वद्रष्टा आहे. तो विश्वात सर्वत्र भरून राहीला आहे (यस्न ४३-३) तो सर्वद्रष्टा आहे (यस्न १-१२) सर्व जगावर तो आपली सत्ता चालवितो (यस्न ४३-१) तो विश्वमंगल व परमपवित्र आहे (यस्न ६-१० व ३-१३).

तो मोठा उदार आहे. (यस्न ३३-११) तो सर्वोत्तम व सर्व दयाघन आहे. (यस्न ३७-३) सर्व जगाचा रक्षणकर्ता व पालनकर्ता तोच आहे. (यस्न ३४-३). तो वैद्यातला महावैद्य आहे. (यस्न ३४-३) तो सत्यमूर्ति असून भक्तवत्सल व भक्ताभिमानी आहे. (वेंदिदाद १८-७) तो निस्पृह न्यायमूर्ति असून, परम दयाळु आहे.

तो स्वर्गाचा अधिपति व पृथ्वीचा सर्वेश्वर आहे. (यस्न ३२-२) तो सर्व समर्थ असून मोठा उदार मनाचा आहे. (यस्न ३४-१५). तो सर्वाधीश असल्यामुळें भक्तजनावर त्याच्या इच्छेप्रमाणें सुखसंपत्तीचा वर्षाव करतो. (यस्न ५०-४ व ५३-९). त्याची सत्ता पृथ्वीवर व स्वर्गावर सारखीच चालते. (यस्न ४०-२), तो परमशूर असून शत्रुहता आहे. (यस्न ६-१० व यस्न १-१२)

तो जगाला सर्वोत्तम व सर्वश्रेष्ठ, मंगलप्रद व हितकर कायदे देणारा असून, त्याच्या न्याय व नीतिगर्भ कायद्याला 'दएना' असें मझ्दधर्मात संबोधण्यात येतें. या शास्त्र नियमाला अनुसरूनच जगाची रचना करण्यात

आली (यस्न २८ ११) त्याचा कायदा सर्वश्रेष्ठ असून, तो शाश्वत आहे त्याला अनुसरूनच सर्व विचारी जग चालत असते अर्थात् त्याची इच्छा म्हणजेच कायदा होय (यस्न ३४ १२)

या दयेनाचे म्हणजे अवेस्ताधर्माचे दोन भाग आहेत एक सृष्टिधर्म उर्फ नैसर्गिक धर्म व दुसरा नीतिधर्म तथा मानवधर्म वेंदिदादमध्ये सृष्टिधर्म कथन केला असून गाथेमध्ये मानवधर्म उर्फ आचारधर्म याचें निरूपण आहे मनुष्यानें या लोकीं आपला अभ्युदय म्हणजे उत्कर्ष व परलोकीं निःश्रेयस प्राप्त करून घेण्यासाठीं हे दोन्हीं धर्म शास्त्रोक्त रीतीनें आत्मकल्याणेच्छु मनुष्यानें अवश्य पाळले पाहिजेत असा त्याचा दीर्घ कटाक्ष आहे एतदर्थ त्यानें त्या धर्मांचा अभ्यास केला पाहिजे त्यावर विचार केला पाहिजे व त्याप्रमाणें वर्तन केलें पाहिजे तरच त्याला इहपरलोकीं सुख व सद्गति प्राप्त होते वैदिक धर्मांतहि आचारधर्माला प्रमुख स्थान देण्यात आलें असून 'आचार प्रथमो धर्म' या सूत्रवाक्यानें त्याची महति गायली आहे असो !

हा अवेस्ता धर्म प्रथम मनुष्याला मथ्रास्पेंता' च्या द्वारा प्रकट करण्यात आला माथ्रस्पेंता हा पवित्र व प्रभावी मंत्र असून तो मनुष्याना शिकविण्यासाठीं म्हणून दयाळु मज्दप्रभूनें पवित्र व सच्चरित्र पुरुषाना प्रेरणा म्हणजे त्याच्या मुखातर तो आपला धर्म जगाला जाहीर करतो अर्थात् परमेश्वरानें आपला धर्म मनुष्यापासून लपवून ठेविला नसून वेळोवेळी तो जगाला जाहीर करीत आला आहे त्याने पहिल्या प्रथम मनुष्याचा आदि पुरुष जो गयोमर्द त्यास ता धर्म सांगितला पुढें काहीं कालानें तोच धर्म पुण्यश्लोक यिम राजास सांगण्यात आला त्यानंतर तोच धर्म पुढें महर्षि झोरोष्टरासहि स्वर्गावर घेऊन जाऊन अवस्ता धर्माचा उपदेश देण्यात आला पुढें महात्मा झोरोष्टरने त्याचा

या जगात स्पष्ट व सुबोध शब्दात इराण भर फिरून तो तेथें रुजविला व स्थिर केला. तसा प्रचार व प्रसार पूर्वीच्या उपदेशकाकडून कधीच व केव्हाहि करण्यात आला नव्हता. म्हणून महर्षि झोरोष्टर हाच मझ्दधर्माचा श्रेष्ठ प्रवक्ता व आद्य प्रणेता मानण्यात येतो.

हा अहुरमझ्द सर्वसमर्थ, सर्वज्ञानी व सर्वजेता असून, त्याच्यासारखा श्रेष्ठ असा दुसरा कोणी नाहीं त्याच्याहून मोठाहि कोणी नाहीं व वडीलहि नाहीं तो अत्यत सुदर असून सूर्यासारखा अत्यत तेजस्वी आहे (यस्न १-१) तो विश्वात सर्वत्र भरून राहिला आहे आणि असला तरी डोळयाला मात्र प्रत्यक्ष असा कोठेंच दिसत नाहीं. त्याला सर्व काहीं दिसते व सर्व काहीं कळते (यस्न १ ७), तो अखड जागृत असून मनुष्याची बरीवाईट सर्व कृत्यें तो पहात असतो ('न वैदेवा स्वपन्ति') असें वेदात म्हटलें आहे. तो सरळ, समबुद्धि व न्यायनिष्ठ असून कोणाला अन्याय करीत नाहीं व फसवीतहि नाहीं आणि त्याला कोणी फसवू शकत नाहीं (यस्न १-१२).

तो गरोन्मन स्वर्गात राहतो. तो स्वर्ग 'बेरेझैति' म्हणजे अलबुर्झ पर्वतावर असून, तेथें उदड प्रकाश उजळलेला असतो त्याच्याजवळ वोहुमनो, अशवहिश्त, क्षत्रवइर्य, अरमइति, हउर्वतात् व अमेरेतात् असे सहा दिव्य प्रतिनिधि असून, त्याच्याद्वारा तो हें विश्वचक्र अखंड व सुरळीत चालवितो तो भक्तपरिपालक व दुष्टसहारक असून सर्व विश्वावर त्याचीच सत्ता व अधिकार चालतो त्याचे प्रिय उपासक जे आर्य त्याना रहावयास पृथ्वीवरील अत्यत सुदर व सुपीक प्रदेश जो 'अइर्यन वएज' हा त्याने त्यास दिला

पुढें असा प्रसग उद्‌भवला कीं सज्जनाचा व देवभक्ताचा वैरी जो दुष्ट अहिर्मन यानें त्या पुण्यप्रदेशावर हिमवृष्टि करून त्याचा सपूर्ण नायनाट

करण्याचा घाट घातला पण तो दुर्दैवानें फसला कारण मज्दप्रभूनें त्यावेळीं तेथील यिमराजास बोलावून घेऊन त्यास भावी आपत्तीची व अनिष्टाची पूर्व सूचना देऊन तेथून तळ हालविण्याचा त्यास योग्य सल्ला दिला त्याचप्रमाणें पुढें महात्मा झोरोष्टरासहि स्वर्गावर घेऊन जाऊन अवेस्ता धर्माचा त्यास मगल सदुपदेश केला तो सद्विचार, साधुवाणी व सद्वर्तन याचा मोठा चाहता असून अशा पवित्राचरणी भक्तजनांवर तो अनुग्रह करून त्याचें इहपरलोकीं उदड कल्याण करतो असो ! अशी सव दयाघन मज्दप्रभूची अवेस्तातील थोडक्यात कथा आहे

आता पुढें जावयाच्या अगोदर आणखी एका महत्वाच्या गोष्टीचा येथें खुलासा करून मग पुढील मार्ग आक्रमावा असे आम्हास वाटते म्हणून त्याचाहि येथें धावता परामर्श घेऊन मग पुढें जातो ती महत्वाची गोष्ट म्हणजे अवेस्तातील अहुरमज्द व ऋग्वेदातील देवराज इद्र यांचें सुदर साम्य दासविणारी अवेस्तातील व ऋग्वेदातील कांहीं वचनें येथें उद्धृत करतो म्हणजे आमच्या वाचकाना मज्दविषयीं योग्य व यथार्थ कल्पना करण्यास मदत होईल व त्याचप्रमाणें वैदिक देवाविषयीं अज्ञानामुळें गद्दळ झालेलें आमच्या पारसी बाधवाचें कलुषित मनहि प्रकाशित होऊन तें निवळेल अशी आम्हास आशा असल्यामुळें हा प्रयत्न करण्यास आम्हीं उद्युक्त झालो आहो

| अहुरमज्द<br>अवेस्ताग्रंथ | इद्र<br>ऋग्वेदसंहिता |
|---|---|
| १ अहुरमज्द हा अत्यत तेजस्वी आहे (यस्न १ १) | देवराज इंद्र हा अत्यत तेजस्वी आहे 'ओजिष्ठ '(ऋ ६-१९-६) |
| २ तो सर्वांत मोठा आहे (यस्न १ १) | महिष्ठ (ऋ १-५७-१) |

३ तो सर्वोत्तम आहे (यस्न २१-१) वरेण्य (ऋ ३-३४ ८)
४ तो अत्यत सुदर आहे (यस्न २६ २) सुपेशस (७ ३२ १३)
५ तो अत्यत बलवान आहे (यस्न १-१) शविष्ठ (७ ७० ६)
६ महाज्ञानी आहे (यस्न २६-२) सुमेध (ऋ ३ १···)
७ सर्वद्रष्टा आहे विचर्षणि (५-३८-१)
८ निश्चल आहे (यस्न २६-२) अच्युत (२ १२-९)
९ अमर आहे [यस्न २४ ९] अमर्त्य [३-·१ १]
१० पवित्र आहे [यस्न १९-१] शुचि [१०-७९ १]
११ मगल आहे [यस्न ६ १०] शिव [६-४४-१७]
१२ विश्रुत आहे [यस्न १-१] सुश्रवस्तम [८-१३-२]
१३ मोठा बुद्धिमान आहे [यस्न १ १] सुप्रचेत [ऋ ७ ११ १०]
१४ अहिंसित आहे [यस्न १ ६] अमृध [६-१९-७]
१५ अपाप आहे अनवद्य [६-१९ ४]
१६ सत्य आहे सत्य [१-६३-३]
१७ मोठा शूर आहे [यस्न ६-१०] शूर [१-१०-३६]
१८ मोठा उदार आहे [यस्न १-१] सुदानु [७ ३१ २]
१९ स्वर्गाचा जनक आहे [वेंदिदाद२२-१] जनितादिव [८-३६ ·]
२० पृथ्वीचा जनक आहे [यस्न ३१-१] जनिता पृथिव्य [८-३६ ४]
२१ उदकाचा जनक आहे [यस्न ३१-१] अपूज उर्मिमपाम् [७-१०-१२]
२२ सूर्याचा जनक आहे [यस्न ३७-१] य सूर्यं जजान [२-१२-७]
२३ उषेचा जनक आहे [यस्न ४४-१] य उषस जजान [२-१२-७]
२४ गाईचा जनक आहे [यस्न ३१-१] जनितागवा (८-३६ ·)
२५ सुखाचा दाता आहे सुमृळीक (६ ४७ २)
२६ सर्वजेता आहे (यस्न १-१२) विश्वषाह (६-४४ ४)

२७ भुवनाचा राजा आहे — एको विश्वस्य भुवनस्य राजा ३-४६-२
२८ सूर्याला वाट करून दिली (यस्न ४४-३) पाथिकृत् सूर्याय (१०-१११-३)
२९ सर्व प्राणीमात्राचा सत्ताधीश आहे ईशानमस्य जगतः (७-३२-२२)
३० स्वर्ग उचलून धरला (यस्न ४४-४) धर्ता दिवः (३-४९-४)
३१ पृथ्वी उचलून धरली यस्न ४४-४ दाधार पृथिवीम्
३२ सत्यवचनी आहे — ऋतप
३३ रक्षणकर्ता आहे (यस्न १-१२) — अविता
३४ भक्त रक्षक आहे — स्तोतृणा अविता १० ३४ ३

यावरून अवेस्तातील मज्द व ऋग्वेदातील इंद्र याचा तोंडवळा जवळ-जवळ सारखाच नाही असें आता कोण म्हणेल? हिंदू व पारशात परस्पराच्या धर्माविषयी देवताविषयी जो गैरसमज दृष्टीस पडतो तो अज्ञान मूलक व दुराग्रह—दुष्ट आहे. तो सूक्ष्म व समतोल विचारार्ती नाहीसा होईल असा आह्मास विश्वास वाटतो. याविषयी अधिक लिहू इच्छीत नाही. सूज्ञ वाचकानी काय बोध घ्यावयाचा तो घ्यावा. एवढी सूचना करून पुढाले वाटेस लागतो

## अमेश स्पेंता

अमेश स्पेंता म्हणजे अवेस्ता धर्मातील सर्व शक्तिमान, सर्वज्ञ, सर्वसमर्थ अशा महाप्रभु अहुरमज्दच्या विविध परमशक्तींचें दिव्य प्रतीक होत. वैदिक मार्गेत ते दिव्य विबुध असून अमेश स्पेंता म्हणजे झोरोष्टर धर्मात त्याना पवित्र व अमर मज्दविभूति म्हणण्यात येते. याची सख्या एकंदर सात असून त्याची नावें १) अहुरमज्द २) वोहुमनो ३) अश वहिश्त ४) क्षत्र वइर्य ५) आरमइति हउर्वतात् व अमेरेतात् ही अशी आहेत.

या सर्वांना मिळून अमेश स्पेंता असें सर्वसाधारण नाव आहे पण व्यवहारात अहुरमझ्दला सोडून त्याची संख्या फक्त सहाच मानण्यात येते या सहा दिव्य विभूति म्हणजे त्या जगज्जनक जगच्चालक, जगन्नायाक व सर्वसमर्थ महाप्रभु अहुरमझ्दच्या परमशक्तीची निरानिराळीं सहा रूपेंच होत

या महाविभूतींना मझ्दप्रभूनेंच निर्माण केलें त्याच्या सूचनेप्रमाणे ते वागत असतात हे अमेश स्पेंत नित्य व अमर असून, त्याची जगावर हुकमी सत्ता चालते त्यांचें निवासस्थान गरोन्मन या सर्वोच्च स्वर्गलोकात असून तेथेंच मझ्दप्रभूहि राहतो त्याची बसावयाची आसनें सुवर्णाची असून त्याची शरीरकांति सूर्याप्रमाणें तेजःपुंज आहे डोळे अत्यंत तीक्ष्ण व चमकदार असून, त्याना दृश्य व अदृश्य, — सूक्ष्म व स्थूल — सृष्टीतील सर्व वस्तुजातांचें व जीवजातांचें सर्व कांहीं दिसतें ते महा वीर्यवान, पराक्रमशाली, सर्वज्ञ व सर्वसमर्थ मझ्दसृष्टीला सरूप करणारे, त्यावर सत्ता चालविणारे, पाळत ठेवणारे, त्याना राखणारे व त्यांचें संरक्षण करणारे असे मझ्दप्रभूचे ते पवित्र व प्रभावी विश्वस्त आहेत

हे स्वर्गात एकत्र राहून एकत्र मिळून सहविचार करतात त्यांचीं मनें एक आहेत विचार एक, वाणी एक व कृतीहि पण एकत्र आहे अर्थात् ते केव्हाहि एकोप्यानेंच वागतात व एकमेक .ी सहकार्य करतात त्याच्यात केव्हाहि वितुष्ट अगर विरोध येत नाहीं ते स्वर्गातून खालीं उतरून पृथ्वीवर येतात व तेथें दक्षतेनें निरीक्षण व परीक्षण करून आपली हुकमत चालवितात ते दुष्टाना दंड करणारे व सुष्टाचें पालन करणारे असे न्यायशाली व सन्मानदर्शक परमथोर विभूति आहेत

जगाला पापवृत्तीकडे — अनीतिमार्गाकडे प्रवृत्त करणारे — फुसलावून नेणारे असे जे दुष्ट अहिरमन व त्याचे साथीदार अकोमन व द्रुज इत्यादि

दुष्ट प्रभावळ आहे, त्याचें परिपत्य करून, मज्दभक्ताचें संरक्षण करण्यास ते पूर्ण समर्थ व सदैव दक्ष असतात. त्याचा पराभव करण्यास कोणीच समर्थ नाहीं. ते परम दयाळु व अत्यंत उदार असून मज्दभक्तावर त्याची पूर्ण कृपादृष्टि असते. म्हणून मज्दभक्त आपल्या घरी येऊन, हविर्भाग स्वीकारण्यास त्याना मोठ्या प्रेमाने व भावभक्तीने आळवितात.

मज्दप्रभूनें महर्षि झोरोष्टरास त्याना यज्ञात आव्हान करून, हविर्भाग अर्पण करण्यास प्रथम उपदेशिलें म्हणून त्याप्रमाणें त्यानें केलें. त्याना श्रद्धापूर्वक भावभक्तीनें यज्ञात आव्हान करणारा असा अवस्तोपासक जगातला तोच पहिला मज्दभक्त आहे. पुढें त्याचें अनुकरण करून तेव्हा-पासून झोरोष्टरपंथी अनुयायी त्याना मोठ्या भक्तीनें आव्हान करून, यज्ञात हविर्भाग अर्पण करून आपलें संरक्षण व कल्याण करण्यास मनोभावें प्रार्थना करतात. इतकेंच नव्हे, तर त्याच्या कृपाप्रसादानें उत्तेजित होऊन ते भक्त आपलें सर्व आयुष्य व संपत्ति त्याच्या प्रीत्यर्थ अर्पण करण्यास सदैव दक्ष असतात त्याची ती निःसीम सेवा व त्याग पाहून परम संतुष्ट होत्साते ते त्या भक्ताना त्याचे मनोरथ पूर्ण करून त्याना सुखी, संतुष्ट, व कृतकृत्य करण्यास कदापि चुकत नाहींत. याप्रमाणें या अमेशा स्पेंताचें असें थोडक्यात वर्णन आहे.

यानंतर मज्दप्रभूचें विश्वचक्र सुरळीत, सुसूत्र, सुसंगत, सुरक्षित व सुव्यवस्थित चालण्यास या अमेशा स्पेंताचें विविध स्वरुप, त्याचें कार्य, त्याचा अधिकार, व त्याची सत्ता काय व कशी आहेत याचें क्रमशः संक्षेपाने चित्रण करीत जातो.

## मज्दप्रभूचें दिव्य प्रतिनिधीमंडळ

**१) वोहुमनो :–** निराकार अशा सूक्ष्म प्रकाश तत्वातून अहुरमज्द हा सगुण रूपानें प्रगट झाल्यावर जड सृष्टि उत्पन्न करावयाच्या आधीं

आपल्या भावी कार्यात मदतनीस म्हणून विशिष्ट गुणधर्मांच्या व अधिकाराच्या काही दिव्य शक्ति निर्माण करून त्याना भावी जगाचें सरक्षण, सपोषण व सवर्धन करण्याच्या कामी अध्यक्षाच्या जागीं अधिकृत प्रतिनिधि म्हणून नेमण्यात आलें त्यात वोहुमनो हा पहिला व प्रमुख असा त्या मझ्द प्रभूचा प्रतिनिधी आहे त्याचें स्थान त्या जगन्नायकाच्या शेजारी असून तो सर्वांत थोर आहे

हा वोहुमनो शुद्ध सात्त्विक बुद्धीचा-अर्थात् शिवसकल्पाचा अधिदेव असून, मझ्दमन्त्रिमडळाचा तो प्रमुख मन्त्री आहे तो सद्बुद्धीचा सत्यज्ञानाचा जनक व प्रदाता असुन, मानवाच्या ससारतप्त मनाला शाति देणारा व सज्जनाचें दु ख हरण करणारा व तसाच मोठा धैर्यशाली सामर्थ्य सपन्न व अत्यत उदारधी असा मझ्दप्रतिनिधि आहे तो मोठा तेजस्वी, सुदर व मोहक असून अगावर झगझगीत अशीं शुभ्र वस्त्रें धारण करतो त्यातल्या त्यात सफेत कुस्ती हें त्याचें विशेष आवडीचें वस्त्र आहे

पहिला मानव दपतीचा मुलगा जो सियामक त्यास मझ्दप्रभूचा धर्मोपदेश करणाऱ्यापैकीं तोहि एक आहे तिश्त्र्य या पर्जन्य देवतेशीं पृथ्वीवर पाऊस पाडण्याच्या कामीं तो सहकार्य करतो सत्प्रवृत्त मनुष्याला सत्कार्य करावयाच्या कामी त्याचे सदोदित प्रोत्साहन व मदत असते शिवाय मनुष्याच्या बऱ्यावाईट कृत्याची नोंद ठेवण्याची कामगिरी त्याचकडेच आहे अर्थात् वैदिकाच्या चित्रगुप्ताचें काम करणारा तो प्रमुख अधिकारी आहे म्हणजे पृथ्वीवर जन्मलेल्या प्रत्येक मनुष्याचीं बरीं वाईट कृत्यें दिवसातून तीन वेळा टिपून ठेवण्याची कामगिरी त्याच्यावरच सोपविण्यात आली आहे मनुष्य मेल्यावर पुढें चौथ्या दिवशीं जेव्हा तो परलोकास जाण्यासाठीं म्हणून चिनवत पुलाजवळ येतो, तेव्हा तेथें त्याच्या हयातीतील कृतकर्माचा आढावा घेण्यासाठीं तो तेथें हजर राहतो

इह–पर लोकास जोडणाऱ्या चिनवत पुलाजवळ आल्यावर मनुष्याचा कृतकर्मांचा आढावा घेतल्यावर जे त्यात पुण्यवान ठरतात, ते तो पूल ओलांडून स्वर्गाच्या प्रवेशद्वाराजवळ आले म्हणजे त्याना तेथें सामोरा जाऊन त्याचें प्रेमानें स्वागत करून त्याना पुढें घेऊन जाणारा अधिकारीहि तोच आहे. स्वर्गांत गेल्यावर तेथें पुण्यात्म्याना रहावयास योग्य स्थान तोच पाहून देतो. जे लोक या लोकीं पुण्यकृत्यें करतात, इतरास करावयास लावतात व त्यास मदत करतात, त्याना तो उत्तम बक्षीस देतो जे भक्त अहुरमझ्दचें दर्शन घेऊ इच्छितात, त्याना त्या प्रभूचें मंगल दर्शन या व्होहुमनो मार्फतच घडून येतें

तो स्वतः रूपरहित असला तरी केव्हा केव्हा मानवरूप धारण करून मझ्दभक्ताना तो दर्शन देत असतो. उदाहरणार्थ अहुरमझ्दनें महर्षि झोरोष्टरास जाऊन भेटून त्यास स्वर्गात आपल्यासमोर घेऊन येण्यास सांगितलें तेव्हा मनुष्याचें सुंदर व तेजस्वी रूप धारण करून त्यानें त्यास दाईती नदीवर जाऊन भेट दिली. व त्यास आपल्याबरोबर स्वर्गांत घेऊन जाऊन तेथें मझ्दप्रभूची भेट करविली अर्थात् मनुष्याला सुज्ञान द्वारा मझ्दप्रभूचें मंगल दर्शन घडविणारा व्होहुमन हाच आहे या शिवाय त्याच्याकडे आणखी एक महत्वाची कामगिरी सोपविण्यात आली आहे ती म्हणजे जगात मझ्दप्रभूनें निर्मिलेली जी पशुसृष्टि आहे, तिचें योग्य प्रकारें पालन, पोषण व संवर्धन करणें हें होय अर्थात् मानवाला उपयुक्त अशा पशुसृष्टीचा पालनपोषण करणारा तो मुख्य अधिकारी आहे ही पशु-सृष्टी म्हणजे इहलोकातील त्या वोहुमनोचे एकाअर्थी प्रत्यक्ष प्रतीकच म्हटलें तरी चालेल म्हणून जे मझ्दपंथी आहेत त्याना या पशूंचें अन्न–पाणी देऊन संरक्षण करण्याविषयीं व त्याची जुलूम जबरदस्ती, छळ व

हाल, दुःख व हिंसा यांतून सुटका करण्याविषयीं अत्यंत आग्रहाचा आदेश देण्यांत आला आहे. वोहुमनोची ही अशी हकीकत आहे.

(२) अशवहिस्त :— अहुरमझ्दनें वोहुमनोनंतर हें विश्वचक्र सुरळीत व सुव्यवस्थित चालविण्यासाठीं जो दुसरा एक सहाय्यकारी प्रतिनिधी म्हणून उत्पन्न केला, त्याला अशवहिस्त हें नांव आहे. येथील स्थूल व सूक्ष्म सृष्टीत जी व्यवस्था, नियमबद्धता, सुस्थिति, व शिस्त आहे, ती ठेवण्याचें, चालविण्याचें व राखण्याचें काम या अशवहिस्ताकडे आहे. अर्थात् मझ्दप्रभूनें आखून दिलेले सृष्टीचे जे सुमंगल व हितकारक शास्त्र नियम, त्यांचें संरक्षण व परिपालन करणारा प्रमुख प्रतिनिधि व अधिकारी म्हणजे हा अशवहिस्त होय. मझ्दनेंच यास निर्माण केले असून सद्धर्म, पुण्यगोष्टी व सुकृत इत्यादिकांचें योग्य संरक्षण करण्याची कामगिरी याच्यावर सोपविण्यांत आली आहे. मनुष्याला मझ्दप्रभूचा सुंदर व आनंदमय स्वर्ग प्राप्त व्हावयाचा तर तो अंतर्बाह्य शुचिर्भूत, पवित्र व निर्मल असावयास पाहिजे. आणि या गोष्टी प्राप्त व्हावयाच्या तर सद्विचार, सद्भाषण, व सत्कर्म या त्रयीवर अवलंबून आहेत असा सिद्धांत आहे.

अर्थात् सुकृत तथा पुण्य म्हणजे मानसिक शिवसंकल्प, सूनृतवाणी, शारीरिक परिशुद्धता व सत्कर्म यांचा समुच्चय होय. जो मनाने, वाचेने, व शरीराने परिशुद्ध म्हणजे पवित्र आहे तोच पुण्यवान पुरुष होय. आणि तोच मझ्दप्रभूच्या दिव्य स्वर्गात पदार्पण करण्यास योग्य व पात्र होतो. इतरास तो दरवाजा बंद आहे. म्हणून पावित्र्याला झोरोष्टर धर्मात अत्यंत महत्वाचें स्थान आहे. असा पुरुषच मझ्दप्रभूचें दर्शन घ्यावयास लायख होत असून त्यालाच अशवहिस्ताच्या मार्फत ती गोष्ट साध्य होते. म्हणून पुण्यवान लोक—सत्कर्मरत व सद्विचारनिष्ठ मझ्दभक्त आपल्यावर कृपादृष्टि

व्हावी म्हणून या अशवाहिस्ताची मनोभावे प्रार्थना करतात मझ्दप्रभूचे दर्शन करविणारा हा एक दिव्य प्रतिनिधि असून, मनुष्याचें प्रगट वा गुप्त पाप व पुण्य जाणणारा तोच आहे अर्थात अहुरमझ्दला मनुष्याच्या पापपुण्याचें जें ज्ञान होतें, तें या अशवहिताकरवींच होतें आणि पापी व पुण्यवताला जो अखेरचा निर्णय देण्यात येतो, तो याच्या मुखातरच देण्यात येतो

हा अशवहिस्त म्हणजे परमथोर, सर्वोत्तम, सर्वसुदर, तेज पुज व सर्वमगल असा मझ्दप्रभूचा दुसरा प्रतिनिधि आहे तो भक्ताना आरोग्य देणारा असून रोगराई याचा नाश करतो. तो अकाल व अपमृत्यु टाळणारा आहे त्याचप्रमाणें राक्षसपिशाच, मंत्रतत्र करणारे मात्रिक, जादुटोणा करणारे चेटके, मनुष्याना पापाकडे प्रवृत्त करणारे व परोपरीनें छळणारे दुज व दुर्जन आणि दश करणारे विषारी जीव इत्यादिकाचा सहारकर्ता आहे तसाच जे पुण्यवान व सदाचरणी आहेत, त्याचेसाठी स्वर्गाचा रस्ता सुगम व सुखावह करणारा तो मुख्यमत्री आहे म्हणून झोरोस्टरनें त्याची प्रशसा व प्रार्थना केली आहे (यस्त ३-२)

या अशवहिस्ताला प्रसन्न करून घ्यावयाचें झालें तर मनुष्यानें अवेस्ता ग्रथोपदिष्ट नियमाप्रमाणें वागावयास पाहिजे अर्थात कायावाचामनें पवित्र व निर्मल आणि सत्कर्मरत व परोपकारी असावयास पाहिजे तरच तो त्याच्या कृपाप्रसादास पात्र होतो व त्याच्याकरवी स्वर्गाचा दरवाजा उघडला जातो मनुष्याच्या आयुष्यक्रमात मागेपुढें केव्हातरी असा एक दिवस उगवतो की तेव्हा त्याची इहलोकयात्रा सपवून सर्वस्वास मुकावें लागतें त्यावेळीं घरदार, शेतवाडी, धनदौलत, बायकापोरे, आप्तइष्ट, स्नेहीसोबती इत्यादि सर्व जेथल्या तेथेंच राहून जातात सोबत कोणीच येत नाहींत देहसुद्धा येथल्या येथेच पडून राहतो फक्त जीव तेवढा

आपडा मागे राहतो बरोबर कोणीन नाहीं म्हटले तर त्याची बरीवाईट कर्में त्याच्याबरोबर येनात तीं तेवढीं तो बरोबर घेऊन जातो म्हणून मनुष्यानें जिवतपणी परलोक सुखाचा व्हावा एतदर्थ पुण्यकर्मांची जोड मिळविण्यास आळस अगर कसर करू नये. तोच पवित्र व पुण्यवान कीं जो सद्विचार व सत्कर्मरत आहे आणि तोच स्वर्गांचा मिरासदार आहे असो. अशवहिस्त हा स्वर्गांत राहतो तरी त्याचा प्रतिनिधि इहलोकात अग्नि–नारायण हा नेमण्यात आला आहे. असो.

३ ) क्षथवइर्य – हें जें दृश्य व अदृश्य असे विशाल विश्व आपल्या समोवती पसरलें आहे, त्यावर अधिसत्ता चालविणारी अशी जी मझ्दप्रभूची सर्वसमर्थ दिव्य शक्ति आहे, त्या अमोघ शक्तीचें प्रतिनिधित्व क्षथ्रवइर्य या दिव्य विभूतीकडे आहे. अर्थात क्षथ्रवइर्य हा मझ्दप्रभूचा तिसरा प्रतिनिधि असून, त्याच्या परमशक्तीचा–विश्वनियामक दिव्य साम–र्थ्याचा प्रमुख केंद्रस्थानी विराजमान झाला आहे. म्हणून मझ्द–भक्त त्याला शक्ति व सामर्थ्य देण्यास–सन्मार्ग दाखविणेस–पुण्य कार्यांत मदत करण्यास आव्हान करतात व त्याला भक्तिपूर्वक हविर्भाग देतात जो मनुष्य त्या जगन्नायकाचे कायदे पाळतो त्याला हा क्षथ्रवइर्य सामर्थ्यसपन्न व सत्ताधीश बनवितो हें त्याचें दिव्य व तात्विक स्वरूप झालें.

त्याचें पार्थिव स्वरूप सांगावयाचें म्हणजे सर्व धातूंचा व मौल्यवान सपत्तीचा तो स्वामी आहे अर्थात या पार्थिव विश्वाचें प्रतिपालन करणें ही कामगिरी त्याच्या पदरात टाकण्यात आली आहे हा मोठा उदार व दयाळु असून गरीबाकडे तो दयार्द्रदृष्टीनें पाहतो या गरीब मझ्दभक्तांना तो मदत करतो त्याना प्रभूत धनसपत्ति देऊन त्याना सपत्तिमान व लौकिक–वान बनवितो. याप्रमाणे तो पार्थिव जगाचा पूर्ण सत्ताधीश व महान अधिकारी आहे म्हणून मझ्दभक्त त्याची मनोभावे प्रार्थना करतात असो.

(४) आरमइति -- झोरोष्टर धर्मात आरमइति ही स्त्री देवता असून मझ्दप्रभूची ती लाडकी दुहिता आहे तिचें महत्त्व इतके श्रेष्ठ प्रतीचे आहे कीं सहाजणाचें जें दिव्य मन्त्रीमडळ आहे त्यात तिचाहि समावेश करण्यात आला आहे. गाथात तिला कोठें कोठें स्पेंता म्हणजे पवित्र असें विशेषण लावण्यात आलें असून, मझ्दची भक्ति, प्रेम व निष्ठा याचें ती मूर्तिमत प्रतीक आहे

झोरोष्टरला अहुरमझ्दचें जें पवित्र व दिव्य ज्ञान झालें, तें या आरमइतीच्या द्वारेंच झालें त्याने त्या परमेश्वराच्या उपासनेंत आपली अनन्य भक्ति, दृढ श्रद्धा, पवित्र अत करण व अमोल जीवित इत्याहि सर्वस्व ओतलें आणि वाहिलें--अर्थात् आत्मसमर्पण केलें--म्हणूनच जगात तो जगद्वद्य महर्षि झाला तसेंच श्रेष्ठ भगवद्भक्त व अलौकिक ज्ञानवीर ठरला त्याच्या भक्तींत व सेवेंत तो इतका गढून व रगून गेला होता कीं त्याला आपल्या जीवितसर्वस्वाचा जणु काहीं विसरच पडला होता म्हणूनच त्याला मझ्दप्रभूचें स्वर्गीय दर्शन झालें इतकेंच नव्हे तर त्याच्याशी प्रत्यक्ष सभाषण करण्याचें सद्भाग्य लाभलें स्पष्टच सागावयाचें म्हणजे मझ्दप्रभूशी त्याचा जवळ जवळ एक जीव--तादात्म्य झालें होतें

ही आरमइति मझ्दप्रभूचें पथ्यकर व हितप्रद यमानियम शिकविणारी अधिदेवता असून, त्याच्या साम्राज्याचें मृत्युलोकीं वर्धन करणारी एक महाशक्ति आहे जे कोणी तिची अनन्यभावें भक्ति करतात, ते अत -करणाने पवित्र व सोज्वळ होतात ती देवता त्याना ज्ञान व समृद्धि देऊन त्याची भरभराट करत आपणास सामर्थ्य देण्याविषयी लोक मझ्द--प्रार्थना तिच्यामार्फतच करतात महात्मा झोरोष्टर हा आपल्या अनुयायाना स्तुतिस्तोत्र गाऊन तिला आळविण्यास उपदेश करतो

ती या पृथ्वीची अधिदेवताहि आहे. म्हणून भूसेवा म्हणजे कृषि-कर्म हें ऐहिक जीवन सौकर्यास अत्यंत उपकारक व म्हणून अत्यंत उपयुक्त असा बोध करून आपल्या अनुयायांना शेतकरी बनण्याचा त्या महर्षींनें मुक्त कंठाने स्तुत्य उपदेश केला आहे. इतकेंच नव्हे तर फावल्या वेळी आपण स्वतः शेतकरी बनून जगाला धडा घालून दिला आहे. ही आरमइती म्हणजे ऋग्वेदांतील अरमति असून, तिचा अर्थ सायणाचार्य भूमि असाच देतात.

तसें पाहूं गेलें तर आपल्या ऋग्वेदांतहि कृषिकर्माचें सुंदर वर्णन असून, तें फार बोधप्रद आहे. म्हणून पारसीबांधवांना त्याचें थांवतें वर्णन एका ऋचेंत रंगविण्यांत आलें आहे, तें येथें उध्दृत करतो. हा उपदेश सूर्य-नारायणाने जुगाऱ्याला केला आहे, तो असाः-

**अक्षैर्मा दीव्य कृषिमित् कृपस्वविचे रमस्व बहुमन्यमानः।**
**तत्रगाव : कितव तत्र जाया तन्मेवि चष्टे सविता अयमर्थ ः॥**

( ऋ. १०-३४-१३ )

भावार्थ :- अरे जुगाऱ्या ! फाशांनी जुगार खेळून दुःखी कष्टी होऊं नकोस ! शेती कर ! म्हणजे त्यापासून तुला सुखसंपत्तीचा उपभोग घ्यावयास सांपडेल. त्या कृषिकर्मांत, काय सांगू तुला, बाबा दुभत्या गायी आहेत ! विलासप्रिय स्त्रीहि आहे. आणि तिच्या जोडीवर पुढें पुत्र-पौत्रादि कुलवर्धक संततीही येते. हें जीवनोत्कर्ष रहस्य सर्वज्ञानी अशा सवितादेवानें मला अनेक प्रकारें समजाऊन सांगितलें. याशिवाय आणखी कृषिकर्मावर अनेक मंत्र आहेत. पण त्यांचा उल्लेख ] येथें अप्रासंगिक होईल म्हणून तो देण्यांत येत नाहीं. वैदिक ऋषी हे सर्व शेतकरीच होते. मझ्दने पृथ्वी उत्पन्न करून तिच्या भूपृष्ठावर विशाल व सुपीक कुरणांची योजना करून पशुकोटींचें जीवन सुकर व सुखी केलें.

**हउर्वतात व अमेरेतात :—** हउर्वतात व अमेरेतात हे जोडपें अविभजनीय असें युग्म असून दोघांची उपासना व प्रार्थना एकत्रच करण्यात येते हउर्वतात म्हणजे परिपूर्णता व अमेरेतात म्हणजे अमरत्व इहलोकीं त्याचाच पर्याय अर्थ म्हणजे सामर्थ्य, आरोग्य व समाधान असा होतो. अर्थात सर्व प्रसगीं सहनशीलता हें त्याचें वैशिष्ट्य आहे आणि अमेरेतात म्हणजे पूर्णत्व व अमरत्व हे दोन्ही गुण मज्दप्रभु हा वोहुमनो व अशवहिस्त यांचें मार्फत उपासकाना अर्पण करतो येथें म्हणजे यालोकीं सहनशीलता व सामर्थ्य आणि परलोकीं पूर्णत्व व अमरत्व याची जोड मिळविण्यास वरील दोन अमेशस्पेंताची उपासना जरूर आहे व म्हणून यांची उपासना केल्यानें इहपरलोकीं सुख, शांति, पूर्णत्व व अमरत्व यागोष्टी साध्य होतात हा सागण्याचा भावार्थ

पार्थिव दृष्टीने पाणी हे हउर्वतात व उद्भिज्ज सृष्टी ही अमेरेतात याचे प्रांत आहेत अर्थात या दोन वस्तूवर यांची हुकमत चालते. आणि म्हणून यांच्या उपासनेने भक्ताना सपूर्ण आरोग्य व सामर्थ्य, परिपूर्णता व उत्कर्ष यांचा इहपरलोकीं लाभ होतो हउर्वतातच्या उपासनेने स्वच्छ, निर्मल, निर्दोष असें आरोग्यदायक उदक व अमेरेतातच्या उपासनेने जीवनोपयोगी धान्य व फलपुष्पादिकाची शक्ति व पुष्टिकारक समृद्धि यांची प्राप्ति होते. एतदर्थ इहपरकल्याणेच्छु साधकानें त्यांची भक्तिपूर्वक उपासना करावी असा झोरोष्टरी आदेश आहे.

आतापर्यंत ही जी मज्दप्रभूचीं दिव्य प्रतिनिधींची सर्वसाधारण रूपरेखा आखून दाखविण्यात आली तिचा थोडक्यात गोषवारा सांगावयाचा म्हणजे मनुष्य सृष्टि ही मज्दप्रभूची, पशुसृष्टि ही वोहुमनोची, अग्नि ही अशवहिस्ताची, धातुसृष्टिही क्षत्रवइर्योची, पृथिवी ही आरमइतेची, उदकसृष्टिही हउर्वतातची व उद्भिज्जसृष्टिही अमेरेतातची असून, त्यांचें रक्षण,

पोषण व वर्धन करणे ही त्याच्या कार्य क्षेत्रातील प्रमुख बाब आहे. याप्रमाणे या अमेशास्पेंताचे वर्णन आहे

# यझतसृष्टि

## दिव्य–विबुध–मंडळ

झोरोष्टरी धर्मांत पूजनीय व वंदनीय अशी चार प्रकारची दिव्य सृष्टि आहे, ती येणें प्रमाणें – (१) अहुर मझ्द (२) अमेश स्पंद (३) यझत (४) फ्रवशी या सर्वांची गणना दिव्य सृष्टींतच होते. तरी पहिल्यापेक्षा दुसरी, तिच्यापेक्षा तिसरी आणि तिच्यापेक्षा चौथी अशा क्रमानें त्याच्या अधिकारात फरक असतो सर्वांत पहिला म्हणजे अहुर मझ्द हा होय हा अत्यंत श्रेष्ठ, अत्यंत थोर महाज्ञानी व अत्यंत समर्थ असा आहे त्याहून श्रेष्ठ व थोर कोणीच नाहीं अहुर ( स असुर ) म्हणजे बलवान–सर्वसमर्थ व मझ्द ( स मेधा ) बुद्धिमान–महाज्ञानी अर्थात् जगाचा सर्वज्ञ व सर्व समर्थ असा परमेश्वर असा त्याचा अर्थ आहे

वैदिक धर्मांत ब्रम्हदेवाचा अगर प्रजापतीचा जो दर्जा आहे, तोच झोरोष्टर धर्मांत अहुर मझ्दचा आहे 'ब्रम्हवा इदमग्र आस' किंवा 'प्रजापतिर्वा इदमग्र आस' या वेदवचनाचाच अवेस्ताग्रथाचा अनुवाद आहे. 'स इद सर्वमसृजत – त्यानेंच हें सर्व विश्व निर्माण केलें आहे– हाच भावार्थ यश्न ३१–७ या वचनात गर्भित झाला आहे. याचा तात्पर्य असा कीं, तो मझ्द प्रभूच या सर्व विश्वाचा निर्माण कर्ता, त्याचा स्वामी व त्याचा अध्यक्ष असून त्याच्या सत्तेखाली व अध्यक्षतेखालींच हें विश्वचक्र सुयून, सुरळीत सुव्यवस्थित चाललें आहे, म्हणजे जगाची उत्पत्ति, स्थिति व लय याचा कर्ता तोच एक असून, हा सर्व विश्वपसारा त्याचाच खेळ होय

या मझ्दप्रभूच्या खालोखाल व त्याच्याच सत्तेखालीं या विश्वावर निरनिराळा अधिकार – हुक्मत – चालविणारे असे वोहुमनो, अशावहिस्त इत्यादि सहा प्रमुख प्रतिनिधी व मंत्री, यांचा दिव्य कोटींतच दुसऱ्या वर्गांत समावेश होतो अहुरमझ्दला या विश्वाचा कारभार नीट व व्यवस्थित सुसूत्र व सुरळीत चालविण्याच्या कामीं मदत करणारे त्याचे प्रतिनिधि म्हणा अगर मंत्री म्हणा, त्यांची नेमणूक झाली आहे त्यांच्यामार्फत तो महाप्रभू जगाची सर्व सूत्रें यथायोग्य हलवीत असतो या प्रतिनिधिमंडळाला अमेशास्पेंत असें नाव असून, त्यांचेकडे पृथ्वी, आप, अग्नि, पशु, धातु व उद्भिज इत्यादी विश्वाची सहा मुख्य खातीं सोपविण्यात आली आहेत अर्थात् त्या त्या खात्याचा कारभार हें दिव्य प्रधानमंडळ मझ्दप्रभूच्या सल्ल्यानें व त्याच्या इतर मंत्र्यांच्या सहविचारानें व सहकार्यानें स्वत च्या देखरेखीखाली चालवीत असतें हे सर्व प्रतिनिधी वस्तुत रूपरहित असले तरी प्रसंगोपात रूप धारण करून मनुष्याला वेळोवेळीं योग्य मार्गदर्शन व सहाय्य करीत असतात

या नंतर तिसरा वर्ग म्हणजे यझत् यांचा होय यझत् हा शब्द संस्कृत यजत् शब्दाचा अपभ्रंश असून त्याचा अर्थ 'पूजनीय विभूति' असा होतो झोरोस्टर धर्मांत अहुर मझ्दचे अमेशास्पेंत हें मुख्य मंत्री असून त्या सर्वांना मदत करण्यासाठीं ही 'यझत्' सृष्टी आहे अर्थात् यझत् हे उपमंत्री होत हेंच वैदिक भाषेंत सांगावयाचें म्हणजे अग्नि, वरुण, वायु, मित्र, आप, पृथ्वी इत्यादिकांसारखीच ती दैवतसृष्टी आहे झोरोस्टर धर्मांत या सृष्टींत मिथ्र, आतर, आर्द्विसूर अनाहित, सवोश हओम, व्हरेक्षत, तिश्त्र्य, माह, रश्नु, रशिस्त आदि वगैरे, इत्यादि दिव्य विबुधांचा समावेश होतो हे सर्व वैदिक देवतांच पण भारतीय अवतारच म्हटलें तरी चालेल यांचा खुलासा आम्ही त्या त्या यझतांच्या वर्णनांत केला आहे. असो

मनुष्याला मझ्दप्रभूचें प्रथम ज्ञान करून दिलें, तें या यझतानींच मनुष्याचा आदि पुरुष जो गयोमर्द त्याला यझताकडूनच मझ्दचें ज्ञान झालें पुन्हा त्यानींच मश्य व मशियानी यानाहि त्याची ओळख करून दिली असें दिनकर्दमधें सागण्यात आलें आहे ( ७–२–३ ) या यझताची सख्या शेकड्यानीं — किंबहुना हजारानीं — सुद्धा मोजता येण्यासारखी आहे तथापि त्यात प्रमुख व उल्लेखनीय यझत् हे फक्त चाळीसच आहेत. मझ्द प्रभूसुद्धा यझतातच मोडतो. वेदात निरनिराळया देवाचे निरनिराळे लोक आहेत ब्रम्हदेवाचा सत्यलोक, इंद्रादी देवाचा स्वर्गलोक, पितराचा पितृ अगर यमलोक अशी व्यवस्था आहे पण तसें झोरोष्टर धर्मात नाहीं तेथें फक्त गरोन्मन हा एकच लोक असून तो अल्बुर्झ पर्वतावर आहे. असो

ही जी यझत् सृष्टि आहे, ती दोन भागात विभागली गेली आहे. एक पुरुष सृष्टि व दुसरी स्त्री सृष्टि. त्यात काहीं पर्शुभारतीय आहेत व काहीं फक्त इराणीच आहेत. पर्शुभारतीय यझताची नावें पुढीलप्रमाणें आहेत — मिथ्र (मित्र, ) अइर्यमन (अर्यमा), हओम (सोम), वेरेथ्रघ्न (वृत्रघ्न म्हणजे इंद्र), पॅरेंडि (पुरन्धि), रत (ऋत) नइर्योसंघ (नाराशंस), अपान्-नपात् (अपान्-नपात्), उषह, (उषा), माह (चंद्र), वायु (वायु), इत्यादि आणि इराणी यझताची नावें अशी — आतर, अर्द्वीसूर, अनहित, मावोंगह, तिश्त्र्य, द्रुव्हस्प, सवोश, रश्नु, रमन्, चिस्ती, इरेथे, रसतत्, अशी व्हघूहि, अर्शत् अस्मन्, झम्, माशपैता, दम इश, अनघ्र-रओचह वगैरे वगैरे

यझतामध्यें पुरुष व स्त्री असें भेद आहेत. पण त्याच्यात कसल्याच प्रकारचा उच्च-नीच भेदभाव नाहीं. सर्वांचा दर्जा सारखाच आहे व त्याचे स्थानही एकच आहे. त्याचप्रमाणें दोघाची उपासनाही सारखीच पुढील

यझताचा स्त्री वर्गामध्यें समावेश होतो (१) उषा (२) झम (३) अर्दवी, सूर अनहित (४) दव्हस्प (५) दयेना (६) चिस्ती (७) अर्यताट् (८) इरेथे (९) रसस्तत् (१०) अशी वधूहि (११) पारेंडि (१२) रत बाकीचे सर्व पुरुष यझतातच मोडतात

अमेश स्पेंताप्रमाणें हे यझत झाले तरी वस्तुत रूपरहित असून विचाराचे अथवा गुणाचे किंवा निसर्गातील स्थूल वस्तुमात्राचे ते स्थूल प्रतिनिधि आहेत त्यात निसर्ग देवतामध्यें मोडणारे यझत् म्हणजे वेरेय्रघ्न मिथ्र, मावोंघ,अर्दवीसूर, आतर वायु हे अनुक्रमें सूर्य, तेज,चद्र, उदक, अग्नि, वायु या महाभूताचे अधिदैवत व अध्यक्ष आहेत केव्हा केव्हा या त्याच्या नावापासून त्या त्या देवतेचा व केव्हा केव्हा त्या त्या महाभूताचा बोध होतो अनेकवेळा त्या त्या प्रातिनिधिक देवतेपेक्षा सूर्य,चद्र, उदक अग्नि,वायु इत्यादी भूतमात्रानाउद्देशूनच होमहवन अर्पण करण्यात येते.

वैदिक धर्मात अशाचे प्रथा आहे एकाच नावावर केव्हा देवता व केव्हा द्रव्य याना उद्देशून स्तोत्र गाण्यात येतें उदाहरणार्थ–सरस्वती ही विद्यादेवताही आहे व उदक तथा नदी देवताही आहे ती ऋचाच येथें देतों म्हणजे झालें

'पावका न सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।
यज्ञ वष्टु धियावसु ॥१०॥
चोदयित्री सुनृतानां चेतन्ती सुमतानाम् ।
यज्ञं दधे सरस्वती ॥११॥
महो अर्ण सरस्वती प्र चेतयति केतुना ।
धियो विश्वा वि राजति ॥१२॥
[ऋ १–३–१० ते १२]

भावार्थ – उपासकाना पावन करणारी, हविरत्नानें सुसमृद्ध असलेली, बुद्धिवैभवानें नटलेली अशी ही सरस्वती देवी आमचा हा यज्ञ देवाप्रत नेऊन पोचवो ! ॥१०॥ सत्य भाषणाला प्रेरणा करणारी, व सद्बुद्धीला चेतना देणारी अशी ही सरस्वती, ती या आमच्या यज्ञाचा स्वीकार करती झाली ॥११॥ ही सरस्वती प्रवाह रूपानें प्रभूत जल देणारी आहे आणि देवता रूपानें सर्व बुद्धिमत्तेची आधिष्ठात्री व प्रकाश देणारीहि तीच आहे ॥१२॥

हा मंत्र देवता व नदी दोघानाहि उद्देशून आहे 'चोदयित्री सूनृताना' व चेतन्ति सुमताना' हे शब्द सरस्वती देवतेला व महोअर्ण' हे शब्द सरस्वती नदीला उद्देशून आहेत 'नदीतमे' असेहि तिला इतरत्र म्हटले आहे (२–४१–१६) त्याचप्रमाणें सोमाचे उदाहरणहि देता येईल असो

सागावयाचा तात्पर्यार्थ हा कीं झोरोष्टर धर्मात काय किंवा वैदिक धर्मांत काय, काही मंत्र देवतेला उद्देशून व काही मंत्र वस्तूला उद्देशून आहेत दोन्ही धर्म जवळजवळ समांतरानें चालणारे आहेत हें सूज्ञ वाचकाना सहज पटण्यासारखें आहे.

सर्वसाधारपणें प्रत्येक यज्ञताचें त्याच्या त्याच्या नावानें हाक मारून त्याला हविर्भाग अर्पण करण्यात येतो वैदिक धर्मांतहि अशीच पद्धत आहे उदाहरणार्थ, इद्राला हविर्भाग द्यावयाचा झाला तर 'इद इद्राय, नमम' असें म्हणून इद्राला हवि अर्पण करतात पण केव्हा केव्हा त्याच्या जोडीला त्याच्याशीं सहकार्य व साहचर्य करणाऱ्या इतर एक अगर अनेक यज्ञतानाहि बोलावण्याचा परिपाठ आहे आणि केव्हा केव्हा सर्वयज्ञताना मिळूनच 'विस्पे यज्ञत्' [स, विश्वेदेव] या नावानें पाचारण करण्यात

येतें शिवाय काहीं काहीं यझतांचें युग्म ठरलेलें असून पूजाप्रसगीं त्याना त्या युग्माच्या नावानेंच होम हवन करण्यात येतें असे यझत् म्हणजे 'अहुर-मिथ्र' मिथ्र-रश्नु' 'रमन-वायु' 'दएन-चिस्ती, इत्यादि होत

यझतामध्यें मइन्यव म्हणजे दिव्य यझत् आणि 'गएथ्य' पार्थिव यझत् असे दोन वर्ग असून त्याचीं त्याचीं कर्तव्य क्षेत्रें निरनिराळीं आहेत दिव्य यझतामध्यें पुढील प्रमाणें वर्गवारी करण्यात आली आहे ती अशी —

## दिव्य यझत्

| खातें | नाव |
|---|---|
| [१] दिव्यज्ञान— | दयना, चिस्ती स्रओश |
| [२] न्याय— | मिथ्र, रश्नु, आर्शताद व एरेथ |
| [३] जय— | वेरेथ्रघ्न |
| ]४] सुख— | राम |
| [५] दान— | रत |
| [६] शांति— | अक्षस्ति |
| [७] मत्र— | माथ्रास्पेंता, दहम-अफ्रिति, व दामि-उपमन |
| [८] आरोग्य— | ऐर्यमन्, हओम (सोम) |
| [९] सपत्ति— | अशीवधुहि पारेंडि (पुरन्धि). |
| [१०] पशु— | द्रवास्प, गेउश्, उर्व्हन्. |

## पार्थिव यझत्

| खातें | नाव |
|---|---|
| [११] प्रकाश— | व्हरेक्षएत्, मावोंघद, उगह इ, |
| [१२] वायु— | वायु |
| [१३] अग्नि— | आतर, नइर्योसंघ |

[१४] उदक- आर्दविसूर अनाहित, अहुरनि, अपाम् नपान् -
[१५] पृथ्वी- झाम्.
हे पंचभूतात्मक यझत् होत.

यझत् हे परमपवित्र, समर्थ, तेजस्वी व उदार असून प्रत्येकाचें कार्य-क्षेत्र निरनिराळें आहे. ते स्वर्गांत राहतात. आणि पृथ्वीवर देखरेख करतात. मनुष्याना ससारात या यझताकडून विविध प्रकारची मदत होते यज्ञद्वारा त्याचें पूजन करून त्याना प्रसन्न केल्यावर उलट तेहि त्या भक्तावर अनुग्रह करण्यास चुकत नाहींत. त्याना ते इच्छित वरदान करतात. 'देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तुव ' ही गीतेची व 'देहि मे ददामिते ' ही वेदाची जशी शिकवण तशीच झोरोष्टर धर्माचीहि आहे हें इतकें विवेचन यझतासबधीं झालें, तें पुरेसें आहे आता काहीं मुख्य यझताचें थोडक्यात वर्णन करीत जातों.

## पशुभारताय यझत्

(१) मिथ्रः-यझत् सृष्टीमध्यें मिथ्र हा पशुभारतीय यझतात मोडत असून तो सर्व यझतात प्रमुख व श्रेष्ठ असा आहे मझ्दप्रभूचा तो प्रथम जन्मलेला मुलगा होय मिथ्र हा सर्व यझतात अत्यत वीर्यवान्, अत्यत बलवान, अत्यत निद्र व अत्यत निरलस असा महाप्रभावशाली यझत असून, मझ्द इत-काच त्यालाहि यझतसृष्टींत मान व गौरव आहे. या विश्वावर जितके म्हणून यझत सत्ता चालवीत आहेत,त्या सर्वांत हा मिथ्र अत्यत सामर्थ्यवान, मोठा कणखर, कर्तव्यदक्ष असा असून तसाच तो शीघ्रगति व उदग्र विजयशाली आहे. त्याचप्रमाणें तो विश्वव्यापी,विश्ववेत्ता व विश्वद्रष्टा असून शिवाय कलक-रहित व सन्मार्ग दर्शक आहे. मझ्दप्रभूनें निर्माण केलेलें जग सर्वांना दिसावें त्याला निर्माण करण्यात आलें.

त्याचें शरीर चंद्राप्रमाणें सुकांतिमान असून त्याचें मुख नक्षत्राप्रमाणें सुंदर व मनोहर आहे. त्याला शभर कान व हजार डोळे आहेत. तो सतत भ्रमण करीत असून अखंड नि उदंड जागरूक असतो तो पृथ्वीवर पाऊस पाडतो व वनस्पतींचें संवर्धन करतो. तो प्राणिमात्रांना चैतन्य, उत्साह, कांति पावित्र्य, सुख, आरोग्य, आयुष्य व संतति देणारा आहे. तो सर्व दुयाधन मार्गदर्शक आहे. राक्षसांना ठार मारणारा व रोगराई नष्ट करणाराहि तोच आहे, वर्षांचा सातवा महिना व महिन्यातील सोळावा दिवस हा त्याला वाहिलेला आहे.

तो मस्तकावर त्याचें चकचकीत शुभ्र किरीट व अंगात सोन्याचा पिवळसर झगझगीत झगा धारण करतो. त्याच्या दिव्य रथाला सोन्याचीं चाकें असून तो नक्षत्रानीं मढवून काढला आहे त्यात बसून तो दररोज पृथ्वीवर देखरेख करीत फेरफटका करीत फिरत असतो. त्याच्या रथाला पांढरे शुभ्र अंध चार उमदे घोडे जोडलेले असून ते नित्य अमृतपान करीत असतात ( यश्त १०–११२ ) हा मिथ्राचा रथ इतका तेज पुंज आहे कीं, तो दृष्टीस पडताच राक्षसाग्रणी अग्रमइन्यू व त्याची दुष्ट हुज व राक्षसचमू भयभीत होऊन सैरावैरा धावत सुटली दहाव्या यश्तमधील गाथा मिथ्राची अत्यंत सुंदर व मोठी उद्बोधक असून तशीच ती काव्यमयहि आहे.

तो प्रकाशाचा अधिदैवत असून, दररोज ता पूर्वेकडे अलबुर्झ पर्वत शिखरावर उदय पावतो मझ्दप्रभूनें त्याच्यासाठीं 'हर बेरे झइति' या पर्वत शिखरावर एक फार मोठें प्रशस्त असें निवासस्थान बांधून दिलें आहे हें पर्वत शिखर इतकें मजेदार व विलक्षण आहे कीं, तेथें रात्र नाहीं व अंधार नाहीं, कडक थंडी नाहीं व अत्युष्ण उन्हाळा नाहीं, तेथें रोग नाहीं व भय नाहीं, दुःख नाहीं व शोक नाहा, दैन्य नाहीं व दारिद्य नाहीं, वियोग नाहीं

च विनाश नाहीं असें हें वैदिकाच्या स्वर्गाप्रमाणें आनंदोल्हासमय अल्बुझ पर्वत शिखर आहे ( यस्न, १०, ४५-५१ ). अशा शांत ठिकाणीं या मिथ्राचा भव्य, दिव्य व विशाल वाडा उठला आहे मिथ्र हा विशाल व सुपीक कुरणाचा स्वामी आहे

या मिथ्राचा सागण्यासारखा एक मोठा गुण असा आहे कीं, तो केव्हांहि व कधींहि झोपी जात नाहीं. 'न वै देवाः स्वपन्ति' या वेदवचनाप्रमाणें झोरोष्टरी मिथ्राचें हें प्रशंसनीय आचरण आहे. तो उदङ जागृत राहून वैदिकाच्या मित्रावरुणाप्रमाणें मनुष्याच्या बऱ्यावाईट कृत्यावर सक्त पाळत ठेवीत असतो. त्याच्या नजरेतून काहींच सुटत नाहीं. त्याला हजार कान व दहाहजार डोळे आहेत अर्थात तो सहस्राक्ष आहे अधकाराचा नाश, पापाचें निरसन व दुष्टाचा संहार करण्यात तो सदैव दक्ष व तत्पर असतो. त्याच्या दृष्टिपथातून चोरून अगर चुकून काहींच रहात नाहीं. त्याचे किरणरूप हजारो दूत असून ते सर्व जगावर सारखी पाळत ठेवीत असतात.

या मिथ्राला असत्य भाषण व गैर वर्तन याचें अत्यंत वावडें असून तें त्याला मुळींच खपण्यासारखें नाहीं. अर्थात् असत्याचा तो कट्टा दुष्मन आहे. जो असत्य भाषणी व अपमार्गी आहे, तो या मिथ्रला गुन्हेगार वाटत असून अशा अपराध्याची तो केव्हांहीं गय करीत नाहीं. जो असत्य बोलतो अगर त्याचा कैवार घेतो मग तो गृहपति असो, कुलपति असो, ग्रामपति असो वा राष्ट्रपति असो— तो त्याच्या रोषास व शिक्षेस पात्र झाल्याशिवाय रहात नाहीं त्यास शासन झालेंच म्हणून समजावें.

मिथ्र हा लढाईचा अधिपति आहे. जे त्याची अतःकरणपूर्वक भक्ति व त्याला हविर्भाग देतात, त्या भक्ताचा लढाईत कैवार घेऊन

त्याच्या शत्रूचा तो पार धुव्वा उडवितो तो शत्रुसैन्याला आवेशानें धडक मारून त्याच्यात घबराट व गोंधळ उत्पन्न करून त्याची दाणादाण उडवून देतो त्या रणधुमाळीत शत्रूचे डोळे अंध करून टाकतो कान बधिर व हात लुळे करून दगलोंनि त्याची हड्डी नरम करून सोडतो असा महा-पराक्रमी हा मिथ्र आहे (यश्न १०-४८)

त्याचे जे उपासक आहेत ते त्याला भक्तिपूर्वक हवन द्रव्ये अर्पण करून त्याला आपल्या यज्ञात येऊन आपली प्रार्थना ऐकून घेण्यास मोठ्या कळकळीनें आर्जव करतात आणि आपण अर्पण केलेला हविर्भाग स्वीकारून तो स्वर्गात आपल्या खात्यावर जमा करून ठेवण्यास त्यास विनती करतात प्रत्यक्ष अहुर मझ्द हा देखील त्याला यजनद्वारा हवि अर्पण करून झोरो-ष्टरासहि त्याप्रमाणें करण्यास सुचवितो त्याला उद्देशून केलेल्या यज्ञात हवि, सोम, पशु व पक्षी इत्यादि अर्पण करण्यात येतात

मिथ्राची प्रार्थना - मझ्द प्रभूचे भक्तजन आपणास संसारात मदत करण्यासाठीं, स्वातन्त्र्य देण्यासाठीं रोग बरे करण्यासाठीं विजय मिळवून देण्यासाठीं, आरोग्य देण्यासाठीं, आनंद देण्यासाठीं पावित्र्य देण्यासाठीं त्याची प्रार्थना करतात, आपलीं कुरणें सुपीक करण्यासाठीं, आपल्या वीरांना लढाईत विजय मिळवून देण्यासाठीं त्याला आळवितात

[२] **हओम** - अवेस्तातील हओम म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून ऋग्वेदातील प्रत्यक्ष सोमच होय हा पर्शु भारतीय असून झोरोष्टर धर्मांत यज्ञतामध्यें ह्ओधाच्या खालोखाल या हओमाचाच क्रमांक लागतो यज्ञत सृष्टींतला पहिला हराणी यज्ञत म्हणजे ह्ओघ हा असून याच्यानंतर महत्वाच्या दृष्टीनें या हओमाचेंच स्थान लागतें हओम उर्फ सोम ही एक सर्वोत्तम व सर्वश्रेष्ठ वल्ली असून ती दिव्य विबुधांना फार प्रिय आहे तिचा

रस त्यांना फार आवडतो. दगडानें कुटून अगर वाटून तिचा रस काढून, 'ग्रावाभिः सुतम्' ऋ. ३-४२-२ तो अवेस्तांतील देवताना अर्पण केल्यावर त्याचें पान करण्यांत येतें. या हओमपानाचें महत्व वेदांतल्या इतकेंच श्रेष्ठ व पवित्र आहे.

अवेस्तांत काय अगर वेदांत काय या सोमाचें वर्णन कोठें देवता म्हणून तर कोठें दिव्य वल्ली म्हणून करण्यांत आलें असून त्याचा उल्लेख अवेस्तामधील यस्नच्या ९, १० व ५७ व्या सूक्तांत व यस्तच्या एका सूक्तांत आणि ऋग्वेदांत ९ व्या मंडळांत सविस्तर पहावयास सांपडतो. ऋग्वेदांतील सोमाचें वर्णन स्पष्ट, सुटसुटीत व सविस्तर आलें असून तसें व तितकें अवेस्तांत नाहीं. तरी मुख्य मुख्य बाबतींत दोहोमध्यें बरेंच सुंदर साम्य आहे ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. अवेस्तांत त्याचें खाली दिल्याप्रमाणें वर्णन असून त्याला जुळणारें अगर तत्सदृश असें ऋग्वेद-वचन त्याच वाक्यांत पुढें कंसांत उद्धृत करून दाखविलें आहे. तें जिज्ञासु-वाचकांना मोठें बोधप्रद होईल अशी आम्हांस उमेद आहे. असो.

अवेस्तामध्यें या हओम म्हणजे सोमाचें वर्णन आढळतें तें असें:— हओम हा प्रथम 'हरैरे ब्रइति' म्हणजे अल्बुर्झपर्वतावर— अर्थात् अवेस्तांतील स्वर्गावर होता. तेथें अहुर मज्दनें त्यास वाढविलें होतें. ऋग्वेदांतहि सोम प्रथम स्वर्गावर होता— ('दिवि सोमो अधिश्रित' १०-८५-१), असें म्हटलें आहे. अवेस्ताकथनाप्रमाणें पक्ष्यांनीं त्याला तेथून खालीं पृथ्वीवर आणून पर्वत शिखरावर स्थापन केला, (यस्न १०, १०-११. ऋग्वेदांत त्याचा उल्लेख 'त्वां (सोमं) सुपर्णो व्यभिर्भरत् ९-४८-३) किंवा ('श्येनो यदन्धो आभरत् परावतः' ९-६८-६) या वचनांत आढळतो. येथें या पृथ्वीवर तो उंच पर्वतावर असतो. (यस्न ९-२६). ऋग्वेदांत 'गिरिष्ठाः' ९-१८-१ व 'पर्वतावृधः' ९-४६-१ असें

म्हटलें असून शिवाय तो पर्वताच्या फटींत, दऱ्याखोऱ्यांत, वरखळींत तसच सरोवरात व नद्यांत वाढतो असें सूचित केलें आहे त्याचप्रमाणें शंकराचें निवासस्थान जो मूजवत पर्वत, तेथेंहि तो वाढतो अशी ही सोमवल्लीची प्राचीन कथा आहे

हा जो सोम आहे तो अहुरमज्दला व यज्ञताना वैदिक देवाप्रमाणेंच अत्यंत प्रिय आहे तो पवित्र आहे (यश्न ९–१६,) ('शुचि ' ऋ ९–२४–६ ), तो उत्तम आहे (यश्न ९–१६, 'उत्तम सोम ' ९–५१–२) तो मधुर आहे (यश्न ९–१६, 'मधुमत्तम ' ऋ ९–१०१–४) तो सुवासिक आहे (यश्न १०–४, 'सुरभि ' ऋ, ९–९६–१९ ) तो उत्साहजनक आहे (यश्न ५८–१९, 'मत्सर 'मदिन्तम १९–५०–५ ) तो पुष्टिवर्धक आहे (यश्न ९–१६ 'पुष्टिवर्धन ' ऋ १–९–१२ ) तो आरोग्यकारक आहे (यश्न, १०–७,) 'अनमीवा इषस्करत्' ऋ ३ ६२ १४) तो आल्हादकारक आहे (सुमृळीक , ऋ ९–६९–१० ) तो पावनकर्ता आहे ('पावक ' ऋ ९–२४–६) आणि तो सत्कर्म श्रेष्ठ आहे (यश्न, ९–१६, क्रतुवित्तम ' ऋ ९–१०८–१)

तो सुदर आहे (यश्न ९–१६ चारु' ऋ ९–१०२–६ ) तो तेजस्वी आहे ( यश्न १५७–१९, द्युमान् ' ऋ ९–६४–१ ) तो रोगनाशक आहे (यश्न ९–१६, ' हन्ता अपामीवा ' ऋ ९–४७–४३ ) तो पापनाशक आहे 'अघशंसहा' ऋ ९–२८–६) तो दएव म्हणजे राक्षसांचा हन्ता आहे ( यश्न ' रक्षोहा, ऋ ९–१–२ ) तो अमर आहे ( ' अमर्त्य ' ऋ ९–२८–३ ) याप्रमाणें सोमाचे रूप व गुण येथें थोडक्यात रेखाटण्यात आले आहेत

हा जो सोम आहे, तो दोन प्रकारचा आहे एक प्रकारचा म्हणजे तो दुधासारखा शुभ्र आहे ( यश्न १०–११, सोमा शुक्रास इन्दव '

ऋ. ९–६३–२५ ). आणि दुसरा प्रकार म्हणजे पिवळा (यस्न १०–११; 'हरितः' ऋ. ) किंवा, तांबुस पिवळा म्हणजे पिंगट वर्णाचा आहे. ( यस्न १०–११; ऋ. 'बभ्रुः' ९–९८–७ ). यातील पांढरा तो 'वोउरुकश' समुद्रामध्यें असून तो मनुष्याना मिळणें शक्य नाहीं. जगाच्या अंतकाळीं पुनरुत्थान होईल, त्यावेळीं सर्व मृत जीव हा सोम पितात, व ते अमर होतात. दुसऱ्या प्रकारचा पिवळा अगर पिंगट सोम तो मात्र या पृथ्वीवर उगवत असून यजनप्रसंगी त्याचा उपयोग करण्यात येतो. हा सोम जलद वाढतो (यस्न ९–१९; ऋ. वर्धनः ' ). याच्यावर पाणी शिंपडून वरवंटयानें वाटून (ग्रावाभिः सुतम् ) त्याचा रस काढून त्या रसात गायीचें दूध मिसळतात. ( यस्न १०–१३; ' ऋ. 'सोमासो गोभिरंजते ' ९–१०–३ ) त्याचें स्तोत्र गाल्यानें तो झपाटयानें वाढतो ( यस्न, १०–६, ऋ ' गिरावृधः ' ९–२६–६ हा रस पात्रात ओततांना खालीं जमिनीवर सांडता कामा नये ( यस्न १०–१८ ). हें सोम रसाचें दिव्य पान अमृतासारखें मधुर असून तें शरीराला पुष्टि, मनाला आल्हाद, बुद्धीला उजळा व जीवात्म्याला आनंद देणारें आहे (यस्न १०–१७).

हा सोम वनस्पतीचा राजा असून शिवाय तो गृहस्थाचा गृहपति आहे. तसाच तो कुलपति, ग्रामपति, व राष्ट्रपति आहे ( यस्न ९–२३ ). गरिबाना तो श्रीमंत करतो व मूर्खांना शहाणा करतो ( यस्न १०–२१ ) तो महाबुद्धिमान आहे. ( यस्न ९–२३; ऋ. 'विचर्षणिः ' ९–१–२) विधिपूर्वक सोमपान करणाऱ्याना तो सुसपन्न व सुबुद्ध करतो. (यस्न. १०–१३ सुवासिनी स्त्रियाना उत्तम संतति देतो. व कुमारींना चांगला नवरा मिळवून देतो. ( यस्न ९–२७ ). त्याच्यात सर्व-रोगनिवारकगुण असून शत्रूवर मात करण्याचें हुकमी सामर्थ्यहि आहे (यस्न १०–१०).

झोरोष्टर पंथीय भक्त त्याची पुढील प्रमाणें प्रार्थना करतात:— उत्साह देण्यासाठीं, सामर्थ्य देण्यासाठीं, आरोग्य देण्यासाठीं, आयुष्य देण्यासाठीं, विजय देण्यासाठीं, अभ्युदय देण्यासाठीं, संतति देण्यासाठीं, बुद्धि देण्यासाठीं, चैतन्य देण्यासाठीं व त्याचप्रमाणें शत्रू, द्रुज, चेटके, मान्त्रिक, आततायी इत्यादि सर्व दुष्ट लोकांच्या दुष्टबुद्धीचा नाश करण्यासाठीं त्याची प्रार्थना करण्यात येते (यश्न ९, १७–१८)

येथें ह्ओमचें अवेस्तांतील वर्णन व गुणगान जवळजवळ संपल्या— सारखें झालें आता त्याची उपासना करून कोणाला काय लाभ झाला एवढें सांगितलें म्हणजे ही सोमाची कथा संपली म्हणून समजावयास हरकत नाहीं याविषयीं यश्नमध्यें उल्लेख आढळतो तो असा — एके दिवशीं झोरोष्टर हा सकाळच्या प्रहरीं अग्नी–उपासनेच्यावेळीं पवित्र गाथाचें मोठ्यानें पठण करीत असता सोम तेथें अकस्मात हजर होऊन त्यास म्हणाला— झोरोष्टरा ! इतर देवताना जशी तू आहुति देतोस तशी तू मला का नाहीं देत ? मला देत जा कीं

## झोरोष्टर – सोमसंवाद

सोमराजाचें तें दिव्य व तेजस्वी स्वरूप पाहून आश्चर्यानें चकित होऊन झोरोष्टर त्याला म्हणाला— तू कोण ? कुठला ? नाव काय ? इथ का आलास ? मीं नाहीं ओळखलें तुला तू कोण हें मला प्रथम सांग. म्हणजे मग मी तुझ्या सूचनेचा ( इच्छेचा ) विचार करीन

सोम म्हणाला– झोरोष्टरा ! मी सोम आहे ! ह्ओम माझें नाव. मला नाहीं ओळखलेंस तूं ? मरुदष्टभूचें जें दिव्य विबुधमंडळ आहे त्यातला मी एक आहे त्यांप्रभूला मीं फार प्रिय आहे.

झोरोष्टर– अस्सं. पण मला आधीं हें कळूं दे कीं, यापूर्वी तुला कोणी तरी हवि अर्पण केलें होतें काय ? तसें असेल तर साग पाहू तुला हविर्भाग दिल्यानें त्याना काय काय लाभ झाला, हेंहि मला कळूं दे.

सोम– तुला माहीत नाहीं ? ऐक, सागतों तर सगळें काहीं, नीट लक्ष देऊन ऐक !

झोरोष्टर (मान हलवून)– बर.

सोम– हें पहा, या पृथ्वीवर पहिल्याप्रथम सोमरस तयार करून मला तो अर्पण करणारा पहिला माझा उपासक म्हणजे विवधान ( वियस्नान ) हा होय. त्याच्या उपासनेला प्रसन्न होऊन मी त्याला एक सुंदर पुत्र दिला

झोरोष्टर-- तो कोण ? त्याचें नाव काय ?

सोम– त्याचें नाव यिम असें होतें. तो मोठा सस्मरणीय राजा होऊन गेला खरोखर युगप्रवर्तक असा धर्मराजच ! मझ्द प्रभूचा तो मोठा आवडता भक्त. 'ऐर्यन वएज' मध्यें रहात होता तो. त्याची कारकीर्द प्रजेला मोठया सुखाची व हिताची झाली त्याच्या राज्यात पाणी कोठेंहि आटलें नाहीं. सगळीकडे चागली सुबत्ता व आबादी आबाद. कोठेंहि वनस्पती वाळल्या नाहींत कीं वठल्या नाहींत ! तेथें झोंबणारी थडी नव्हती व कडक उन्हाळाहि नव्हता ! हवा समशीतोष्ण. माणसें निरोगी व दीर्घायुषी राज्यात चुरस नव्हती, द्वेष नव्हता, मत्सर नव्हता, दगा फटका नव्हता, रोगराई नव्हती अपमृत्यु नव्हता ! विशेष सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे त्याच्या राज्यात द्रुज, द एव– राक्षस व दुर्जन– याचा उपद्रव मिळूल नव्हता. सर्व प्रजा सुखी संपन्न व आनदी होती. असा तो यिमराजा मोठा पुण्यश्लोक व मझ्दभक्त होता !

झोरोष्टर :– तो यिमराज त्या विवधानाला मिळाला, तो तुझ्या प्रसादानेंच काय ?

सोम– होय तो माझीच देणगी। झोरोष्टरा! हें काय निराळें सागावयास पाहिजे ?

झोरोष्टर – विवघानाची ही कथा ठीक आहे ती मला आवडली याशिवाय आणखी कोणी तुझें यजन केलें व त्यांना काय मिळालें हें सागशील तर मला फार आनद होईल मला ते सर्व ऐकावयाचें आहे मग करशील ना एवढी कृपा!

सोम – आता पुढें ऐक नतरचा माझा दुसरा भक्त म्हणजे आप्य (स –आप्य) हा होय त्यानें मला हविर्भाग दिला व मी त्याला ॠैटा व ओनोस हे पुत्र दिले माझा तिसरा म्हणजे त्रित (स–त्रित) हा असून त्याच्या भक्तीनें प्रसन्न होऊन मी त्याला उर्वाश्य व केरेशस्प हे पुत्र दिले (यश्न ९, ७ व १०)

झोराष्टर सपले का आणखी कोणी राहिले?

सोम आता फार लाबवीत नाहीं आणखी एक सागून हा विषय सपवितो नाव घेण्यासारखा माझा चौथा उपासक म्हणजे तुझा बापच! पौरुशस्प! त्याच्या उपासनेला प्रसन्न होऊन, त्याला एक सुदर, प्रभावशाली दिव्यज्ञानी व अमरकीर्ति असा महात्मा सत्पुत्र दिला

झोरोष्टर– पौरुशस्पाला काय! तो कोण?

सोम– तो कोण हें तुला अजून समजलें नाहीं काय? अरे तो तूच स्पितामा झाराष्टर! माझ्या प्रसादानें व अनुग्रहानेंच तूं जन्माला आलास असो आता अधिक सागत बसत नाहीं झालें एवढें तुझी समजूत पटावयास पुरेसे आहे मग आता साग मला, तूं हविर्भाग देणार नाहींस काय? माझी ओळख अजून तुला पटली नाहीं काय? झोरोष्टरा! साग!

आता पुढें जावयाच्या आधीं वाचकाना एक विशेष गोष्ट सागावयाची म्हणजे ती ही – वर सोम अर्पण करणारा झोरोष्टरी पहिला भक्त

म्हणून विवंघानाचा जसा अवेस्तांत उल्लेख आहे, तसाच ऋग्वेदांत 'विवस्वाना'चा उल्लेख आढळतो. त्या विवंघानाला यिम हा पुत्र होता. तसाच विवस्वानाला यम हा पुत्र होता. अर्थात् अवेस्तांतला विवंघान म्हणजे ऋग्वेदांतला विवस्वानच होय. फरक इतकाच कीं यिम व यम दोघेहि राजे असले तरी त्यांचें राज्य निरनिराळें होतें. यिम हा पृथ्वीवरचा 'ऐर्यन व एज' येथील राजा असून यम स्वर्गातला म्हणजे पितृलोकाचा--राजा होता.

मनुष्याचे मृतपितर जेथें जाऊन राहतात, त्याला पितृ लोक अशी संज्ञा असून, तो स्वर्गातील एक भाग आहे. त्याला यम लोक असेंहि म्हणण्यात येतें. या विवस्वानाला दुसरा एक मुलगा होता. त्याचे नांव मनु. हा मनु पृथ्वीवरचा मानवांचा पहिला राजा असून तो यिम राजाचा समकालीन ठरतो. मनूच्या राज्यांत जलप्रलय व यिमाच्या राज्यात हिमप्रलय होऊन दोघांनाहि स्थलांतर करावें लागले. यावरून ऋग्वेदांतील इतिहास अवेस्तांत कसा प्रतिबिंबित झाला आहे याचे हें ठळक उदाहरण आहे. असो.

(३) वायुः-- पर्शुभारतीय तिसरा यज्ञत् म्हणजे वायु हा होय. त्याचें कोठें कोठें पंचभूतात्मक वायु म्हणून व कोठें कोठें त्याची अभिप्राश्री देवता म्हणून अवेस्ता व ऋग्वेद या दोहोंतहि वर्णन करण्यांत आलें आहे. हा वायु दोन प्रकारचा आहे, असें अवेस्तांत उल्लेख आहेत. एक चांगला म्हणजे आरोग्यकारक वायु व दुसरा वाईट म्हणजे रोगजनक असे त्याचे भेद मानण्यांत आले आहेत. पण जे मज्दभक्त आहेत ते आरोग्यकारक व सुखदायक अशा वायूची उपासना करतात. [ यस्त २२-२४ ] महिन्यांतला बाविसावा दिवस हा त्याचा असून १५ वें यस्त सूक्त हें त्याला उद्देशून आहे.

तो उंच आकाशात राहणारा असून मोठा तेजस्वी, शूर, सामर्थ्य-संपन्न, सुदृढ बांध्याचा व धीट आहे. त्याची छाती रुंद असून माल्या भरीव व पीळदार आहेत. आणि त्याची दृष्टि मोठी तीक्ष्ण व भेदक आहे. तो हितकारक व आरोग्यदायक आहे. [यस्त, १५, ४४–४७ व ५४]. तो अंतरिक्षात राहणारा असला तरी मझ्द व अग्रमइन्यू या दोहोंच्याहि जगात स्वैर संचार करीत असतो. [यस्त, १५–४३]

तो मोठ्यांतला मोठा व बलवानातला बलवान असून, डोक्यावर सोन्याचें किरीट धारण करतो. त्याच्या गळयात सोन्याचा कंठा, अंगात सोन्याचा झगा, कमरेंत सोन्याचा पट्टा, व पायात सोन्याचे पादत्राण असून त्याचीं सर्व शस्त्रास्त्रें सोन्याचींच आहेत. त्याचा रथ सोन्याचाच असून चाकेंहि सोन्याचींच आहेत. [यस्त १५–५७].

त्याच्या नावाचा महिमा फार मोठा आहे. लढाईच्या वेळीं त्याचें स्मरण व स्तोत्रपठण केलें असता शत्रूचा नाश होऊन मझ्दभक्त संकटातून मुक्त होतात असें त्यानें झोरोष्टरास सांगितलें आहे. (यस्त १५–५२). उपासक यज्ञद्वारा त्याचें यजन करून शत्रूचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य देण्याविषयीं त्याची प्रार्थना करतात [यस्त १५–१] आग्रमइन्यू, द्रुज, राक्षस, चेटके अगर मांत्रिक यांच्याकडून उपद्रव व अपाय घडू नये, म्हणून आपली प्रार्थना करण्याबद्दल या वायूचा झोरोष्टरास हितोपदेश आहे (यस्त १५–५६)

## इराणी यझत्

[४] स्रओशः– इराणी यझतात या स्रओशचा क्रमांक पहिला लागतो. तो अहुरमझ्दचा पुत्र असून मिथ्र व रश्नु हे त्याचे भाऊ व

दयेना व अशीवगूहि या त्याच्या बहिणी लागतात [ यस्न १७, २ व १६ ] तो अवेस्ताधर्माचा प्रमुख धर्माधिकारी असून मज्दचा धर्म उचलून धरून त्याची अमलबजावणी करणें हें त्याचें मुख्य कर्तव्य आहे अहुर मज्दनें सर्वांत प्रथम यालाच आपला धर्म समजाऊन सांगितला नंतर तो धर्म या स्रओशानें या मर्त्यलोकात प्रकाशित केला धर्मधारणा, धर्म रक्षण व धर्मप्रसार करण्याचें काम त्याचेंच आहे शिवाय न्यायसत्तेंहि त्याच्याकडेच आहे अर्थात् तो प्रमुख न्यायमूर्ती आहे

धर्मग्रथात त्याचें लक्षण आढळतें तें असें — स्रओश हा समर्थ, व विवेकी असून मज्द प्रभूचा तो आज्ञाधारक व धर्मप्रकाशक असा दिव्य यज़त् आहे (यस्न ५७–१) तो बलवानातला बलवान असून मोठा उत्साही आहे तो कर्तृत्ववान, धैर्यवान, पराक्रमशाली व दुर्दम्य असा कणखर वीरवृत्तीचा आहे (यस्न, ५७, ३–११–१३) तो केव्हांहि वेदिकाच्या अग्नीप्रमाणें झोंपी जात नाहीं सदैव जागृत राहून मज्दप्रभूच्या प्राणिसृष्टीचें पालनपोषण करण्यात तत्पर असतो (यस्न, ५७–१७) त्याचे विचार शुभ आहेत, वाणी मंगल आहे व वर्तन सरळ आहे (यस्न ११–७) सूर्यास्त झाल्यावर सर्व जड व जीवसृष्टीचा तो रक्षक आहे (यस्न ११–११) तो कोणाला नमत नाहीं व दुष्टाना वचकत नाहीं दुजादि दुष्ट राक्षस त्याच्यापुढें भयभीत होऊन चळचळ कांपू लागतात व असतील तेथून पळून जाऊन अंधारात लपून बसतात (यस्न ११–१३) तो दुष्टजनविध्वंसक व सुष्टजन–परिपालक आहे (यस्न ५७–१३)

सूर्यास्त झाल्यावर रात्रकाळांत हातात शस्त्र परशु धारण करून मज्द–सृष्टीची डोळ्यात तेल घालून तो रक्षण करीत असतो, व सज्जनांना दुर्जनांच्या उपद्रवापासून नीट बचाव करतो याकरीता तो दररोज दिवसातून तीन वेळां

व रात्रीतून तीन वेळा स्वर्गातून खाली पृथ्वीवर येऊन फेरफटका करण्याची त्याची वहिवाट आहे. मध्यरात्र उलटून गेल्यावर लोक त्यावेळी गाढ झोपेत गुरफटून गेले असल्यामुळे आपल्याला लवकर आहुति मिळावी या उद्देशानें मदत करण्याविषयीं अग्नि त्याची प्रार्थना करतो कारण तशा प्रभातवेळीं दुज अझी हा मज्दभक्तावर निद्रेची गाढ मोहिनी घालून अग्नीला मिळावयाची आहुति चुकवून त्याची उपासमार करण्याचा प्रयत्न करीत असतो पण अग्नीच्या हाकेला ओ देऊन स्रओश हा धावत येऊन मज्दभक्तास झोपेतून जागृत करण्यासाठीं कोंबड्याला आरडण्यास लावतो त्याच्या आरडण्यानें भक्तजन जागृत होऊन, अग्नीस रात्रीच्या शेवटच्या यामात पोंचवावयाचें हविर्द्रव्य त्यास पोंचतें करतात ( वेंदिदाद, १८, २२–२६ ).

स्रओश हा मज्दधर्माचा महोपदेशक असून ( यस्न ११–१४) सर्व यझतामध्यें त्याचाच संबंध अहुरमज्दशीं अत्यंत निकटवर्ती आहे या महाप्रभूचें यजन करण्याचा पहिला मान त्यासच मिळाला (यस्न, ५७–२) हओमानें ( सोमानें ) त्याचा गौरव करून अलबुर्झ पर्वतावर त्याचें यजन केलें या स्रओशाचें प्रमुख, प्रखर व प्रभावी अस्त्र म्हणजे 'अहुन वइर्य हा तेजस्वी मंत्र होय [ यस्न ५७–१९]

याचें निवासस्थान अलबुर्झ पर्वतावरील एका उच्च शिखरावर बांधण्यात आलें असून तें अत्यंत भव्य नि विशाल असून त्याला वरुणराज्याच्या घराप्रमाणें एक हजार खांब आहेत तें आतून स्वयंप्रकाशित असून बाहेरून नक्षत्रांनीं मढवून काढिलें आहे [ यस्न ५७–२१ ] या स्रओशाच्या जिवावरच इतर यझत् हे रात्रीं पृथ्वीवर उतरण्याचें धाडस करतात [ यस्न ५७–२१ ]

त्याचा रथ सुवर्णाचा असून तो मजबूत व प्रशस्त आहे. त्याला चार तेजस्वी उमदे घोडे जुपलेले असून त्याची खुरें सोन्यानें मढवून काढलेली आहेत ते मोठे चलाख व चाणाक्ष असून तोंडातून हुकूम निघावयाच्या पूर्वीच धन्याच्या मनातलें ओळखून त्याप्रमाणें चालू लागतात ते अत्यन चपल असून वारा, मेघ, पक्षी, बाण याना मार्गे टाकतात [ यश्न, ५७–२९ ] ते धावू लागले म्हणजे कोणलाहि दाद देत नाहींत.

या स्रओशाची आणखी एक सागण्यासारखी महत्वाची गोष्ट म्हणजे त्याची न्यायद्विता होय त्याची न्यायबुद्धि समतोल व पक्षाधरहित असू सरळ व चोख न्यायदान करण्यात शास्त्रबद्ध असते मनुष्य मेल्यावर पुढें चौथ्या दिवशीं पहाटेस तो तेथून परलोकीं जावयास निघतो तो वाटेंत चिनवत पुलाजवळ आला म्हणने तेथें त्याच्या जीवनचारित्र्याची अर्थात् त्याच्या पापपुण्याची चौकशी करण्यात येते त्यावेळीं स्रओश हा न्यायाधीशाच्या मुख्य आसनावर अधिष्ठित झाला असून, त्याच्या जोडीला आणखी दोघे न्यायमूर्ती असतात त्या तिघानीं मिळून मृताच्या पापपुण्याचा आढावा घेतल्यावर त्याचें पुढील स्थान निश्चित करण्याची मुख्य कामगिरी याचेकडेच असते मग निर्णयाप्रमाणें स्वर्ग अगर नरक लोकाकडे त्याची वासलात लावण्यात येते हा स्रओश गरीबाचा अत्यत कनवाळू असून तो त्याचा उद्धारक व तारणकर्ता आहे [ यश्न. ५७–१० ] अवेस्तात त्याचें असें हे शब्दचित्र रगविण्यात आलें आहे

(५) **आतर** – झोरोष्ट्र धर्मातील आतर म्हणजे वैदिक धर्मातील प्रत्यक्ष अग्निनारायणच होय तो या पृथ्वीवरील प्रमुख यज्ञत् असून त्याचें महत्व दोन्ही धर्मात जवळजवळ सारखेंच म्हटलें तरी चालेल अग्नीची सेवा करून त्याला प्रज्वलित ठेवणारा वैदिकाचा जसा अथर्वन् तसाच

झोरोष्टर धर्मातला 'आभवन्' हा होय. ऋग्वेदात याविषयी वचन आहे तें असें– 'त्वामग्ने पुष्करादध्यदथर्वा निरमन्यत' ( ऋ. ६–१६–१३ )– हे अग्ने ! तुला पुष्करातून अथर्वा ऋषीनें मंथन करून उत्पन्न केला, असा त्याचा भावार्थ आहे. म्हणून अग्नीला 'अथर्वन्' हें नाव प्राप्त झालें ('आ सोम मधुमत्तमं घर्मं सिंचादथर्वणि' ( ऋ. ८–९–७ ) असो.

आतर हा अहुरमझ्दचा पुत्र असून त्याच्यामार्फतच मझ्दभक्त हे त्या प्रभूजवळ जाऊ इच्छितात. (यस्न, ३६–१ ). अर्थात् तो मझ्दचा इहलोकांतील प्रतिनिधी आहे. ऋग्वेदात त्याला 'दूतो देवानाम्' (१०–४–२ ) म्हटलें आहे. ज्याच्यावर तो प्रसन्न होतो त्याला तो उदंड सुख–समाधानात ठेवतो. ( यस्न ३६–४) स्वर्गात राहणाऱ्या अग्रवीहस्ताचा तो पृथ्वीवरील सहकारी व प्रतिनिधी आहे. धर्मातील नववा महिना व महिन्यातील नववा दिवस त्याला वाहिलेला आहे

आतर हा झोरोष्टरी प्रत्येक कुटुंबात राहत असल्यामुळें त्याला गृह–पति असें संबोधण्यात आलें आहे. तो गृहस्थाचा गृहपति आहे असें यस्नमध्यें स्पष्ट म्हटलें आहे. (यस्न १७–११ ). 'अग्ने सुगृहपतिस्त्वम्'– हे अग्निदेवा ! तू उत्तम गृहपालक आहेस– असें यजुर्वेदातहि म्हटलें आहे तो मोठा पूजनीय आहे. (यजिष्ठः, ऋ १०–२–५), उदार ( मघोनः ], मोठा शक्तिमान [ शविष्ठः, ऋ ] व कांतिमान [ ओजिष्ठः ] आहे. तो शूर व वीर आहे. तसाच तो तेजःपुंजहि आहे [ 'शोचिष्केश., ऋ, ३–१७–१ ] तो चैतन्यघन आहे. अत्यंत उपकारक आहे. आणि रोगनाशकहि आहे. तो पार्थिव अग्नि असून त्याची अध्यक्ष देवताहि तोच आहे.

मझ्दप्रभूचा हा आतर त्याच्या भक्ताच्या घरीं रात्री व दिवस; पांकसिद्ध करून त्याचें पालनपोषण करतो. हाच भावार्थ ऋग्वेदांत

'त्वयामर्तासः स्वदन्त आसुति' ( ऋ. २–१–१४ ) हे अग्ने ! तुझ्यामुळेंच मनुष्य अन्न भक्षण करतात–याप्रमाणें नमूद करण्यात आला आहे. तो भक्ताच्या घरीं अहर्निश जागृत राहून त्याना कर्तव्य करण्यास मदत करतो व त्याना दीर्घायुष्यहि देतो. जो मनुष्य रात्रीं उठून त्यास समिधा अर्पण करतो त्याच्यावर अनुग्रह करून तो त्याला इच्छित वरदान देतो जो त्याचा अतिथीप्रमाणें पूजासत्कार करतो त्याचा तो सखा होतो. ( अग्ने! त्व सखाऽसि ' ऋ २–१–९ ) व त्याचा मित्र होतो ('अग्ने मित्रोऽसि प्रिय ' १–७५–४ ) असें ऋग्वेदातहि म्हटलें आहे. असो.

मित्र जेव्हा रथात बसून पृथ्वीवर फिरण्यास निघतो तेव्हा आतर हा त्याच्या पाठोपाठ जातो. जे खोटे बोलत नाहींत, सदासर्वदा सत्यच बोलतात, त्याना तो सरळ व सुगम मार्ग दाखवून त्याचें कोटकल्याण करतो हाच भावार्थ 'अग्ने नय सुपथा राये अस्मान्' या यजुर्वेदमंत्रातहि आला आहे. ( शु य ) जेव्हा तो पापी व दुष्ट अग्र मइन्यु हा सज्जनामध्यें शिरून त्याच्यात पीडा व उपद्रव करू पाहतो, तेव्हाअग्नि हा 'व्होवुमनो' बरोबर जाऊन त्याच्या दुष्टबुद्धीचा व दुष्टकृतीचा प्रतिकार करून त्याचे सर्व प्रयत्न हाणून पाडतो हा मद्दप्रभूचा आतर प्रसन्न व्हावयाचा झाला तर त्याचा उपासक हा कायावाचामनें परिशुद्ध असावयास पाहिजे म्हणजे मनात सद्विचार, भाषणात साधुवाणी व वर्तनात सदाचरण हीं त्याच्यात मुरून असलीं पाहिजेत आणि तसें असलें व झालें तरच तो भक्तावर अनुग्रह करून, त्याचें मनोरथ सिद्धीस नेईल एरवीं तसें घडून येणार नाहीं.

आपणास सुस्थिति देण्यासाठीं, विपुल धनधान्य देण्यासाठीं, प्रसन्नचित् मनन्य देण्यासाठीं, पौरुष देण्यासाठीं, पवित्रता देण्यासाठीं, विशाल व सत्यज्ञान देण्यासाठीं, धैर्य देण्यासाठीं, दीर्घायुष्य देण्यासाठीं, जागरूकता,

देण्यासाठीं त्याची प्रार्थना करण्यात येते विद्वानांच्या सभेंत भाग घेऊन, आपल्या घराण्याचा, गावाचा व राष्ट्राचा लौकिक वाढविणारा सुदर व सभेयपुत्र देण्याविषयीं त्याच्याजवळ मागणी करण्यात येते (यस्न ६१, १४ व १५)

अग्नि हा अत्यत पूज्य व पवित्र असल्यामुळें त्याला शुद्ध निर्मल व निर्दोष ठेवण्यासाठीं व राखण्यासाठीं झोरोष्ट्री लोक अत्यत जपत व झटत असतात त्याच्यावर प्रेत जाळणें अगर मृत पशूचें मास शिजविणें अगर इतर अमगल किंवा गलिच्छ पदार्थ टाकणें हें त्याला वावडें असून कोप आणणारें आहे आणि जो तो गुन्हा करील त्याला देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा सागण्यात आली आहे (वेंदिदाद, ८, ७३ व ७४) तोंडानें थुकून त्याला अपवित्र करणें अगर त्यावर अमगल पदार्थ टाकणें हें मोठें पाप आहे असें झोरोष्टर धर्माचें मोठ्या कटाक्षानें सागणें आहे. जो मनुष्य दहन करण्यास प्रेत अग्नीजवळ नेतो अगर त्यावर ठेवतो त्याच्या पापाला प्रायश्चित्तच नाहीं झोरोष्ट्री आतरानें म्हणजे अग्नीचें हें असें वर्णन आहे असो

(६) अशि वगूहि ही स्त्री यझत् असून ती अहुरमझ्दची लाडकी दुहिता आहे आरमइनी ही तिची आई असून सओश, रश्नु व मिथ्र हे तिचे भाऊ व दएना ही तिची नईण आहे (यस्त १७—१६) ती ऐश्वर्य व सपत्ति याचें अधिदैवत म्हणून गणली जाते ती अत्यत तेजःपुज आहे तिची काति मनोहर आहे ती लावण्यसपन्न आहे ती गौरवर्ण आहे व प्रसन्न वदन अशी सौभाग्यदेवता आहे वैदिकाची ती लक्ष्मीदेवी शोभते (यस्त १७, १ व ६०) सौन्दर्यात ती सुस्वरूप, शुभ्रवर्ण, व प्रसन्नमुखी आहे तशीच ती उच्च, सुदृढ, व धीट असून मगलप्रद व आरोग्यकर आहे (यस्न २—१४)

'त्वयामर्तासः स्वदन्त आसुति' ( ऋ. २--१--१४ ) हे अग्ने ! तुझ्यां-मुळेंच मनुष्य अन्न भक्षण करतात-याप्रमाणें नमूद करण्यांत आला आहे. तो भक्तांच्या घरीं अहर्निश जागृत राहून त्यांना कर्तव्य करण्यास मदत करतो व त्यांना दीर्घायुष्यहि देतो. जो मनुष्य रात्रीं उठून त्यास समिधा अर्पण करतो त्याच्यावर अनुग्रह करून तो त्याला इच्छित वरदान देतो. जो त्याचा अतिथीप्रमाणें पूजासत्कार करतो त्याचा तो सखा होतो. ( अग्ने! त्वं सखाऽसि ' ऋ २-१-९ ) व त्याचा मित्र होतो ('अग्ने मित्रोऽसि प्रियः ' १-७५-४ ) असें ऋग्वेदांतहि म्हटलें आहे. असो.

मित्र जेव्हां रथांत बसून पृथ्वीवर फिरण्यास निघतो तेव्हां आतर हा त्याच्या पाठोपाठ जातो. जे खोटें बोलत नाहींत, सदासर्वदा सत्यच बोलतात, त्यांना तो सरळ व सुगम मार्ग दाखवून त्यांचें कोटकल्याण करतो. हाच भावार्थ 'अग्ने नय सुपथा राये अस्मान्' या यजुर्वेदमंत्रातहि आला आहे. ( शु. य.       ) जेव्हां तो पापी व दुष्ट अंग्र मइन्यु हा सज्जनामध्यें शिरून त्यांच्यांत पीडा व उपद्रव करूं पाहतो, तेव्हांअग्नि हा 'व्होहुमनो' बरोबर जाऊन त्याच्या दुष्टबुद्धीचा व दुष्कृतीचा प्रतिकार करून त्याचे सर्व प्रयत्न हाणून पाडतो. हा महत्प्रभूचा आतर प्रसन्न व्हाव-याचा झाला तर त्याचा उपासक हा कायावाचामनें परिशुद्ध असावयास पाहिजे. म्हणजे मनांत सद्विचार, भाषणात साधुवाणी व वर्तनांत सदाचरण हीं त्याच्यांत मुरून असलीं पाहिजेत. आणि तसें असलें व झालें तरच तो भक्तांवर अनुग्रह करून, त्यांचें मनोरथ सिद्धीस नेईल. एरवीं तरी घडून येणार नाहीं.

आपणास सुस्थिति देण्यासाठीं, विपुल धनधान्य देण्यासाठीं, प्रसंगो-चित् सत्कार्य देण्यासाठीं, पौरुष देण्यासाठीं, पवित्रता देण्यासाठीं, विशाल व सत्यज्ञान देण्यासाठीं, धैर्य देण्यासाठीं, दीर्घायुष्य देण्यासाठीं, जागरूकत

देण्यासाठीं त्याची प्रार्थना करण्यात येते. विद्वानांच्या सभेत भाग घेऊन, आपल्या घराण्याचा, गावाचा व राष्ट्राचा लौकिक वाढविणारा सुंदर व सभेयपुत्र देण्याविषयीं त्याच्याजवळ मागणी करण्यात येते (यस्न ६१, १४ व १५).

अग्नि हा अत्यंत पूज्य व पवित्र असल्यामुळें त्याला शुद्ध निर्मल व निर्दोष ठेवण्यासाठीं व राखण्यासाठीं झोरोष्ट्री लोक अत्यंत जपत व झटत असतात त्याच्यावर प्रेत जाळणें अगर मृत पशूंचें मांस शिजविणें अगर इतर अमंगल किंवा मलिच्छ पदार्थ टाकणें हें त्याला वावडें असून कोप आणणारें आहे आणि जो तो गुन्हा करील त्याला देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा सांगण्यात आली आहे (वेंदिदाद, ८, ७३ व ७४). तोंडानें फुंकून त्याला अपवित्र करणें अगर त्यावर अमंगल पदार्थ टाकणें हें मोठें पाप आहे असें झोरोष्टर धर्मांचें मोठ्या कटाक्षानें सांगणें आहे. जो मनुष्य दहन करण्यास प्रेत अग्नीजवळ नेतो अगर त्यावर ठेवतो त्याच्या पापाला प्रायश्चित्तच नाहीं झोरोष्ट्री आतराचें म्हणजे अग्नीचें हें असें वर्णन आहे. असो

(६) अशि वंगुहि – ही स्त्री यझत् असून ती अहुरमझ्दची लाडकी दुहिता आहे आरमइती ही तिची आई असून स्रओश, रश्नु व मिथ्र हे तिचे भाऊ व दएना ही तिची बहीण आहे (यस्त १७–१६) ती ऐश्वर्य व संपत्ति यांचें अधिदैवत म्हणून गणली जाते. ती अत्यंत तेजःपुंज आहे तिची कांति मनोहर आहे ती लावण्यसंपन्न आहे. ती गौरवर्ण आहे व प्रसन्न वदन अशी सौभाग्यदेवता आहे वैदिकांची ती लक्ष्मीदेवी शोभते (यस्त १७, १ व ६० ) थोडक्यात ती सुस्वरूप, शुभ्रवर्ण, व प्रसन्नमुखी आहे तशीच ती उंच, सुदृढ, व धीट असून मंगलप्रद व आरोग्यकर आहे (यस्न २–१४)

ती भक्ताचें पालन करते. त्याना मदत करून त्याचा उत्कर्ष करते. त्याना आरोग्य देते. बक्षीस देते. आशिर्वाद देते. विजय देते. अर्थात् भक्ताचे ती सर्वतोपरी कल्याण करणारी मंगल देवता आहे. मनुष्याना सद्बुद्धि व सद्वासना देणारी अशी पावित्र्याची मूर्तिमंत पुतळीच आहे. जे दुष्ट आहेत त्याचे सर्व दुष्टविचार व दुष्टप्रयत्न साफ हाणून पाडते. महिन्याचा २६ वा दिवस व यस्त १७ वा अध्याय हे तिच्या प्रीत्यर्थ राखून ठेवण्यात आले आहेत. (यस्त १६–६ ).

जे उपासक तिला होमहवन अर्पण करतात व मंत्र, स्तुतिस्तोत्रादिकानीं तिला आळवितात त्याना ती संपत्ति देते, शेतवाडी, घरदार देते. राज्य देते. तिचे भक्त काय मागतील ते मुक्त हस्ताने पदरात टाकते तिच्याजवळ ऐश्वर्याचा व संपत्तीचा अपरंपार महानिधि आहे. अर्थात् ती ऐश्वर्याची व सौभाग्याची महालक्ष्मीच म्हटलें तरी चालेल. ती ज्याच्यावर प्रसन्न होऊन कृपा करते त्याच्या घरीं सोने चांदी, वस्त्रपात्र, धनधान्य, गायींबैल, रथघोडे इत्यादिकाची मोठी चंगळ उडवून देते. (यस्त १७, १२–१४ ) म्हणून जे सज्जन आहेत ते आपल्या घरीं सदैव राहण्याबद्दल तिची प्रार्थना करतात. मात्र एक गोष्ट येथें सांगणें जरूर आहे कीं, ती चाटेल त्याच्याकडून हवि ग्रहण करण्यास तयार नसते. वृद्ध वेश्येची, भ्रष्ट स्त्रीची, मुलाची व कुमारींची ती पूजा स्वीकारीत नाहीं ( यस्न, १७–५४ ). असो.

(७) ह्वरेक्षएत (सूर्य):— ह्वरक्षएत हा प्रकाशाचा अत्यंत मोठा तेजोगोल असून त्यास अवेस्ता ग्रंथात मज्दप्रभूचा डोळा असें म्हटलें आहे. आणि तें यथार्थच आहे. कारण मज्द हा जगातील सर्व गोष्टी व सर्व घडामोडी पाहणारा विश्वद्रष्टा आहे, असें म्हटलें असून त्याचें तें पाहणें हें सूर्यद्वाराच होतें हें प्रत्यक्ष दृग्गोचर होतें आणि म्हणून त्याला

अहुरमज्दचा डोळा म्हटलें हें योग्यच झालें ऋग्वेदातहि सूर्याला मित्र, वरुण व अग्नि याचा डोळा असेंच म्हटलें आहे ('चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः' १-११५-१) वरुण हा मज्दप्रमाणेंच मनुष्याची बरीं वाईट कृत्यें पाहणारा वैदिकाचा विश्वद्रष्टा व न्यायमूर्ती असल्यामुळें त्याच्या नेत्रस्थानीं वैदिक ऋषींनी सूर्याला आणून बसविलें तेहि युक्तच झालें अग्नि हा सूर्यदेवाचा पृथ्वीवरील प्रतिनिधी आहे, ही गोष्ट सर्वश्रुत असून त्याचाहि डोळा सूर्यच ठरतो हे निर्विवाद आहे यावरून अहुरमज्द म्हणजे वैदिकाचा एका दृष्टीनें वरुणराजा म्हटलें तरी चालेल असो

ह्वरेक्षएत हा अत्यन्त तेजस्वी असून तो अमर आहे तो उदय पावला —प्रकाशू लागला—म्हणजे स्वर्गीतील यझत हे त्याचा प्रकाश पृथ्वीवर आणून त्याचा प्रसार व अभिवृद्धि करतात (यस्त ६ १) तो जसजसा आकाशात चढत जाईल तसतशी पृथ्वी शुद्ध व पवित्र होत जाते त्याबरोबरच नद्याहि शुद्ध व निर्मल होतात समुद्र, सरोवर, विहिरी व ओढे नाले यातील पाणीहि शुद्ध, निर्मल व निर्दोष होते तसेंच मज्दभक्तहि पवित्र व शुद्ध बनतात (यस्त ६-२)

तो जर उदय पावला नाहीं तर जगात मोठा अनर्थ होईल अंग्र मइन्यू व त्याचा दुजादि राक्षस परिवार याना फूस मिळून त्यांची चगळ होईल कारण रात्र म्हणजे अंधार हा त्याना अनुकूल व उपकारक असल्यामुळें त्या अंधारात पाताळातून राजरोस बाहेर पडून पृथ्वीवर येऊन मज्दप्रभूच्या प्राणिमात्रावर झडप घालून त्यांची निर्दयपणें लाडगेतोड करण्याचा एकच सपाटा चालवून जगात ते मोठा अनर्थ करून सोडतील—रात्रीं म्हणजे काळोखांत यझतांचें काहींच चालत नाहीं अर्थात रात्रीच्या वेळीं काळोखात राक्षसाचा प्रतिकार करण्यास ते अगदीच असमर्थ असून, उलट त्यावेळीं राक्षसाचें सामर्थ्य मात्र वाढते (यस्त ६-३)

रात्र ही राक्षसादिकांना अनुकूल असून त्यावेळीं ते मोठे धीट व उद्दाम बनतात. तसें यझतांचें नाहीं. यझतांना अंधार हा वावडा व राक्षसांना दिवस वावडा. रात्रीं राक्षस प्रबल व दिवसा यझत प्रबल. प्रकाशात राक्षस हे हीनबल व गलितधैर्य बनत असून यझत हे धीट व प्रबल होतात अंधाराला हुसकावून सूर्य जेव्हा आत्मतेजानें प्रकाशू लागतो तेव्हा राक्षसचमूची धानरगुंडी बळून भयग्रस्त होऊन सैरावैरा पळत पुनः पाताळात शिरून ते दडून बसतात म्हणून सूर्याचें महत्व मज्दधर्मांत फार आहे. सूर्योदय झाला म्हणजे त्यावेळीं दिलेलें हविर्द्रव्य यझतांना पोंचतें. रात्रीं दिल्यास तें राक्षस खाऊन टाकतात. म्हणून यझतांना दिवसा हविर्भाग अर्पण करण्यास झोरोष्टर धर्मानें उपदेशिलें आहे. वैदिक धर्मांतहि हीच प्रथा आहे. दिवस हा देवाचा व रात्र ही राक्षसाची असें तेथेंहि म्हटलें आहे.

ऋरेक्षएत हा सकाळीं अलबुर्झ पर्वतावर उगम पावून सध्याकाळीं तयेरा पर्वतावर अस्त पावतो. महिन्याचा अकरावा दिवस त्यासाठीं राखून ठेवण्यात आला असून सहावें यस्त हें त्याच्या नावावर मोडतें

(८) **आर्द्विसूर अनाहित** :— झोरोष्टर धर्मांतील 'आर्द्विसूर अनाहित' ही वैदिकदृष्टीनें अद्वेदता आहे शिवाय नदीरूपानें— म्हणजे उदक रूपानेंहि— कोठें कोठें ती स्तविलीं गेली आहे अवेस्ताग्रथात तिचें वर्णन फार झकास व ठसठशीत असून तें पुढीलप्रमाणें आहे आर्द्विसूर ही एक दिव्य, सुदर व नवतरुण कुमारी असून तिची शरीरकांति गौरवर्ण, अवयव रेखीव व भरीव आहेत तिचा चेहरा चद्रासारखा मनोहर असून तो तेजस्वी व मोठा आकर्षक आहे कमरेंत रत्नजडीत सोन्याचा पट्टा असून त्यामुळें तिच्या वक्षःस्थळाला विलक्षण शोभा प्राप्त झाली आहे. कानात हिऱ्याचीं कर्णकुडलें, गळयात तेजस्वी रत्नहार, हातात रत्नजडित कंकण,

मस्तकावर नक्षत्रजडित सुवर्ण किरीट झगझगत असून शरीरावर सुवर्णतन्तूंनी विणलेला सुदर शालू विलसत आहे अशी आहे ही आर्द्विसूर दिव्य रमणी ( यश्त, ५, १२६ ते १२९ ).

अर्थात ही आर्द्विसूर म्हणजे वैदिकाची जलदेवता पवित्र सरस्वती महानदी म्हटलें तरी चालेल एकदरींत ती निष्कलक, तेजस्वी, सामर्थ्यसपन्न व उदार आहे ही आर्द्विसूर पुरुषाचें वीर्य व स्त्रियाचा गर्भ शुद्ध करणारि असून तिच्या कृपेनेंच गर्भ धारणा होते ती स्त्रियाना सुखरूप प्रसूत होण्यास मदत करते व मातेच्या स्तनात योग्यकालीं दुधाचा पान्हा निर्माण करते तिच्या अनुग्रहानें स्त्रिया सुखरूप बाळत होतात ( यश्त ३–५१ ) ती मनुष्याना आरोग्य देणारी असून भक्तजनाचे पशू, शेतवाडी व सपत्ति वृद्धिगत करणारी आहे ( यश्त ६०–१ ) पुरोहित लोक तिला आकाशातून खालीं वेदीजवळ येऊन हविर्भाग स्वीकारून उपासकाना विपुल सपत्ति, सुदृढ रथ, उमदे घोडे, पुष्टिकर अन्न, तीक्ष्ण शस्त्रें व अलोट समृद्धि अर्पण करण्याविषयीं तिची प्रार्थना करतात ( यश्त ६–१३० )

ही आर्द्विसूर देवता बाहेर जातांना रथात बसून ऐटींत बाहेर पडते ( यश्त ६–१३० ) तिचा रथ सुवर्णाचा असून त्याला चार पाढरे शुभ्र व सुदर घोडे जोडलेले असतात त्या घोड्याचा लगाम हातात घरून रथ स्वत च ती हाकीत असते ( यश्त ५–११ ) अहुरमझ्दनें तिच्यासाठीं वायु, पर्जन्य, मेघ व गारा उत्पन्न केल्या असून त्यामुळें ती पृथ्वीवर जोराची जलवृष्टि व गाराचा भडिमार करून पृथ्वीला ती निर्मलोदकानें न्हाऊ घालते ( यश्त १२० ).

मनुष्यानीं आपल्याला सोम, दूध, उदक अर्पण करून आपलें यजन करावें अशी तिची फार इच्छा असते. अर्थात् हीं हवनद्रव्यें सूर्योदयानतर

सूर्यास्तापर्यंत तिला केव्हांहि अर्पण केलीं तरी चालतात. पण सूर्यास्तानन्तर रात्रीं केलेलें हवन मात्र तिला पोंचत नाहीं. कारण रात्र ही राक्षसाची व दिवस हा दिव्य, यज्ञताचा आहे. म्हणून अवेस्तांतील सर्व दिव्य विबुधाना दिवसाच हवि अर्पण केला पाहिजे. आणि हीच प्रथा आपल्या वैदिक धर्मांतहि आहे. असो.

आपणाला उत्तम संपत्ति, श्रेष्ठ सामर्थ्य, सुंदर व गुणवान संतती, प्रसस्त घर व परलोकी सद्गति प्राप्त व्हावी म्हणून तिची प्रार्थना करण्यात येते ( यस्न ६८, १३–१४ व २१ ). जे दुष्ट विचाराचे, दुष्ट आचाराचे, दुष्ट भाषणाचे आणि तसेंच त्याना दुःख देणारे त्याचे आप्तइष्ट, स्नेही सोबती इत्यादिकाना कल्याणप्रद होऊ नये अशी मज्दभक्त तिची प्रार्थना करतात. ( यस्न ६५–६ ). जे दुसऱ्याचें अहित इच्छितात व वाईट चिंततात, जे चोर व लुटारु आहेत, खुनी व चेटके, प्रेत पुरणारे, मत्सरखुर्दाचे, कंजूष, नास्तिक व दुष्ट दुर्जन आहेत त्याच्यावर अनुग्रह करण्यात येऊं नये अशी विनवणी करण्यात येते. ( यस्न, ६५–८ ).

( ९ ) तिश्त्र्य ( सं. तिष्य ):– सूर्य व चंद्र याच्या नंतर महत्वाच्या दृष्टीनें आकाशातील नक्षत्राचाच क्रमांक लागतो नक्षत्रसृष्टी ही मज्दसृष्टी असून त्यात तिश्त्र्य यास प्राधान्य देण्यात आलें आहे. ग्रहादिक ही अंग्रमइन्यूची तामससृष्टी असून त्याला टक्कर देण्यासाठीं– विरोध करण्यासाठीं–म्हणून तिश्त्र्य यज्ञताचा अवतार आहे तिश्त्र्य याचें संस्कृत रूप तिष्य असें आहे. आणि तें वैदिकाच्या नक्षत्रातच मोडते तिश्त्र्य हा पावसाचा अधिपति असून त्याला अडविणारा हा अंग्रमइन्यूचा 'अपौश' या नावाचा एक महाप्रबल राक्षस आहे. मेघाचें पाणी मधल्या– मधेंच अडवून धरून जगावर अवर्षण उत्पन्न करणें हें त्याचें मुख्य कर्तव्य आहे. अर्थात् हा अपौश म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून ऋग्वेदातला

इंद्राचा प्रबल शत्रू पाणी अडविणारा पापी राक्षस 'अहि' आहे म्हटलें तरी चालेल. त्यादृष्टीनें तिश्त्र्य या यज्ञतास इंद्राचा अवतार मानण्यास हरकत दिसत नाहीं असो.

हा तिश्त्र्य अत्यंत तेजस्वी व मोठा चमकदार तारा असून त्याला हजार इंद्रियें आहेत. तो धिप्पाड व उग्र असून सामर्थ्यवान व बुद्धिमान आहे तो स्वतः आरोग्यसंपन्न असून मनुष्यांना आरोग्य देणारा तोंच आहे भक्तांना देण्याकरतां त्याच्याजवळ हजारो वर असून तो ते भक्तांना सढळ हातानें अर्पण करतो (यश्त, ८, २, ४, १३ व ४९).

तो उदकाचा गर्भ आहे त्याच्या मार्फतच उच्च आकाशातील मेघ हे खालीं पृथ्वीवर जल वर्षाव करतात (यश्त ८–४) प्रार्थना, यजन, स्तुतिस्तोत्र इत्यादिकास मज्द इतकाच तो सत्पात्र आहे (यश्त ८–५०) झोरोष्ट्रला ज्याप्रमाणें अहुरनें मनुष्यामध्यें धर्मराज केला तद्वत या तिश्त्र्याला त्यानें सर्व नक्षत्राचा प्रमुख म्हणून त्याची स्थापना केली महिन्याचा तेरावा दिवस व वर्षाचा चौथा महिना त्याला वाहिलेले आहेत

त्याचें रूप सदैव सारखेंच नसतें तें वेळोवेळीं बदलत जातें महिन्याच्या पहिल्या दहा रात्रीं तो तरुण मनुष्याच्या रूपात, पुढील दहा रात्रीं सुंदर बैलाचें रूप धारण करून व शेवटच्या दहा रात्रीं शुभ्र अश्व उमद्या घोड्याच्या रूपात तो पुढें पुढें सरकत असतो (यश्त, ८, १३–१६–१८)

पाऊस पाडण्यासाठीं म्हणून तो ज्यावेळीं वोउरकश समुद्राकडे जातो तेव्हा तो शुभ्र घोड्याचें सुंदर रूप धारण करतो. तो त्या समुद्राकडे चालला असताना मधें वाटेंतच अपोश राक्षस हा काळ्या कुळकुळीत घोड्याचें रूप धारण करून त्याला आडवा येतो तेथें दोघाची चकमक

झडते तीन दिवस व तीन रात त्या दोघामध्यें घनघोर संग्राम चालून अखेर त्यात तिश्र्याचा पराभव होतो. (यश्त ८, २०–२२)

पड खाऊन पराभव पावल्यावर विषण्ण मनानें तो तेथून निघून दुःखी कष्टी होत्साता आक्रोश करीत मझ्दप्रभूजवळ येऊन आपलें गाऱ्हाणें सांगतो व त्यास म्हणतो कीं, 'हे प्रभो ! काय सांगू माझी स्थिति ! धिक्कार असो मला ! काय करूं नि काय सांगू तुला, प्रभुराज ! माझी फार फजिती झाली ! लोक मला पुजत नाहींत ! मला हविर्भाग देत नाहींत ! माझ्या नावानें स्तुतिस्तोत्र गात नाहींत ! अर्थात् इतर यज्ञता-प्रमाणें मला मानीत नाहींत व आदर सत्कार करीत नाहींत ! म्हणून माझा पराभव झाला ते लोक मला जर पुजते, मानते तर माझा असा पड खाऊन पराजय झाला नसता ! (यश्त ८–२४)

तिश्र्याची ही केविलवाणी रडकथा ऐकून मझ्दप्रभूला त्याची दया आली व तो खुद्द त्याच्याजवळ येऊन त्यानें त्यास हविर्द्रव्य अर्पण केलें शिवाय त्याला दहा घोडयाचें, दहा उंटाचें, दहा बैलाचें, दहा पर्वताचें दहा नद्यांचें असें प्रचंड सामर्थ्य देऊन त्यास रणगाजीचा विजयी वीर बनविला ( यश्त ८–२५ ) या अहुरमझ्दच्या हवनाशिष्ट प्रसाद भक्षणानें त्याच्या गलितवीर्य शरीरांत पुन्हा नव चैतन्याचा दिव्य संसार होऊ लागला आतां तो पुन्हा रणोत्साहानें भारला जाऊन त्या दुष्ट द्रप्स अपौ-शाच्या समाचार घेण्यास वोउरुकशाकडे वळला तेथें पुन्हा तो दुष्ट अपौश त्यास भाटवा आलाच दोघाची आतां प्रचंड झुंज लागून, यावेळेस अपौशाचें सामर्थ्य निष्प्रभ ठरून त्यास पड खावी लागली व तिश्र्य हा विजयी झाला ! अर्थात् पराभूत झालेला तो दुष्ट अपौश अमंगल गळा काढून ओरडत व किंचाळत तेथून पळून गेला (यश्त ८, –२७–२८)

मनुष्यानी त्याचें स्तुतिस्तोत्र गाऊन त्यास हवि अर्पण केल्यावर त्याच्या उपासनेनें प्रसन्न होत्साता, त्याच्या शेतावर व कुरणावर धो धो पाऊस पाडून, तीं सुपीक सुसमृद्ध करतो ( यस्त ८-४२ ) तो भक्ताची सर्व भीति नष्ट करून त्याना उत्तम बलारोग्य देतो. त्याना मनपसत सतति, दुधाळ गायी, उमदे घोडे वगैरे देऊन त्यांचें मनोरथ पूर्ण करतो. त्याच्या प्रदेशावर पाऊस पाडून फुलपुष्पादिकानीं व कदमूलादिकानीं तो सगळा देश सुफलेनें सुसमृद्ध करून सर्वांना आनंदी करून टाकतो. जे मज्द-प्रभूची मनोभावें पूजाअर्चा करतील, त्याना तो रहावयास सुदर व प्रशस्त असें घरदार देऊन सुखी व सतुष्ट करतो (यस्त ८, १५–१९). तिश्‍त्र्याची ही अशी कथा आहे.

(१०) रश्‍नु रश्‍तिस्त – रश्‍नु हा धिप्पाड शरीराचा व उच बांध्याचा असून तो महाबलवान आहे. (यस्त १२–६ ). तो अत्यंत पवित्र असून मोठा उदार आहे तसाच तो सत्यव्रत, महाज्ञानी, दूरदर्शी विवेकी व मोठा न्यायनिष्ठुर आहे (यस्त १२–७) तो चोर, लुटारू, दरोडेखोर इत्यादि दुर्जनाचा कट्टर दुष्मन असून कोणाकडूनहि तो नमविला जात नाहीं व मारला जात नाहीं. ( यस्त, १२–८ ). तो सत्याचा वाली व कैवारी आहे सत्यपालन हें त्याचें प्रमुख व पवित्र कर्तव्य आहे अर्थात् सत्याचा तो अधिदेव म्हटला तरी काहीं गैर होणार नाहीं

त्याची सागावयाची महत्वाची अशी एक गोष्ट म्हणजे मृताचा न्यायनिवाडा करणाऱ्या न्यायाधिशांत तोहि एक आहे. त्याच्या जोडीला मिथ्र व सओश असे आणखी दोन न्यायाधिश असून हे तिघे मिळून मनुष्याच्या इह -लोकातील पापपुण्य कर्माचा मरणोत्तर सगळा हिशोब करून त्याप्रमाणें ते आपला निर्णय देतात. या निर्णयावरच मनुष्याला स्वर्ग अगर नरक याची प्राप्ती होते. या

तीन न्यायाधिशांपैकी मनुष्याची पापपुण्ये जोखण्याचा तराजू या रवनूच्या हातात असून त्या तराजूने तो मनुष्याची कृत्ये चोरस व बिनचूक जोखून काढून तो निर्णय इतर न्यायाधिशाना सागतो यावेळी तो कोणाचाच पक्ष धरत नाही पुण्यवान म्हणून त्यावर लोभ करीत नाही व पापी म्हणून त्यावर अवकृपा दाखवीत नाही राव व रक, गरीब व श्रीमत, लहान व थोर, स्त्री व पुरुष, सज्जन व दुर्जन असा भेदभाव न करता सर्वांना एकच मापाने तोलून त्याची व्यवस्था लावतो अन्यायाने तो कोणाला तारीत नाही व पक्षपाताने कोणाला मारीत नाही तो अत्यत नि स्पृह व न्यायनिष्ठुर असा धर्मात्मा न्यायाधीश आहे

**(११) माह** – माह हा आकाशातील एक आल्हादकर दिव्य विबुध असून वैदिकाचा तो रजनीनाथ चद्र आहे तो कातिमान असून मनाला आल्हाद व बुद्धीला प्रतिभा देतो तो मोठा उदार, यशस्वी, मगलकारक, ऐश्वर्यदायक, आरोग्यप्रद, उत्साहवर्धक, उदकनिर्माता असा एक शात, सुदर व मनोहर यझत आहे (यस्त, ७–५) तसाच तो सुकातिमान तेजोगोलहि आहे

तो महिन्यातील पहिल्या पधरा दिवसात क्रमाने वृद्धि पावत असतो पंधराव्या दिवशी पूर्ण व प्रफुल्ल होऊन नेत्रास आनदित व मनास उल्हासित करतो त्याच्यासारखा सुदर, सुघात, सुमनोहर, आल्हादप्रद असा दुसरा रात्रीचा यझत नाही तो आपल्या कातीने शुक्लपक्षात जसजसा चमकत व वाढत जातो तसतशी झाडे व वनस्पती देखील वाढत विकसत व हिरवी-गार व टवटवीत होत जातात पौर्णिमेनतर पुढे तो क्षय पावत जाऊन शेवटच्या म्हणजे अमावास्येच्या दिवशी तो सपूर्ण अदृश्य होतो (यस्त ७–४)

उपासक त्याच्यापाशीं सामर्थ्य देण्याविषयीं, विजय देण्याविषयीं, देवतामक्त व लोकनायक पुत्र देण्याविषयीं व गुराढोराची वाढ व आरोग्य देण्याविषयीं त्याची मनोभावें प्रार्थना करतात ( न्यायिस १० ).

# फ्रवशी

मज्दसृष्टींतली फ्रवशी ही अमेशस्पेंता व यझत्प्रमाणें एक दिव्य योनीच आहे. झोरोष्टर पंथात अमेश स्पेंता, यझत् व फ्रवशी असे दिव्य योनीचे तीन थर असून त्यांचें कार्यक्षेत्रहि व्यवहारात निरनिराळें व ठरीव आहे. या विश्वात जेवढें म्हणून वस्तुजात व जीवजात आहे, त्यातील प्रत्येक वस्तूला व जीवजाताला एकेक फ्रवशी आहे. या दृष्टीनें मज्दप्रभूला— देखील त्याचा फ्रवशी आहेच. हे स्वर्गात राहत असले तरी त्याची सत्ता पृथ्वीवरहि चालते उभय लोकात ते फिरत असतात.

पारसी धर्मात या फ्रवशी संबधानें निश्चित अशी माहिती मिळत नाहीं अधुक अधुरा असे निरनिराळे विचार त्यात पुढें करण्यात आले आहेत. मात्र एक गोष्ट सर्वमान्य आहे कीं, पारशाची ती मृतपितराची देखील एक योनि आहे. शिवाय स्वयभू असें काहीं पितर आहेतच ही गोष्ट आम्हास पटते वैदिक धर्मातहि पितृलोक म्हणून एक लोक आहे. तो स्वर्गात असून त्यास यमलोक असेंहि म्हणतात. येथें मनुष्याचे मृत पितर जाऊन राहतात असें आमचा धर्म सागतो. असो.

हे फ्रवशी फार सुंदर आहेत, समर्थ आहेत, शूर आहेत, उदार आहेत, पराक्रमी आहेत, ऐश्वर्यवान आहेत, कीर्तिशाली आहेत, उपकारक आहेत, कल्याणकृत् आहेत व सिद्धिदायक आहेत. ते अंगात पोलादी कवच घालतात डोक्यावर पोलादी शिरस्त्राण व हातात तीक्ष्ण आयुधें

धारण करतात ते मज्दभक्तावर अमृतवृष्टी व दुष्टावर कठोर प्रहार करणारे असे धीरगंभीर वृत्तीचे असून सुष्टजगाचें संरक्षण करण्यात अखड जागृत व तत्पर असतात.

इतर दिव्य विभुधाप्रमाणें याचें कार्यक्षेत्रहि मज्दप्रभूनें निश्चित करून दिलें आहे. सृष्टीवर अखड नजर ठेवून तिचें रक्षण करणें, तिच्यावर पाळत ठेवणें ही कामगिरी त्याच्यावर सोपविण्यात आली आहे अर्थात् ते लोकपाल आहेत मज्दप्रभूलाहि त्याचा एक फ्रवशी आहेच. त्याच्या मदतीनेंच आकाश व पृथ्वी सावरून व रोखून धरण्यास तो समर्थ झाला आहे. त्याला जर या फ्रवशीची मदत नसती तर त्यानें निर्माण केलेलें वस्तुजात व जीवजात आणि ही सुदर मानवसृष्टी जिवत व सुरक्षित राहती ना कारण द्रुज, दएव, अहिरमन इत्यादि दुष्ट व क्रूर राक्षसानीं त्याना केव्हाच घेरून त्याचा फडशा पाडून टाकला असता या फ्रवशी मुळेंच त्याच्या सैतानी कृत्याला आळा नसला आहे

कुटुबस्थाना ससारात याची मदत पदोपदी लागते व होत असते याच्याच कृपेमुळें स्त्रिया गर्भधारणा करतात, त्या गर्भाचें रक्षण होते, ती याचीच दया सुबुद्ध व सद्गुणी असा पुत्र निपजणें, तो देखील यांचाच अनुग्रह फार काय, पाणी वाहतें, धान्य पिकते, झाडें फळतात, वेली फुलतात चंद्र सूर्य नक्षत्रादि दिव्यमाला भ्रमण करीत राहिली आहे, तो सगळा या फ्रवशीचा प्रभावच ! लढाईत राजाला मदत करून त्याला विजय प्राप्त करून देणारे हे फ्रवशीच होत

हे जे फ्रवशी महात्मे आहेत, ते स्वर्ग व मृत्युलोकात सारखच सचार करीत असतात ते बलवान व प्रभावशाली आहेत, जागरूक व कर्तव्यदक्ष आहेत भक्त त्याना आळवून यज्ञात पाचारण करतात.

जो लिंग देह तोच पारशाचा फ्रवशी होय. लिंग देहाची स्पष्ट कल्पना त्या धर्मात नसली तरी सामान्यतः तें तत्त्व कमी अधिक प्रमाणानें त्याना मान्य आहे असें म्हटल्यास त्यात काहीं वावगे नाहीं. या फ्रवशींना पाप पुण्य इत्यादि शिवत नाहीं. त्यापासून ते पूर्ण अलिप्त असतात. फक्त मनुष्याच्या कृतकर्मावर त्याची नजर असते. पापपुण्य भोगणारा मनुष्याचा जीवात्मा हाच त्या कृत्यास जबाबदार असतो फ्रवशींना त्याचें सोयरसुतक काहीं नसतें. याप्रमाणें या फ्रवशींची थोडक्यात कथा आहे.

## तामस सृष्टि

झोरोष्टर धर्माच्या शिकवणीप्रमाणें या जगात सुष्ट व दुष्ट, सत् व असत्, देवता व दानव अशा दोन परस्पर भिन्न पण प्रबल शक्ती हें जग उत्पन्न झालें तेव्हापासून अस्तित्वात असून त्याच्यात वर्चस्वासाठीं सारखी व सतत स्पर्धा व संघर्ष चाललेला दिसून येतो त्यात जी सुष्ट अगर सत् शक्ती आहे, ती मानवाना हितकारक, सुखकारक, उत्कर्षक, उपकारक व उद्धारक अशी ज्ञानगर्भ व सत्यनिष्ट दिव्य चैतन्य शक्ति असून तिचा जनक, स्वामी व अध्यक्ष अहुरमज्द हा आहे, आणि दुसरी जी दुष्ट, व तामस शक्ति आहे, तिचा अधिपति अंग्रमइन्यू हा असून वैदिक वाङ्मयात तिला राक्षस अगर असुर या नावानें संबोधण्यात येते.

ही जी तासम शक्ति आहे ती प्राणिमात्राला दुःखकारक, भयकारक रोगकारक, अहितकारक, अपकर्षक अशी मोह पाडणारी अज्ञानगर्भ व अधोगतिप्रद तामसशक्ति आहे सुष्ट काय अथवा दुष्ट काय, या दोन्ही शक्ती अदृश्य व स्वतंत्र असून त्यादून पहिली वर म्हटल्याप्रमाणें मनुष्याला

उपकारक व उत्कर्षक असून मनोगोचर स्वर्गप्रद आहे व दुसरी अपकारक व दुःखदायक असून मनोगोचर अधोगतीस म्हणजे नरकामत नेणारी आहे अहुरमज्द हा प्रकाशातून प्रगट झाला व त्यानेंच सूर्यचंद्रनक्षत्रादि दिव्यगण व पृथ्वि,आप अग्नि इत्यादि स्थूल सृष्टि–अर्थात् सगळें विश्वमान–निर्माण केलें.

पण अंग्रमइन्यू हा केव्हा व कशापासून झाला यासंबंधी झोरोष्टर धर्मात निश्चित अशी माहिती मिळत नाहीं. मात्र इतकें खास म्हणतां येईल की तो अहुरमज्दच्या सृष्टींतला नाहीं. काहींचे म्हणणें असें आहे की, अहुरमज्द व अंग्रमइन्यू हे दोघेहि सहजात असून दोघांचाहि जन्म एकदमच झाला पण हें मत आधुनिक झोरोष्टरी विद्वानांना मान्य नसून तो तमापासून झाला असें त्यांचें म्हणणें आहे. तें कसें का असेना, तितक्या खोल पाण्यात शिरण्याचें हें स्थान नव्हे. मात्र इतकें खात्रीनें म्हणता येईल की, या दोन दिव्य नि तामस शक्ती प्रारंभापासून अस्तित्वात असून त्यांच्यामध्यें विरोध आहे व दोघांत सतत स्पर्धा, चुरस व संघर्ष चाललेला असतो.

या अंग्रमइन्यूचा प्रत्यक्ष असा संबंध अहुरमज्दशीं येत नसून त्याचे जे इतर प्रतिनिधी–ज्यांना स्पेंता मइन्यू असें म्हणतात–त्यांच्याशीं येतो. वेदांत देव व असुर–म्हणजे राक्षस–हे जसे परस्पर विरोधी गट मानण्यात आले आहेत, तद्वत् झोरोष्टर धर्मांतहि स्पेंतामइन्यू व अंग्रमइन्यू असे परस्परविरोधी गट गणले गेले आहेत. त्यात स्पेंतामइन्यू हे सत्यप्रिय, न्याय-निष्ठुर, न्यायनिष्ठ, सत्प्रवृत्त व पवित्राचरणी व मत्ताभिमानी असे दिव्य विबुध आहेत. अंग्रमइन्यू व त्याची प्रभावळ हे स्वाद, जुलमी, वाममार्गी व अधोगतीस नेणारे महाठक आहेत. मागच्या प्रकरणांत सच्छक्तीचे म्हणजे दिव्यविबुधांचें थोडक्यात वर्णन व विवेचन केलें आहे. आतां येथें अंग्रमइन्यूचें वर्णन व त्याचें कार्य यासंबंधीं दोन शब्द लिहू इच्छितों.

## अंग्रमइन्यू

झोरोष्टर धर्मात दुष्ट प्रवृत्तीचा, दुष्ट वृत्तीचा–दुष्ट विचाराचा–अग्रे–सर व मुख्य नायक म्हणजे हा अग्रमइन्यू ! त्याची राक्षसात–म्हणजे दएव गटात–गणना होते. तो राक्षस गणातला मुख्य दैत्यराज्य असून अहुरमझ्दच्या सात्विक नि निरुपद्रवी जगात शिरून तेथें गोंधळ व गडबड माजाविणारा मोठा पटाईत बडखोर आहे. तो जात्याच मोठा भयकर व मोठा पापी आहे. अत्यत दुष्ट व मोठा क्रूर आहे. तसाच परमनीच व जुल्मी आहे. त्याची बुद्धी खोटी, भाषण मायावी व वर्तन वाईट. थोड–क्यात म्हणजे तो महाठक, दुष्टबुद्धि व पापकर्मा असून मोठा नष्ट व चाडाळ आहे. त्याचें निवासस्थान उत्तरेस असून तो पृथ्वीच्या पोटात म्हणजे पाताळात राहतो.

तो आपल्या दुष्ट परिवारासह सात्विक व निरुपद्रवी मझ्दजगात शिरून तेथें गोंधळ, गडबड व धुडाई माजवितो मानवसृष्टींत रोगराई, दैन्य–दारिद्य, दु ख–शोक, पाप–पीडा, अनीति–अत्याचार, आपत्ति–विपत्ति, अवर्षण–दुष्काळ इत्यादि माजवून मनुष्याना सतत छळत व सतावीत असतो. त्याच्या मनाला भूल पाडून त्याना दूराचरणास व पापकृत्यास प्रवृत्त करीत असतो मनुष्याला नीतिमार्गापासून–सन्मार्गापासून–सद्विचारा–पासून–भ्रष्ट करून त्याला पापप्रवृत्त करून, अखेर दुर्गतीस म्हणजे नरकात ओढन नेणारा असा तो दुष्ट चाडाळ आहे !

एकदा त्यानें खुद महर्षि झोरोष्टरास गाठून मझ्दधर्मापासून परावृत्त होण्यास व आपला अनुयायी बनण्यास परोपरीनें आळवून, गोंजारून आणि अखेर धमकी देऊनहि पाहिलें पण पक्का धर्मवीर झोरोष्टर तो सत्यज्ञानाचा महामेरु ! मझ्दप्रभूचा अनन्य भक्त ! अर्थात् कसल्याहि भुलथापाना व आमिषाला न भुलता व धमकावणीला भीक न घालता सद्धर्मपथावरून

तसूभरहि ढळला नाही व कर्तव्य क्षेत्रावून अणुमात्रहि चळला नाही ! ! अंग्रमइन्यूनें आपल्या कुटिल युक्तिप्रयुक्तीची व भ्रामक सुखैश्वर्यांची शर्थ करून पाहिली. पण कशालाच यश नाही अखेर जेव्हा अग्रमइन्यूवर 'अहून वईर्य' महामंत्राचा प्रयोग करण्यात आला तेव्हा स्वारीनें त्याचा नाद सोडून अपयशाचें माप पदरात घेऊन ओरडत व किंचाळत तेथून पळता पाय काढला ! ! यावरून हें उघड आहे की, जो मझ्दप्रभूचा अनन्यभक्त व कट्टा धर्मवीर आहे, त्याच्यावर या भुरट्या अग्रमइन्यूची मायावी मात्रा मुळींच चालत नाही !!

महर्षि झोरोष्टराकडून चांगली थप्पड बसली तरी शुद्धीवर न येता व शहाणपणाचा धडा न घेता तो आपल्या उपजत स्वभावालाच चिकटून राहिला आपला हेका काहीं त्यानें सोडला नाहीं तो दुष्ट दैत्य इतका काही निर्लज्ज व निगरगट्ट आहे की, जगाच्या अंतापर्यंत मानवाना असाच छळत व छेडत राहणार ! शेवटीं त्याचा मझ्दप्रभूकडून अंत होऊन, सर्वत्र आनंदीआनंद होणार पण तो क्षण येईपर्यंत त्याचा त्रास व छळ सोसणें हें भागच आहे

आता हा जो राक्षस एवढा मातला व प्रबल झाला आहे, त्याला कारणहि तसेंच बलवत्तर आहे त्याचाहि येथें खुलासा करणें हें अगत्याचें असल्यामुळें त्या प्रीत्यर्थ आणखी दोन शब्द खर्ची घालतों हा अग्रमइन्यू एकटाच नाहीं त्याच्या जोडीला मदत करणारे त्याच्यामागें त्याचे साथी-दारहि असंख्य आहेत. याना मझ्दधर्मात 'दएव' असें म्हणतात 'दएव' हे पुरुष राक्षस आहेत त्याच्या जोडीला स्त्री–राक्षसहि आहेत त्याना 'द्रुज' असें म्हणतात ज्याप्रमाणें मझ्दप्रभूला मदत करणारे दिव्य विबुध–यझत्–आहेत, त्याचप्रमाणें या अग्रमइन्यूचीहि गोष्ट आहे आता त्याच्या

प्रभावळींतील काहीं प्रमुख प्रमुख दएव व द्रुज याची थोडीशीं ओळख करून देतों.

## अकोमन

अहुरमझ्दला जसा 'वोहुमनो' तद्वत् या अंग्रमइन्यूला हा अकोमन होय. तो एक महाप्रबल दएव ( राक्षस ) असून अंग्रमइन्यूनें त्याला अध.कारापासून निर्माण केला अर्थात् त्याची उत्पत्ति अज्ञानरूपी अंधः-कारापासून झाली असल्यामुळें तो तमोगुणाची गाळीव मूर्ती असून ज्ञानाचा कट्टा शत्रू व पट्टीचा परमदुष्ट असा दएव-चमूंतला महाप्रबल राक्षसा-ग्रणी आहे. अंग्रमइन्यूच्या खालोखाल दुष्टपणात याचाच क्रमांक लागतो.

वोहुमनो हा मनुष्याना सद्बुद्धि देऊन त्याना स्वर्गाकडे नेणारा असा पवित्र देवदूत असून त्याच्याविरुद्ध अकोमन हा पापबुद्धि-दुष्टबुद्धि-देऊन त्याना दुःखाच्या डोहात लोटून देणारा-नरकात नेऊन गाडणारा-असा महानष्ट व अधमाधम राक्षस आहे. मनुष्य हा पापकर्मास प्रवृत्त होतो-असत्य मार्गाकडे वळतो-अनीतीच्या भरीस पडतो-तो या अधम राक्षसाच्या प्रेरणेनें व प्रोत्साहनानेंच होय त्याच्या हातून पापकृत्यें घडतात अनाचार माजतो-नानात हेचें अपराध घडतात. व व्यसनें जडतात-याला या अकोमनाचीच फूस व प्रोत्साहन कारण म्हटलें तरी चालेल.

तसें पाहिलें तर मनुष्याचें मन प्रथम आरशाप्रमाणें स्वच्छ व पाण्या-प्रमाणें निर्मळ असतें. तेथें जसा भरावा तसा रंग उमटतो. चांगलें बीज पेरलें तर मधुर फळें येतात आणि वाईट पेरल्यास वाईटच येतें. तद्वत् या मनाचीसुद्धा गोष्ट आहे. त्या शुद्ध व निर्मळ मनांत हा दुष्ट राक्षस प्रवेश करून त्यावर अज्ञानरूपी गाढ अंधार पसरून भ्रामक गुणाची

मोहिनी घालून तेथें दुर्वासनेची—पापवासनेची पेरणी करतो याचेळी तो वोहुमनास मार्गे रेटून, मनावर आपला पगडा बसवून विवेकबुद्धीला निस्तेज व निर्बल करून टाकतो यामुळें ती विवेकभ्रष्ट बुद्धि मोहमूढ व अज्ञानग्रस्त मनाच्या स्वाधीन होते आणि मग तें मन पापवासनेनें प्रेरित होऊन बिचाऱ्या मोहमूढ जीवास दुष्कृत्यास—दुराचरणास—प्रवृत्त करतें. अर्थात् तो विवेकभ्रष्ट प्राणी सन्मार्गापासून चळून, वाटेल तीं पापकर्मे करून अखेर नरकाचा धनी बनतो ! हा अकोमन राक्षसाचा प्रभाव होय

हा अकोमन राक्षस सर्व राक्षसगणात अग्रणी असल्यामुळें व पाप—बुद्धीचा मूर्तिमत पुतळाच असल्यामुळें सत्यधर्माचा व सद्विचाराचा सर्वा—धिकारी वोहुमनोस मार्गे रेटून, मनाला सर्वस्वी आपल्या ताब्यात घेऊन मनुष्याला अखेर तो पापी चांडाळ दुःखभागी करण्यास मार्गेपुढें पहात नाहीं एकदा तर त्यानें महाभाग झोरोष्टरासहि गाठलें होतें त्याचा प्राण घेण्यास अग्रमइन्यूनें मसलत करून, त्या कार्यांत हुज बुद्ती या महाक्रूर राक्षसीची योजना केली आणि तिला या कामीं मदत करण्यास या अकोमनची जोड दिली त्या दोघांनीं झोरोष्टरास पुष्कळ छेडलें पण त्या मझ्दमक्तापुढें त्याचें काहीं चाललें नाहीं उलट 'अहुनवइर्य' या महा—मन्त्राच्या दिव्य प्रयोगानें व प्रभावानें त्याची भंबेरी उडून त्यानीं तेथून किंचाळत पळ काढला याविषयीं मागें थोडीशी माहिती आली आहे असो याप्रमाणें हा दुष्ट राक्षस जगात शिरून धुडगूस घालीत विषयमूढ जीवांना सारखा छळत व छेडीत राहणार पण प्रळयकाळीं जेव्हा याचीच वोहुमनची झुज होईल, तेव्हा पड खाऊन या क्रूर प्राण्याला प्राणास मुकावें लागणार, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी सत्य व स्पष्ट असून, तसा मझ्दधर्माचा निर्वाळा आहे

# अएश्म

हाहि तामस सृष्टींतील एक मोठा क्रूर राक्षस आहे. तो क्रोधाचा मूर्तिमंत गाळीव पुतळा म्हटलें तरी चालेल. मज्दप्रभूच्या प्रमुख यझतांतला स्रओश नामक एक यझत् असून, तो मज्दधर्माचा महोपदेशक असून, त्याच्या धर्माचा तो संरक्षक, संचालक व प्रसारक आहे. या स्रओश यझताचा हा 'अएश्म' राक्षस प्रबल प्रतिस्पर्धी असून, त्याचा कट्टा शत्रु आहे. या धर्मोपदेशकाच्या दुष्ट, क्रूर व क्रोधिष्ट दएवाला जमीनींत गाडून टाकण्यास पुण्यात्मा झोरोष्ट्रनें आपल्या अनुयायास आग्रहाचा आदेश दिला आहे- (यस्न ४८–७). तो अनाठायीं आहे असे कोण म्हणेल ? कारण मन एकदा क्रोधाच्या आहारीं गेलें म्हणजे, तेथें ज्ञानाचा प्रकाश उजळत नाहीं. विवेकाची मात्रा चालत नाहीं. हें स्पष्ट असल्यामुळें अशा दुष्ट महापासून दूर राहण्याचा इशारा देण्यांत अनुभवसिद्ध सत्य आहे, हें कोण सूज्ञ मनुष्य नाकारील ?

हाच भावार्थ श्रीकृष्ण भगवंतांनीं गीतेंत मोठ्या सुंदर व मार्मिक वचनात अभिव्यक्त केला असून तो आमच्या पारशी बांधवास उद्बोधक होईल म्हणून त्याचा येथें मूळ वचनातच उल्लेख करतो. भगवान श्रीकृष्ण म्हणतात 'काम, क्रोध व लोभ अशी ही त्रयी नरकाचे द्वार आहे त्याच्या पार्टेस जाऊ नये। अरे अर्जुना ! 'काम एषः क्रोध एष रजोगुण समुद्भवः। महाशनो महापाप्मा' जहि पाप्मानमेनम् या दुष्ट पापात्म्याला ठार मारून टाक. काम झाला काय अथवा क्रोध काय, हे रजोगुणोद्भव असून मोठे खादाड व पापी आहेत. क्रोध हा काहीं निराळा व नवखा रिपु नसून कामविफल झाला म्हणजे तोच क्रोधानें रूप धारण करतो.

या काम–क्रोधाचा तडाखा कसा आहे हें ज्ञानेश्वर महाराजांनीं ज्ञानेश्वरींत मोठ्या मार्मिक व ढसकेबाज शब्दानी विशद करून सांगितलें

आहे तें आमच्या प्रिय व सूज्ञ पारशी बंधूना मोठें बोधप्रद होईल. त्याचा येथें मूळ शद्वातच उल्लेख करीत आहोत **अर्जुना हे तरी कामु क्रोधु पाहीं। जयांते कृपेची सांठवण नाहीं। हे एतांताच्या ठायीं। मानिजती ॥२४०॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरीचे वाघ। भजन मार्गीचे मांग। मारक जे २४१॥ हे जळेवीन बुडविती। अग्नीवीण जाळिती। न बोलतां कवळिती। प्राणियांते ॥२५७॥ हे शस्त्रेवीन सांधिती। दोरेवीण बांधिती। ज्ञानीयासी तरी वधिती। पैज घेऊनी ॥२५८॥** हे ज्ञानेश्वरदेवाचें वचन सर्व विचारी जगास मान्य व मजूर आहे. असो म्हणून अष्टपैलू व अष्टविधानी महर्षि झोरोष्टरनीं हा भारतीय तत्ववेत्याचाच पथ्यकर सल्ला आपल्या अनुयायास दिला आहे तें यथायोग्य झालें

## दुज

या अग्रमइन्यूच्या गटात केवळ दएवांचा म्हणजे राक्षसांचाच भरणा आहे, असें नसून त्यात राक्षसींचादि समावेश होतो पुरुष राक्षसाना 'दएव' व स्त्री राक्षसाना 'दुज' अशी संज्ञा असून 'दएव' पेक्षा 'दुजा'ना त्याच्यांत विशेष महत्व आहे मनुष्यातील सर्व प्रकारचा दुष्टपणा व पापप्रवृत्ति, दुर्विचार व दुर्वासना, दुर्वर्तन व दुर्भाषण इत्यादि सर्व दुर्विकाराची ही दुजजात ओतीव मूर्ति आहे हेंच दुसऱ्या शद्वात सागावयाचें म्हणजे दुष्टपणा, फसवणूक, अमगलपणा, नीतिभ्रष्टता, रोगराई, ताप–पीडा, दुष्काळ–अवर्षण, क्रोध, द्वेष, मद, मत्सर, मोह, चुरस, तहान–भूक इत्यादि दुर्विकाराची ही जात प्रत्यक्ष प्रतीक आहे वरील सर्व दुर्गुणाची मानवी मनात पेरणी करून त्याना छळणें व सतावणें या

कार्यात त्यांचा हात धरणारा दुसरा असा कोणीच नाहीं. मनुष्यात सुष्ट व दुष्ट असे दोनहि प्रवृत्तीचे लोक आढळतात. त्यात जे सुष्ट आहेत ते मझ्दच्या बाजूचे व जे दुष्ट आहेत ते अंग्रमइन्यूच्या बाजूचे असे हे परस्पर विरोधी पक्ष असून त्याच्यात नेहमी चुरस व संघर्ष चाललेला असतो.

द्रुज ही रूपरहित अशी सूक्ष्म व क्रूर सृष्टि असून तिला गृहपति हा घरातून पिटाळून लावण्यासाठी अशवहिस्त या मझ्दप्रभूच्या दिव्य प्रतिनिधीची प्रार्थना करीत असतो. या द्रुजाच्या निवासस्थानातच या सर्व राक्षसमंडळीची मसलत भरते व तेथेंच सर्व मसलती व खलबतें चालत असतात. या द्रुजाची संख्या असख्य असून त्यातील काहीं महत्वाची नावें व त्याची कार्यें याचा गोषवारा खाली थोडक्यात देतो.

**द्रुजनसुः**— ही डाकीण जगात अमंगलपणा, अपवित्रपणा, गलिच्छपणा जितका म्हणून भरला आहे त्या सर्वांचें उगमस्थान आहे. मनुष्यात रोगराई, ताप व साथ, आजार व पीडा इत्यादि उत्पन्न करण्याची कामगिरी या बाईकडे आहे. ही चांडाळीण माशी होऊन सडलेल्या प्रेतावर बसून तेथून घाण व रोगजंतु घेऊन जगात पसरविण्याचें दुष्कार्य करण्यात मोठी पटाईत आहे.

**द्रुज तरोमइति :**— गर्विष्ठपणा, ताठरपणा, आत्मश्लाघीपणा, दुराभिमान, दुराग्रह इत्यादि कामगिरी बजावण्याचें खातेहि हिच्याकडे आहे.

**द्रुज तयुरी :**— ही राक्षसी ताप, पीडा, आजार, उत्पन्न करणारी असून ' हउर्वतात ' या मझ्दप्रतिनिधीची प्रतिस्पर्धी आहे.

**द्रुज झहरिषः**—ही मनुष्यांत तहान व भूक उत्पन्न करून मनुष्याना नित्य छळणारी व सतत सतावणारी असून ती ' अमेरेतात ' ची प्रतिस्पर्धी आहे.

**द्रुज कुद :-** ही नरकाच्या दारात उभी असून पापी लोकांना ओढून त्यात लोटून देते.

**द्रुज युद्दती :-** ही मायावी व मोठी क्रूर व खुनशी राक्षसी असून झोरोष्टरचा प्राण घेण्याच्या कामगिरीवर इची नेमणूक झाली होती.

याशिवाय इतर अनेक दुष्कर्मं करणारे राक्षस व राक्षसी-दएव व द्रुज-आहेत. त्या सर्वांचा येथें निर्देश करणें अनवश्यक असल्यामुळें तो भाग येथेंच सोडून देतो.

## मुख्य संस्कार

वैदिक धर्मात जसे धार्मिक संस्कार आहेत, त्याचप्रमाणें झोरोष्टर धर्मातहि आढळतात मुख्य मुख्य बाबतींत झोरोष्टर धर्म हा वैदिक धर्माला सोडून मुळींच नाहीं दोहोंत विलक्षण साम्य आहे. आचारात काय, विचारात काय, उच्चारात काय, दोघेहि हातात हात घालून वाटचाल करूं लागतात वैदिक धर्मात सोळा सस्कार सांगितलें आहेत. पण झोरो-ष्टर धर्मात फक्त तीनच नाव घेण्यासारखे आहेत एक नवझोत, दुसरा विवाह व तिसरा प्रेतकर्म याशिवाय इतर काहीं संस्कार असले तरी ते किरकोळ असून काहीं विशिष्ट लोकानाच ते लागू आहेत म्हणून त्याच्या वाटेस न जाता फक्त वरील तीन सस्काराचाच येथें परामर्श घेतो

**नवझोत :-** झोरोष्टर धर्मातला पहिला व प्रमुख संस्कार म्हटला म्हणजे नवझोत हा होय. वैदिक धर्मात उपनयनाला जें महत्व व जें पावित्र्य आहे तेवढेंच महत्व नि तेवढेंच पावित्र्य या संस्काराला झोरोष्टर धर्मात आहे. वैदिक आर्यांला द्विजत्व प्राप्त होण्याला-म्हणजे तो धर्म-क्षेत्रांत अधिकृतरीत्या प्रपदार्पण करण्याला-उपनयन संस्कार हा जसा

आवश्यक आहे, तशीच गोष्ट या नवज्झोत संस्काराची आहे. हा संस्कार झाल्याशिवाय माणसाला मझ्दप्रभूच्या धर्माचरणाला अधिकारच पोंचत नाहीं व तो झोरोष्टरचा अनुयायीहि होऊं शकत नाहीं. नवज्झोत याचा अर्थच असा कीं, मझ्दप्रभूचा नवा उपासक, झोरोष्टरचा नवा अनुयायी व झोरोष्टर समाजाचा नवा घटक. अर्थात् नवज्झोत म्हणजे नवा जन्म, पवित्र-जन्म, द्वितीय जन्म. त्याशिवाय मझ्द–धर्मांत कसलेंच स्थान नाहीं. म्हणून हा संस्कार झोरोष्टरपंथी बनायला अत्यवश्यक असून हा स्त्रीपुरुषांना दोघांसहि सारखाच लागू आहे.

मुलाला अगर मुलीला झोरोष्टर 'पथात' प्रवेश मिळण्यासाठीं म्हणून हा नवज्झोत संस्कार प्रथम करण्यात येतो. हा संस्कार झाला म्हणजे तो झोरोष्टर धर्मांत पदार्पण करून त्याचें आचरण करण्यास लायक झाला. हा संस्कार सातव्या वर्षी करण्यात यावा असा त्या धर्माचा सर्व-साधारण दंडक असून, त्याची कालमर्यादा पधरा वर्षांपर्यंत असते. हीच कालमर्यादा वैदिक धर्मांतहि आहे. नंतर तो मात्य गणला जातो. असो

या संस्काराच्या शुभ दिवशीं मुलाला प्रथम मंगल स्नान घालून त्याला शुभ्रवस्त्र पाघरावयास देतात. ठरलेल्या वेळीं आप्तइष्ट व पुरोहित मंडळी संस्काराच्या ठिकाणीं जमल्यावर तेथें त्याच्यासाठीं ने[illegible] आस-नावर पुरोहित मांडी घालून बसतो. व त्याच्यासमोर मु[illegible] आणून बसविण्यात येतें. त्याठिकाणीं एका तबकांत शुभ्र सदरा (अंगात घाला-यांचें कुडतें) व कुस्ती (कमरेसभोंवतीं गुंडाळण्याची शुभ्र लोकरीची वळलेली दोरी) बटूला घालावयासाठीं म्हणून आणून ठेवतात. त्याच्या-शेजारीच दुसऱ्या एका तबकांत तांदूळ, तिसऱ्यात फुलें, एक तुपाचें नीरांजन, गंध व इतर सुगंधी पदार्थांनीं झगझगीत पेटविलेला अग्नि, आणखी

एका तबकात तांदूळ, डाळिंबाचे दाणे, बदाम, नारळाचे काप या सर्वांचें मिळून केलेलें मिश्रण याप्रमाणें साधनसामग्री तेथें आणून ठेवण्याची व्यवस्था होते पहिल्या तबकात सदरा—कुस्तीबरोबरच विड्याचीं पानें सुपारी, खडी साखरेचे खडे, तांदूळ, नारळ, फुलांची माळ, कुंकवाची वाटी व कांहीं नाणीं हीं ठेविलीं जातात अर्थात् हीं नाणीं पुरोहिताला दक्षिणा म्हणून संस्काराच्या शेवटीं देण्यात येतात

कार्यास प्रारंभ झाल्यावर पुरोहित हा तबकात ठेवलेला सदरा घेऊन बटूच्या हातात देतो व त्यावेळीं 'पतेत' मंत्र म्हणून त्याला मझ्द प्रभूवर आपली पूर्ण श्रद्धा व भक्ती आहे असें जाहीर करण्यास सागतो व त्याप्रमाणें तो बटू बोलून दाखवून आपली समति प्रदर्शित करतो नंतर अहुरमझ्दयस्त, हा मंत्र म्हणण्यात येतो त्याचा भावार्थ असा आहे — अहुरमझ्दप्रभूचा पवित्र धर्म हा सत्यपूर्ण, ज्ञानधन व सर्व मंगल असून तो भगवतानें महात्मा झोरोष्टरामार्फत जगास जाहीर केला आहे आणि त्या झोरोष्टर महर्षीनें तो त्या प्रभूच्या आदेशानुसार येथें मनुष्याना उप-देशिला आहे

याप्रमाणें बटूनें आपली इच्छा जाहीर केल्यावर पुढचा विधि म्हणजे त्याला अंगात घालण्यास सदरा देणें हा होय हें करताना पुरोहित हा उठून पूर्वेस तोंड करून उभा राहतो बटूहि त्याच्यापुढें पूर्वेस तोंड करून उभा राहतो कारण पूर्व ही सूर्याची दिशा असून ती पवित्र मानली जाते हा क्रम तो संस्कारविधि सकाळीं होत असला तर पाळण्यात येतो सध्याकाळीं होत असला तर पश्चिमेस तोंड करून उभें राहिलें पाहिजे असो यावेळीं पुरोहित अवेस्तातील 'यझतदीन'ची 'अुमन' नामक प्रार्थना, मंत्र व झोरोष्टर धर्म स्वीकारल्याची 'पझड' नामक प्रार्थना म्हणून बटूनें झोरोष्टर धर्म स्वीकारल्याची कबुली दर्शविल्यावर

विवाह :– झोरोष्टर धर्म याची जवळ जवळ वैदिक धर्माला धरून चालचाल करीत आहे, हें आतापर्यंतच्या विवेचनावरून कल्पना करण्यास फारशी अडचण दिसत नाहीं. आतां येथेंच पहा. वैदिक धर्माप्रमाणें विवाहाला झोरोष्टर धर्मांतहि प्राधान्य देण्यात आलें आहे, हें आता उघड सांगावयास नकोच. किंबहुना वैदिक धर्मापेक्षाहि त्याला अत्यंत महत्वाचें स्थान देण्यात आलें आहे असें सांगितल्यास त्याला अतिशयोक्तीचा वास मुळींच येणार नाहीं. अहुरमज्दप्रभु झोरोष्टरला स्पष्ट व चक्क सांगतो कीं, हे झोरोष्टरा ! अविवाहित मनुष्यापेक्षा विवाहित मनुष्यच मला अधिक पसंत व प्रिय आहे. आणि तसेंच हेंहि पण सांगतों कीं, संततीहीन मनुष्यापेक्षा लेकुरवाळा गृहस्थच मला सर्वांत प्रिय आहे ! (वेंदिदाद). तोच भावार्थ इतरत्र दुसऱ्या शब्दात सांगण्यात आला आहे त्याचा आशय असा– 'ज्या घरात अग्नि, पत्नी, मुलें, पशु व इतर सज्जन परिवार नांदत आहे, तेथेंच सुखशांतीचा मंगलवास सदैव असतो.' (वेंदिदाद, ३–२) यावरून त्या धर्मांत गृहस्थधर्माला केवढें प्राधान्य व महत्व देण्यात आलें आहे, हें निराळें सांगणें नकोच.

दुसरी गोष्ट सांगावयाची म्हणजे त्या धर्मांत सन्यास–आश्रम नाहीं. म्हणजे भिक्षेवर उदरनिर्वाह करणें किंवा आजन्म ब्रम्हचर्य पाळणें दोन्ही गोष्टी त्यास निषिद्ध आहेत. थोडक्यात म्हणजे योग्य कालीं विवाह करून धर्मपत्नीबरोबर संसार थाटून सद्गुणी संतति निर्माण करून जगभर मज्द–धर्माचा प्रसार करीत गृहस्थाश्रमाचें पवित्र जीवन कंठावें असा त्याचा मुख्य कटाक्ष आहे. यावरून 'कृण्वन्तो विश्वमार्य' या वैदिक वचनाची आम्हा हिंदूस आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

मज्दप्रभूनें अविवाहित मनुष्याला निषिद्ध मानलें आहे. तसाच भावार्थ याज्ञवल्क्य गुरुदेवानी आपल्या शतपथ ग्रंथात मोठ्या मार्मिक

रीतीनें उमटविला आहे. तें वचन हें असें आहे 'अर्धो ह वा एष आत्मनो यज्जाया, तस्माद्यावज्जायां न विन्दते नैव तावत्प्रजायते सर्वोहि तावद्भवति, यदैवजाया विन्दते तर्हि सर्वो भवति' (शतपथ ५–२–१–१०) भावार्थ– मनुष्य जोपर्यंत विवाह करून धर्मपत्नी मिळवीत नाहीं, तोपर्यंत प्रजोत्पत्ती करण्यास तो अनाधिकारी असल्यामुळें अपूर्णच आहे अर्थात् विवाहित स्त्रीपुरुषाच्या संततीलाच प्रजा ही संज्ञा आहे हें यावरून स्पष्ट होतें. असाच उद्देश मझ्दप्रभूचाहि आहे, हें त्याच्या वरील 'वेंदिदाद' मधील उद्गारावरून सहज स्पष्ट होतें. असो.

एवंच, जो झोरोष्टरपंथी आहे त्यानें लग्न करून, तद्वारा योग्य संसार थाटून सद्गुणी संतति निर्माण करणें व अग्निद्वारा मझ्दप्रभूची उपासना करून त्याचा अनुग्रह मिळविणें, हें त्याचें मुख्य जीवितकर्तव्य आहे यावरून हें उघड आहे कीं, प्रपंच व परमार्थ या दोन्ही गोष्टी जो साध्य करून घेईल त्याचाच मानवजन्म सफल व कृतकृत्य असें मानणारा तो धर्म आहे. अर्थात् वैदिकाप्रमाणेंच 'धर्मप्रजारत्यर्थोहि विवाह.' हें त्याचें मुख्य ध्येय असून त्याप्रमाणें जो चालतो तोच मझ्दप्रभूचा आवडता भक्त ठरतो, हें सांगण्याचें तात्पर्य

मात्र एक गोष्ट येथें नमूद करावीशी वाटते ती ही कीं, वधु पटावयाची ती अगदी जवळच्या नात्यातली असली, तरी ती नितकी जव ळची असेल तितकी ती प्रशस्त. अहुरमझ्द म्हणतो कीं, जे जवळच्या नात्यातील स्त्रीशीं लग्न करतात, तेच मला अधिक प्रिय आहेत. ( विस्परेद, ३–१८ ). याचा भावार्थ असा कीं, प्रत्यक्ष भावाबहिणींमध्यें नसलें तरी चुलत भावाबहिणींत विवाह संबंध जोडण्यास मुळींच हरकत नाहीं. आणि हें पाहिलें म्हणजे ऋग्वेदातील दहाव्या मंडळात यमयमी

या भाऊ-बहिणींत झालेला संवाद तत्कालीन अर्थसूचक आहे असें म्हणणें प्राप्त होतें. असो.

झोरोष्ट्र धर्मात विवाहाचा योग्य काल पंधरा वर्षांचा म्हणून सांगण्यांत आला आहे. त्याच्या आंतला काल प्रशस्त मानला जात नाहीं. पुढील काल चालतो. वैदिक धर्माची देखील हीच प्रथा होती हें आमचे बहुश्रुत वाचक जाणतातच. पारशी धर्मात विवाहविधीचे एकंदर तीन टप्पे पडतात. (१) वधूवरांना आशीर्वाद (२) वधूवरांची लग्नास संमति (३) वधुवरांना उपदेश. असे हे विवाहाचे टप्पे आहेत.

वधूवरांना आशीर्वादः— विवाहाच्या दिवशीं वधूवरांना प्रथम न्हाऊं घालण्यांत येतें. हा विधि झाल्यावर उभयपक्षाची आप्तइष्ट मंडळी विवाहस्थानीं जमतात. पुढें वधूवर तेथें उपस्थित झाले म्हणजे पुरोहित त्यांना उद्देशून पुढीलप्रमाणें शुभ आशीर्वाद देतो. तो आशीर्वाद असाः— तो जगन्नाथ, सर्वेश, महाप्रभु अहुरमझ्द तुम्हा जोडप्यांस उत्तम पुत्रपौत्रादिक संतति देवो ! तुम्हाला सुखांत संसार करतां यावा म्हणून धनधान्यादि समृद्धि देवो ! सुदृढ व टिकाऊ असें शरीरसामर्थ्य देवो ! आणि दीडशे वर्षांचें उदंड आयुष्य नि अखंड आरोग्य देवो !

या आशीर्वादप्रसंगी वधूवर व त्याचे साक्षीदार यांचेकडून पुढील प्रमाणें अभिवचन घेण्यांत येतें. प्रथम वरपक्षाकडील साक्षीदारास पुढील प्रश्न विचारण्यांत येतो. 'सासानियन कुलोत्पन्न पुण्यश्लोक यझ्दगार्द शकाच्या अमक्या वर्षी, अमक्या महिन्यांत, अमक्या दिवशीं, अमुक गांवीं, जमलेल्या त्यांच्या इष्टमित्रासमक्ष तुम्ही सांगा कीं तुम्ही अमुक नांवाच्या वधूला अमुक नावाच्या वराशीं मझ्दयस्तन धर्माप्रमाणें तिला चांदीची दोन हजार दिरम व सोन्याच्या दोन दिनार नाणीं देण्याचें वचन दिलें आहे काय ?

या दोन्ही प्रश्नांना 'होय आम्ही तसें ठरविलें आहे' असें तो साक्षीदार उत्तर देतो

नंतर वधूवरांना आशीर्वाद देण्यात आल्यावर पुन तो पुरोहित वधूच्या साक्षीदाराकडे वळून त्याला पुढीलप्रमाणें प्रश्न विचारतो 'तुम्ही व या वधूच्या घराण्यातील आतइष्ट मंडळी शुद्धमनानें व पवित्र अंत कर-णानें पवित्र धर्म संवर्धनार्थ या वधूला या वराशीं विवाह करून देण्याचें ठरविलें आहे काय? व त्याला तुमची संमति आहे काय? याला तो साक्षीदार व ती मंडळी होकारार्थी उत्तर देतात

नंतर पुन वधूवरांना आशीर्वाद देण्यात आल्यावर नंतर तो पुरो हित वधूवरांना उद्देशून पुढील प्रश्न विचारतो तुम्ही दोघांनीं विवाह करून आमरण एकत्र राहून दांपत्य धर्माचें परिपालन करण्याचें शुद्ध मनानें व निर्मल अंत करणानें ठरविलें आहे काय? व तें तुम्हास मान्य आहे काय? याला तीं वधूवरें मान हलवून होकारार्थी उत्तर देतात

याप्रमाणें तेथें जमलेल्या आमंत्रित मंडळीसमक्ष वरीलप्रमाणें उभय पक्षाचे साक्षीदार, तीं वधूवरें, त्यांचे नातलग यांजकडून संमति-दर्शक अभिवचन घेऊन पुढें दोन्ही पक्षाचे पुरोहित वधूवराचें अभीष्ट चिंतन करतात यावेळीं त्या वधूवरांना दांपत्य सुख लाभावें म्हणून व त्याबरोबरच संपत्ति, आयुष्य व आरोग्य देण्याविषयीं अहुरमझ्द, अमेशा स्पेंत व यझत यांची प्रार्थना करण्यात येते या आशीर्वाद प्रसंगीं व वरील प्रार्थनेच्या वेळीं पुरोहित लोक मधून मधून त्या वधूवरांवर शुभमंगल ताद-ळाच्या अक्षता उधळीत असतात

यानंतर मुख्य पुरोहित त्यांना उद्देशून पुढीलप्रमाणें उपदेशवजा बोधप्रद भाषण करतो 'नवपरिणित वधूवरांनो! तुम्ही एकमेकांशी तन

भांडण न करता पुढील सांसारिक आयुष्य गुण्यागोविंदानें व गोडीगुलाबीनें कंठत जावें. एकमेकांशीं प्रेमानें व प्रामाणिकपणें नांदावें. वाईट लौकिकाच्या लोकाच्या संगतीस लागू नये. मदचालीच्या माणसांशीं वादविवाद करण्याच्या भरीस न पडावें. सभेंत बोलतांना काळजीपूर्वक व विचारपूर्वक बोलावें ! राजासमक्ष बोलतांना केव्हांहि मितभाषणी असावें !

यापुढें आणखी थोडें उपदेशवजा भाषण केल्यावर शेवटचा आशीर्वाद देण्यात येतो तो असा– या नूतन जोडप्याच्या अंतःकरणांत सद्धर्माचा सुंदर प्रकाश उजळो ! त्यांचा लौकिक सर्वत्र वाढो ! त्यांना शक्ति व आरोग्य लाभो ! सुखानंदाचा सतत वर्षाव करणारी सौभाग्यसंपत्ती व बुद्धिमान व सद्गुणी प्रजा याचा लाभ होवो ! तसेंच उदंड आयुष्य व सज्जनाना प्राप्त होणारा दिव्य आनंद याचा याना लाभ होवो !

हा आशीर्वाद म्हणून पुरा झाल्यावर विवाहाचा मुख्य धार्मिक विधि आटपण्यात येऊन पुढें लौकिक आचारास प्रारंभ होतो. हा पारशाचा विवाह दिवसा न होतां रात्रीं करण्याचा परिपाठ आहे. याप्रमाणें विवाहाचा समारंभ आहे. असो.

## मृताचे संस्कार

प्रेत संस्कारः– वैदिकाप्रमाणेंच पारशातहि मृताचा प्रेत संस्कार सांगितला आहे. अर्थात् तो दोन प्रकारचा आहे. एक प्रेताला उद्देशून व दुसरा मृताच्या जीवात्म्याला उद्देशून. पैकीं मृताच्या शरीरास उद्देशून जी क्रिया करावयाची, तिचा तपशील थोडक्यात असाः– पुढें जाव– याच्या पूर्वी प्रथम येथें हें सांगितलें पाहिजे कीं, पारशाची प्रेतक्रिया हिंदू अगर इतर धर्मीयांपेक्षा कांहीं अंशीं निराळी आहे. ते लोक प्रेत जाळीत

नाहींत. अगर पुरत नाहींत. किंवा पाण्यात बुडवीत नाहींत हें सर्व करणें ते निषिद्ध मानतात. याचें कारण ते असें सांगतात कीं, अग्नि, पृथ्वी, उदक व वायु हीं सर्व पवित्र असून तीं पवित्रच राखण्यात आलीं पाहिजेत. आणि तसें राखण्याविषयी त्यास त्या धर्माची स्पष्ट व सक्त आज्ञा आहे.

आता प्रस्तुत विषयाकडे वळतो मनुष्य मेल्यावर त्याच्या प्रेताची योग्य व्यवस्था लावण्याची व त्याच वेळेला अग्नि, पृथ्वी, पाणी इत्यादिकाना त्याचा उपसर्ग न पोंचेल अशी खबरदारी घेण्याची सक्त ताकीद देण्यात आली आहे. (वेंदिदाद, ३–२७) म्हणून पारशात प्रेत जाळण्याची, पृथ्वीत पुरण्याची, पाण्यात बुडविण्याची प्रथा नाहीं कारण तसें करणें निषिद्ध, इतकेंच नव्हे तर धार्मिक गुन्हा आहे असे ते मानतात. अतएव जो कोणी त्याच्यात मृत झाला असेल, त्याचें प्रेत नऊन, जेथें पाणी नाहीं अगर वृक्षलतादिक नाहींत, अशा माळ जागेवर नेऊन उघड्यावर ठेवून देण्याची धर्माज्ञा आहे (वेंदिदाद, ३, ५१–५२). त्यातल्यात्यात प्रेत ठेवण्याला प्रशस्त ठिकाण म्हणजे उच डोंगरमाथा होय. आणि तेथें तें उघडें टेवून दिलें म्हणजे मासभक्षक गिधाडें, घारी, कावळे, कुत्रे तेथें जमून निर्भयपणें तें अल्पकाळात फाडून, भक्षण करून, नुसता हाडाचा सापळा तेवढा शिल्लक ठेवतात (वेंदिदाद ६–४५).

मनुष्याच्या शरीरातून प्राण निघून तें प्रेत झालें आहे, अशी खात्री पटल्यावर पुढें त्या प्रताला स्वच्छ स्नान घालून, त्याला वस्त्रानें गुडाळण्यात येतें. पण तोंड व कान हे उघडे ठेवण्यात येतात शुभ्र पादऱ्या वस्त्रानें झाकण्यात आल्यावर तोंडानें प्रार्थना म्हणून त्याच्या सभोंवतीं कमरेंत कुस्ती गुडाळतात. नतर तें प्रेत घरातील बाहेरच्या खोलींत आणून

तेथें एका कोपऱ्यात शिळेवर अगर वाळूवर तें निजवण्यात येतें (वेंदिदाद, ६–१०७)

याप्रमाणें तें प्रेत शिळेवर अगर वाळूवर ठेवण्यात आल्यावर मग ते 'नसा सालार' नावाच्या प्रेत वाहकाच्या ताब्यात दिलें जातें प्रेत त्या नसा सालारच्या हवालीं झाल्यावर पुढें तो त्या प्रेतासभोंवतीं सळीनें अगर सिळयानें तीन वर्तुलाकार 'कश' नावाच्या रेघा ओढतो उद्देश हा कीं, या नतर त्या रेघा ओलाडून प्रेताजवळ कोणी जाऊ नये अर्थात् ती वर्तुळातील जागा फक्त त्या प्रेतासाठीं म्हणूनच राखून ठेवल्याची ती खूण होय

याननर तें प्रेत कुत्र्यास आणून त्यास दाखविण्यात येतें अर्थात् हा कुत्रा काहींसा विशिष्ट लक्षणाचा व गुणाचा असतो तो रगाने पिंगट असून त्याला चार डोळे असतात म्हणजे असें कीं, त्याच्या दोन्ही डोळयावर डोळयाच्या आकाराचे दोन्ही बाजूला दोन ठिपके असतात अशा कुत्र्याला चार डोळयाचा कुत्रा म्हणून समजण्यात येते त्याला 'चश्मचश्म' म्हणजे 'चतुश्चक्षु' (स) असें नाव आहे

या कुत्र्याचा असा एक गुण समजला जातो कीं, मनुष्य मेला का जीवत आहे हें ता अचूक ओळखू शकतो मनुष्य मेला असेल तर त्या प्रेताकडे तो मारखा टक लावून पाहू लागतो आणि मेला नसेल तर तिकडे ढुकूनहि पहात नाहीं ऋग्वेदात यमाचे चार डोळयाचे कुत्रे स्वर्गाच्या रस्त्यावर पाळत करीत असतात असें म्हटलें आहे तसाच काहींसा प्रकार पारशांतहि या कुत्र्याला लागलेला आढळून येता

याप्रमाणें तें प्रेत कुत्र्याच्या नजरेखालीं घालण्यात आल्यावर एका पात्रांत अग्नि आणून तेथें ठेवण्यात येतो व त्यात गधद्रव्य व इतर

सुवासिक द्रव्यें घालून तो चागला प्रचलित करण्यात येतो याप्रमाणें गधकाष्ठादि घालून अग्नि पटल्यावर एक पाठक त्याच्यापुढें बसून तें प्रेत घराबाहेर नेईतोपर्यंत अवेस्तातील काहीं मत्र पठण करू लागतो आणि तो अग्नि मधून मधून जळण घालून सारखा धगधगीत ठेवण्याची काळजीहि घेतो प्रत दिवसा कव्हांहि बाहेर नेण्यास हरकत नाहीं पण रात्रीं नेण्यास मात्र सक्त मनाई आहे याचें कारण असें कीं, तें फक्त सूर्यप्रकाशातच उघडें ठेवावयाचें असते कारण तशी धर्माज्ञा आहे

प्रेत बाहेर न्यावयाच्या आधीं एक तास अगोदर वर सांगितल्या–प्रमाणें दोन प्रेतवाहक याना नसा सालार' असें म्हणतात–शुभ्र रगाचा पोषाख करून घरात प्रवश करतात याचें काम फक्त घरात व स्मशाना–तच असतें घरातून स्मशानापर्यंत प्रेत वाहून नेणारे निराळेच असतात त्याना 'खदिया' हें नाव आहे वरील 'नसा सालार' हे लोखडाची प्रेत वाहक 'गेहान' घरात प्रताजवळ आणून त्याच्या शेजारी ठेवून, मनातल्या मनातच काहीं शब्द पुटपुटून मौन धारण करून पुढें तें प्रेत उचलून स्मशानात अगर शाति शिखरावर नेऊन तेथें त्याची पूर्ण वाट लावल्यावर मग तोंड उघडतात तोपर्यंत मौन पाळतात

नतर 'गेह–सर्न' नावाचा विधि करण्यात येतो यावेळीं जे मत्र म्हणण्यात येतात त्याचा भावार्थ असा असतो कीं, मृताचे जे सबधिक असतात त्यानीं विवेक करून मृताचें विरह दु ख शातपणें सहन करावें हा गेहसर्न विधि आटपल्यावर तें प्रेत पुन त्या कुत्र्याच्या नजरेखालीं घालण्यात येतें हें झाल्यावर त्या मृताचे आप्त इष्ट, सोयरेधायरे, स्नेही-सोबती व इतर ऋणानुबधिक याना त्या प्रेताचें अखेरचें दर्शन कर–विण्यात येतें यावेळीं जे कोणी त्याचे जवळचे नातलग व आमइष्ट

असतील ते त्या प्रेतापुढें येऊन त्याला आदरपूर्वक नमस्कार करून तेथून निघून जातात

याप्रमाणें मृताचें आप्तइष्टांनीं शेवटचें दर्शन घेतल्यावर प्रेतवाहक प्रेताजवळ जाऊन, त्याचे उघडें असलेलें तोंड आता शुभ्र वस्त्रानें गुंडाळून झाकून तें प्रेत तेथून उचलून घराबाहेर गेहानवर आणून ठेवून त्याला शुभ्र कापडाच्या पट्टयानें घट्ट बांधून तें उचलून घराबाहेर आणून ठेवितात. नतर तें प्रेत स्मशानाकडे नेण्यासाठी शुभ्र पोषाख केलेल्या खदियाच्या हवालीं करण्यात येतें ते खदिया प्रेतवाहक त्या प्रेताला उचलून स्मशानाकडे नेतात. त्यावेळीं त्या प्रेताचे आप्तइष्ट, स्नेहीसोयती व ऋणानुबंधिक इत्यादि मडळी शुभ्र पोषाख करून जोडीजोडींनें चालू लागतात त्या दोघामध्यें पाढरा हातरुमाल धरलेला असतो

पुढें तें प्रेत इष्टस्थळीं पोचल्यावर त्याला खाद्यावरून खालीं उतरून जमिनीवर ठेवण्यात येतें नतर त्या प्रेताचें तोंड पुन्हा उघडण्यात येऊन तेथपर्यंत आलेली मडळी त्याचें अत्यदर्शन घेऊन त्याला दुरूनच शेवटचा प्रणाम अर्पण करून बाजूला होतात हें झाल्यावर पुन त्या कुत्र्याला प्रेताचें शेवटचें दर्शन करविण्यात येतें आता ते खदिया बाजूला होतात

नतर ' नसा सालार ' प्रेतवाहक पुढें होऊन, पुन्हा त्या प्रेताचा कपना घेतात व तें शव उचलून डोंगरमाथ्यावर अगर माळ भूमीवर किंवा मुंबईसारख्या शहरीं शाति शिखराचा दरवाजा उघडून त्याला आत नेऊन ठेवतात यानतर त्या प्रेतावरचीं वस्त्रें फाडून काढून त्याला नग्न करून सूर्य प्रकाशात दगडाच्या पर्डीवर अगर वाळू पसरून त्यावर तें प्रेत उघडें टेवून देतात ते नसा सालार बाहेर आल्यावर तेथें गिधाडें अत्ताच ते चटकन् धावत येऊन त्या प्रेतावर झटकन् झडप घालून

अल्पकाळांत त्याला फाडून खाऊन फस्त करून नुसता सापळा टाकून निघून जातात.

तसें म्हटलें म्हणजे अवेस्ता धर्माप्रमाणें प्रेत हें कोणत्यातरी एका डोंगर माथ्यावर अगर पाणी किंवा झाडझुडुप नसलेल्या माळ जमिनीवर अथवा वाळवंटावर नेऊन ठेवावयास पाहिजे. कारण तशी धर्माज्ञा आहे (वेंदिदाद, ६–४५) पण तसें स्थान सर्व ठिकाणीं सहज लाभणें शक्य नसल्यामुळें जेथें पारशाची जास्ती वस्ती आहे–म्हणजे मुंबई, पुणें इत्यादि मोठमोठ्या शहरांत–तेथें शांतिशिखरासारखें (Tower of Silence) कृत्रिमस्थान सोयीसाठीं निर्माण करण्यांत येतें असो.

अशा ठिकाणीं प्रेत आणून ठेवून तेथील सर्व विधि उरकण्यांत आल्यावर तेथून सर्व मंडळी बाहेर पडतात आणि मग त्या शांतिशिख–राचा दरवाजा कुलूप लावून बंद करण्यांत येतो. नंतर तेथील एक नोकर सगळें कार्य संपूर्ण झालें असें सुचविण्यासाठीं टाळी वाजवितो. त्यासरशी बाहेर तिष्ठत बसलेली मंडळी जागेवरून उठून 'सरोश बाज' प्रार्थना वगैरे करून तेथून परत घराकडे फिरतात. असा हा पारशाचा प्रेतसंस्का–राचा थोडक्यांत विधि आहे.

## मृताचें क्रिया कर्मांतर

वैदिकाप्रमाणेंच झोरोष्टर धर्मांतहि मृताचें क्रियाकर्मांतर करण्याची चाल आहे. पण ती वैदिकाप्रमाणें बारा दिवसाची नसून फक्त तीन दिवसाची आहे. झोरोष्टर धर्माचें असें मत आहे कीं, मनुष्य मेल्यावर त्याचा जीव या लोकीं फक्त तीनच दिवस आणि तीनच रात्र असतो.

चौथ्या दिवशीं पहाटेस तो परलोकाप्रत जावयास निघतो. या तीन दिवसात त्याच्या प्रीत्यर्थ काहीं क्रियाकर्मांतर करण्यात येतें. चौथा दिवस हा फार महत्वाचा मानला जातो त्यादिवशीं त्याचा इहलोकाचा संबंध सुटून त्याची ओढ परलोकाकडे लागते. मृताचे एकदर चार प्रकारचें कर्म धार्मिक विधि म्हणून करावयाचें असतें. चौथ्या दिवशीं करावयाच्या विधीला ' चेहरम् ' असें नाव आहे. दहाव्या दिवसाच्या विधीला 'दहम्' तीस दिवसाच्या विधीला — म्हणजे मासिकाला — ' सिरोझ ' व वर्षाच्या दिवशीं — म्हणजे वर्षश्राद्धाला—' सलरोझ ' अशी संज्ञा आहे. या सर्व क्रिया मृताच्या जीवात्म्यास उद्देशून करण्यात येतात

मनुष्य मेल्यावर तो परलोकास जाईपर्यंत त्याच्यावर सरोज यशताची देखरेख असते. त्याच्या जिवतपणीं व मेल्यावर त्याची काळजी घेऊन त्याच्यावर देखरेख करण्यासाठीं म्हणूनच मझ्दप्रभूनें त्याची नेमणूक केली आहे. अतएव मरणोत्तर पुढील क्रिया-कर्मांतर त्या सरोशाच्या नावानें व त्याच्या प्रीत्यर्थच करावयाचें असतें आणि करण्यात येतें. ' शयस्त-ल-शयस्त ' या ग्रथात स्पष्ट असें सांगितलें आहे कीं, मृताचें पहिल्या तीन दिवसाचें क्रिया कर्मांतर सर्व या सरोशाला उद्देशून व त्याच्या प्रीत्यर्थच करण्यात आलें पाहिजे. याचें कारण असें कीं, तसें केल्याने तो त्या मृताच्या जीवाचें द्रुज-दएव इत्यादि दुष्ट जीवापासून रक्षण करण्यास समर्थ होतो. असो.

'सरोशबाज, पतेत व सरोश नुमन' यांचे पठण करतात. प्रत्येक गेहास हा विधि करावयाचा असतो. यावेळीं सरोशाप्रीत्यर्थ रात्रीं 'अग्निगान' नावाचा एक विधि सांगितला आहे. तो प्रकार असा— मध्ये अग्नि व एक पाण्याचें भांडें ठेवून त्याच्या आजूबाजूस एकेक असे दोन पुरोहित अमोर समोर असे आसनावर बसतात. ज्याच्यापुढें पाण्याचें भांडें असतें, त्यास 'झवोतर' व ज्याच्यापुढें अग्नि असतो त्यास 'अतरेवक' असें म्हण- तात. प्रथम झवोतर हा सरोशाप्रीत्यर्थ अग्निगान' मंत्र म्हणून मृताम्याचें रक्षण करण्याविषयीं त्याची प्रार्थना करतो. नंतर ते दोघे मिळून सरोश यास्तातील सातवा मंत्र पठण करतात. याप्रमाणें प्रत्येक दिवशीं पाच वेळा ही क्रिया करण्यात येते.

## उथम्न विधि

पुढें तिसऱ्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं उथम्न नावाचा विधि आचर- ण्यात येतो. यावेळीं मृताचे सर्व नातलग, आप्तइष्ट, गणगोत, स्नेहीसोबती व इतर कणानुबंधिक असे सर्व लोक त्याच्या घरीं येऊन जमतात. यावेळीं करावयाची प्रार्थना कांहीं भिन्न प्रकारची असते. यावेळीं मृताचें नाव घेऊन त्याचें रक्षणार्थ व कल्याणार्थ 'सरोश हा ग्रोस्त व पतेत' हे मंत्र म्हटले जातात. त्याप्रमाणें मृताचें आप्तइष्ट, गणगोत, स्नेही सोबती इत्यादि लोक त्या मयताच्या संस्मरणार्थ म्हणून कांहीं धर्मादाय देणग्या जाहीर करतात. याप्रमाणें मयताचे क्रिया-कर्मांतर विधि तीन दिवस व तीन रात्र चालून पुढें चौथ्या दिवशीं पहाटेस तो जीव इहलोक सोडून पर- लोकाच्या मार्गास लागतो. तो प्रकार पुढील प्रकरणात देण्यात आला आहे.

# मरणोत्तर जीवात्म्याची स्थिति-गति

झोरोष्टर धर्माची शिकवण या बाबतींत वैदिक धर्मापेक्षा कांहीं अंशीं निराळीच आहे. तो धर्म पूर्वजन्म व पुनर्जन्म मानणारा नसून, मनुष्यप्राणी हा एकदाच जन्मतो व एकदाच मृत्यु पावतो, अशी त्याची शिकवण आहे. एका जन्मातच केलेल्या एकदर बऱ्यावाईट कृत्यांचें सुष्ट अगर दुष्ट परिणाम मरणोत्तर त्यास स्वर्गांत अगर नरकात जाऊन अगर पडून भोगावें लागतात असा त्याचा सिद्धांत आहे. या बाबतींत इस्तायली काय, ख्रिस्ती काय अगर इस्लामी धर्म झाला तरी काय, हे सर्व धर्म झोरोष्टर धर्माचीच री ओढणारे आहेत. अर्थात् त्यानाहि झोरोष्टर धर्माप्रमाणेंच पुनर्जन्म मान्य नाहीं. वैदिक धर्माची गोष्ट याहून सर्वस्वी निराळी आहे. कर्माप्रमाणें त्याला जन्मामागून जन्म घ्यावे लागतात. अर्थात् 'पुनरपि जनन पुनरपि मरण 'चें भवचक्र-कर्मचक्र-आत्मज्ञान-पूर्णज्ञान-होईतोपर्यंत त्यास चुकत नाहीं असा त्याचा निर्वाळा असून बौद्ध व जैन धर्म झाले तरी त्याच्याच पावलावर पाऊल टाकणारे आहेत.

येथें सांगण्यासारखी आणखी एक विशिष्ट गोष्ट म्हणजे वैदिकधर्माप्रमाणेंच झोरोष्टर धर्म हाहि जीवात्मा हा अमर आहे असें मानणारा आहे. मरण म्हणजे देहनाश, सर्वनाश नव्हे. मरणोत्तर शरीर उरतें, पण तेथें राहणारा जीव हा कांहीं मरत नाहीं. फक्त मरणानें त्याची व देहाची ताटातूट होते. पण जीवमात्र पुढें कायम राहतो. मात्र इतकें कीं, त्याला इहलोकातील कर्माप्रमाणें मरणोत्तर स्वर्ग अगर नरक यांपैकीं कोणता तरी एक लोक प्राप्त होऊन तेथें तो दीर्घकालपर्यंत-म्हणजे पुनरुत्थानापर्यंत वास्तव्य करून राहतो. असा त्याचा सिद्धांत आहे.

हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे देहपातानंतर देखील त्याला सुखदुःखाचे सुष्ट अगर दुष्ट अनुभव घ्यावे लागतात. आणि हे अनुभव

इहलोकीं केलेल्या पुण्यपापकर्मावर — सत्कर्मदुष्कर्मावर — सद्विचारदुर्विचारा–वर — सत्यज्ञान व दुष्टज्ञान यावर — अवलंबून असतात, अशी त्याची विचारसरणी आहे हेंच वैदिक मार्गेन उलगडून सांगावयाचें म्हणजे 'यथाचारी यथाकारी तथा भवति, साधुकारी साधुर्भवति, पापकारी पापो भवति, पुण्य पुण्येन कर्मणा, भवति पाप पापेन' हें याज्ञवल्क्य गुरु–देवाचें शतपथातील मननीय वचन पुढें करता येईल ततोतंत हीच विचारसरणी झोरोस्टर धर्मातहि अक्षरश अग्निकारण्यात आली आहे म्हणून अवेस्ता ग्रंथ बोलला कीं, येथील चंचल व क्षणभंगुर जीवन, शरी–राचें अटळ पतन व कर्माची मगरमिठी या सर्व गोष्टी सदैव डोळ्यापुढें ठेवूनच मनुष्यानें त्याप्रमाणें वर्तन करावें म्हणजे त्याची भावी आपत्ति टळेल व मरणोत्तर तो शाश्वत सुखानंदात राहील

## कर्म — मीमांसा

या कर्माचा प्रभाव एवढा प्रचंड नि एवढा प्रबल आहे कीं, तो कोणाला चुकवीन म्हणजे चुकविता येत नाहीं त्या कर्माचें फल भोगूनच त्यातून सुटका करून घेतली पाहिजे तें कोणालाहि केव्हाहि टाळता येत नाहीं आणि तो फलभोग फक्त जीवात्म्याला भोगावयाचा असतो मरणो–त्तर देह हा कर्माच्या भावी कचाट्यातून नेमका निसटतो पण जीव मात्र त्याच्या तडाख्यात सापडून गोंधळतो व धडपडतो कर्माची मगरमिठी देहाला सोडून जीवाच्या बोकांडी बसते अर्थात् जिवंतपणीं केलेल्या कर्माचीं बरींवाईट फलें त्यालाच अवश्य भोगावीं लागतात तीं टाकीन म्हणता टळण्यासारखीं नाहींत तो कर्मफलभोग भोगूनच त्यातून सुटका करून घेतली पाहिजे त्याशिवाय गत्यंतरच नाहीं हा कर्मसिद्धांत अबाधित व अटळ आहे तो झोरोस्टर धर्मालाहि पूर्ण मान्य आहे

झोरोष्टर धर्माचें सांगणेंहि वरील वैदिक धर्माप्रमाणेंच आहे. तो स्वच्छ व स्पष्ट सांगतो कीं, कर्माची गति ही अटळ आहे. ती कोणाला चुकविता येत नाहीं. देह काय, तो आपल्या क्षणिक व चंचल सुखा–साठीं–तात्पुरत्या इंद्रियतर्पणासाठीं – जीवात्म्याला भुरळ पाडून त्याला अनीतीकडे – पापाकडे – दुराचरणाकडे –ओढीत असतो. आणि जीवात्मा त्यांच्या नादी लागून, पथ्यकर धार्मिक शिकवणीला बगल देऊन, इंद्रिय सुखासाठीं वाटेल ते करण्यास व वाटेल तसें नाचावयास प्रवृत्त होतो. पण पुढें बेटा देह हा कालवश होऊन येथल्या येथें पडून जातो. पण त्याच्या प्रीत्यर्थ केलेलें कर्म कांहीं त्याच्या बरोबरच नाश पावत नाहीं. देहपाता–नंतर तें जीवात्म्याच्या मोकांटी बसतें व त्याला चिकटून राहतें. आणि त्याचें बक्षीस अगर प्रायश्चित्त हें पुढें त्या जीवात्म्यास भोगावें लागतें.

असा प्रसंग जीवात्म्यावर ओढवूंनये म्हणून दयाळू अहुर मझ्दनें कृपाळू होऊन मनुष्यास विवेक बुद्धि तारतम्य बुद्धि दिली असून, तिची मदत घेऊन जो तिच्या सल्ल्यानें वागतो तो दुःखदुःखाची दरी ओलांडून सुखाच्या अक्षय साम्राज्यांत पदार्पण करतो. व जो त्या विवेक देवतेला झिडकारून – डावलून – सुखलोलुप देहेंद्रियाच्या मसलतींत शिरतो, तो चिनवत पुलावरून चालून जाताना मधेंच तोल सुटून पटकन् खाली पसरलेल्या दुःखाच्या खोल दरींत पडून गडप होतो जो त्या पुलावरून सुरक्षित चालून पार होईल, तो उदंड सुखी झाला. अशी ही झोरोष्टर धर्माची एकंदर तात्पर्यकथा आहे.

कर्म हें मरणाबरोबच नष्ट होत नाहीं: तर मरणोत्तर तें जीवात्म्याच्या मानगुटीवर बसून त्याला आपला प्रभाव दाखविण्यास चुकत नाहीं. बिचारा जीव येथें असहाय आहे. पृथ्वीवरील त्यानें जीवन शस्त असलें तरी

मरणोत्तर तें दीर्घ — फार दीर्घ — असतें व त्या जीवनातच ऐहिक जीवना—तील पुण्य व पापकर्मांची सुष्ट अगर दुष्ट फळें — स्वर्ग अगर नरक भाग—ण्याचें त्याच्या नशिबी येतें म्हणून मनुष्यानें जागृत राहून भावी दुख टाळण्यासाठी व शाश्वत सुख मिळविण्यासाठीं धर्मोक्त मार्गानें — सद्वर्तन व सुविचार यांच्या सहाय्यानें — ऐहिक जीवनयात्रा चालविण्याविषयीं तत्पर रहावें असें अवेस्ताधर्माचें स्पष्ट व निक्षून सांगणें आहे

त्या पथ्यकर उपदेशाचा जो आदर करील, तो तरला व जो अनादर करील तो बुडाला, ही खूणगाठ प्रत्येकानें आपल्या मनाशीं पक्की बांधून ठेविली पाहिजे यातच त्याचें अखंड कल्याण व उदंड हित आहे कारण जो धर्मोक्त मार्गानें वाटचाल करतो, तो इहपरलोकीं सुखी होतो व जो धर्मबाह्य — नीतिभ्रष्ट वर्तन करतो, तो इहपरलोकीं दु खी व कष्टी होतो तसें सांगावयाचें झालें तर मनुष्य हा स्वभावत च सुखप्रिय व सुखलोलुप प्राणी आहे तो सुखाला जसा भाळतो तसाच दु खाला बुजतो दु ख म्हणजे त्याला वावड्यातलें वावडें ! त्याला तो फार भितो व बुजतो पण खेदाची गोष्ट ही कीं दु खाचें मूळ हें दुर्वर्तनात व दुर्विचारात गर्भित आहे, हें तो ऐहिक जीवनात देहेंद्रिय सुखाच्या हव्यासाच्या भरीस पडून, अहंकारविमूढ होऊन नेमका विसरून जातो भ्रामक व चंचल सुखाच्या नादी लागून दुर्वर्तनाच्या जाळ्यात शिरतो आणि अखेर बापडा फसतो व पस्तावतो अशा दुर्घट व दुर्धर प्रसंग कोसळू नये म्हणून अवेस्ता माउ—लीनें मनुष्याला सद्वर्तनाचा व सद्विचाराचा पथ्यकर व मंगलप्रद धडा घालून दिला आहे जो तो गिरवील तो शहाणा होऊन शाश्वत सुखाचा उदंड धनी होऊन राहील व जो त्याला नाक मुरडून झिडकारून देईल तो दुःखी व कष्टी होऊन त्रिकाल नरकात तळमळत राहील या धर्मराजाच्या इषा—ऱ्याचा कोण सुज्ञ अव्हेर करील ! असो

## मरणोत्तर जीवात्म्याची वाटचाल

वरील कर्ममीमांसेचा धावता परामर्श घेतल्यावर आता मरणोत्तर जीवात्म्याची स्थितिगति काय कशी होते हें पहाणें ओघानेंच प्राप्त झालें. म्हणून त्याविषयीं दोन शब्द लिहिणे जरूर आहे. झोरोष्टर धर्माप्रमाणें मनुष्य मेला म्हणजे त्याचा जड देह – पंचभूतात्मक देह – तेवढाच नाश पावतो. तेथें वास करून असणारा जीव नाश पावत नाहीं. मग आता देह पडल्यावर जीवात्म्याची वाट कशी लागते, हें पाहणें प्राप्तच झालें. तसें पाहिलें तर झोरोष्टर धर्म हा नास्तिक धर्मात मोडत नाहीं. वैदिक धर्माप्रमाणेच त्याची कमी अधिक, मानानें ठेवण आहे. 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः' अशी शंका काढणारा तो नास्तिक धर्म नसून वैदिकाप्रमाणेंच मरणोत्तर जीवन मानणारा तो आस्तिक धर्म आहे.

अर्थात् मनुष्य मेल्यावर सर्वस्वी त्याचा नाश होत नसून त्याच्यातील चैतन्यांश – म्हणजे जीवांश – मागें शिल्लक राहतो व त्यालाच या जन्मातील कृतकर्माची बरीवाईट फळें भोगावीं लागतात. त्यासाठीं काहीं विशिष्ट स्थानाची योजना करण्यात आलेली असून तेथें जाऊन तीं फळें भोगावीं लागतात. पण देह पडल्यावर लगेच तो त्या स्थानाकडे जातो असा त्याचा अर्थ नव्हे. मरणोत्तर देहाची व त्याची ताटातूट झाल्यावर तो तत्क्षणीं परलोकमार्गास लागत नाहीं.

याचें कारण असें कीं, त्याची देहवासना अजून संपूर्ण नष्ट झालेली नसते. मेल्यावर पुढें तीन दिवसपर्यंत त्याची संपूर्णतया देहबंधातून सुटका होत नाहीं. ती आस्ते आस्ते गळत जाते. पुर्णपणें ताटातूट होण्यास तीन दिवस लागतात असें मज्दधर्माचें सांगणें आहे. आपला वैदिक धर्म अकरा दिवसाची अवधि सांगतो, पण दोन्ही धर्मांत मरणोत्तर काहीं

दिवस जीवात्मा या लोकीं राहून मयतस्थानीं घुटमळत असतो हें तत्त्व सार्‍खेंच मान्य आहे त्या मृतदेहाला बाहेर नेताना त्याचें शरीर जेथें जमीनीवर पडून होतें, तेथें तो घुटमळत असतो

पुढें चौथ्या दिवशीं ही स्थिति पालटते त्या दिवशी अगदीं पहा—टेस त्याच्या परलोक — यात्रेला प्रारभ होतो सर्व मृतात्म्यांना इहलोका—तील त्याच्या त्याच्या कर्मांप्रमाणें व्यवस्था लावण्याचा हा सधिकाल असून त्यासाठीं त्याना 'चिनवत' पुलाजवळ यावें लागतें व तो पूल ओलाडू नच पुढील मार्गक्रमण करावयाचा असतो कारण तो पुल मृत्युलोक व परलोक यास जोडणारा असून त्या पुलाखालींच खोल असें नरकाचें स्थान आहे

हा पूल पृथ्वीच्या मध्यभागीं असलेल्या 'आर्यन वएज' प्रदेशातील 'एल्बुर्झ' नावाच्या पर्वतावर असून, त्याची उची शभर माणसाइतकी म्हणजे जवळजवळ पाचसहाशे फूट आहे त्या पुलावरून पुढें जाण्यास एक अरुद असा अवघड रस्ता असून, त्याची रुदी जेमतम तुळईच्या रुदीइतकी असते हा फक्त पुण्यवताकरिता असून, पाप्याचा निराळाच असतो तो वस्तऱ्याच्या धारेइतका तीक्ष्ण व सूक्ष्म असून त्यावरून त्याना जावें लागतें. पुण्यवान जीव पुढें आला म्हणजे त्याला रुद रस्ता पुढें सारण्यात येतो व पापी जीव आला तर तीक्ष्ण धारेचा रस्ता समोर होतो ही व्यवस्था आपोआपच होते निराळी व्यवस्था करावी लागत नाहीं अशी ही या 'चिनवत' पुलाची योजना आहे

चौथा दिवस उजाडला म्हणजे प्रभातकालीं त्या जीवात्म्यास या मृत्युलोकाला कायमचा रामराम ठोकून पुढील परलोक यात्रेस निघावें लागतें आणि त्याप्रमाणें ठरलेल्या वेळीं तो निघतोहि पुढें तो वाटचाल

करीत करीत या 'चिनवत' पुलाजवळ येतो. येथें आल्यावर पुढें जाण्याच्या अगोदर त्याच्या इहलोकातील बऱ्यावाईट कृतकर्मांचा आढावा घेण्यात येतो. हें काम 'वोहुमनो' या दिव्य प्रतिनिधीकडे असून, त्याच्याजवळ प्रत्येक जीवाचे प्रत्येक दिवसाचें तीन वेळा करून ठेविलेले कर्मांचें टिप्पण असतें तें उघडून त्याच्या बऱ्यावाईट कृत्यांना एकदर हिशोब करण्यात येतो.

अर्थात् या दृष्टीने वोहुमनो हा वैदिकांचा जवळजवळ चित्रगुप्तच म्हटलें तरी चालेल याठिकाणीं त्या त्या जिवाच्या पापपुण्याचा हिशोब होऊन त्याला पुढें कोणता लोक द्यावयाचा याचा निर्णय होऊन त्याप्रमाणें हुकूम सुटतो. त्याच्या खात्यावर अखेर पुण्यकर्में जमेस असतील, त्यास स्वर्ग व पापकर्में असतील त्याला नरक असा न्यायनिर्णय होऊन मग पुढें पुलावरून जाण्यास परवानगी मिळते.

पाळत करीत असते. याविषयीं ऋग्वेदात मंत्र आढळतो तो असा :– ' यौ ते श्वानौ यम रक्षितारौ चतुरक्षौ पथिरक्षी नृचक्ष-सौ। ताभ्यामेनं परि देहि राजन् स्वस्ति चास्मा अनमीवच धेहि ॥' ( ऋ १०–१४–११ ) असो. ही मदत फक्त पुण्यवंत जीवात्म्यासाठींच असते. पाप्यांना हा फायदा मिळत नाहीं, असे अवेस्तात म्हटलें आहे (वेंदिदाद, १९, २८–२९).

पुण्यवान जीवात्मा कुत्र्याच्या मदतीनें पूल ओलांडून पलीकडे गेला म्हणजे मग वोहुमनो हा तेथें येऊन त्याचें जयजयकारनें स्वागत करतो. तेथून पुढें स्वर्गाची हद्द लागते. आणि पुढील प्रवास फार सुखाचा व मजेचा असतो तेथें त्रास अगर ताप अगर कसलीच गैरसोय होत नाहीं. तो दिव्य प्रतिनिधी वोहुमनो त्यास बरोबर घेऊन जाऊन अहुर-मज्दची भेट करवितो यावेळीं इतर त्याचे प्रतिनिधीहि तेथें असतात. त्याचीहि भेट होते. मज्दप्रभूच्या निवासस्थळीं जाऊन त्याचें प्रत्यक्ष दर्शन घडल्यावर मग काय विचारता जिकडे तिकडे आनंदच आनंद ! शांतीच शांती ! समाधानच समाधान !! येथें आल्यावर सर्व त्रिविध तापाचें उपशमन होऊन तो जीवात्मा आनंद सागरात पोहू लागतो. अर्थात् ही स्वर्गाची मिरासदारी फक्त पुण्यवंत जीवात्म्याचीच आहे. तेथें इतरांचें काम नाहीं.

## अहुरमज्दचा स्वर्ग

अवेस्ता ग्रंथात विश्वाचा अधिपति प्रभु अहुरमज्दचा स्वर्ग कसा आहे याचें येथें थोडक्यात दिग्दर्शन करतो हा अहुरमज्दचा स्वर्ग सर्वांग-सुंदर असून तेथें पहावें तिकडे दिव्य ऐश्वर्याचें मनोवेधक प्रचंड प्रदर्शनच थाटलेलें आहे. काय सांगावें तेथील ऐश्वर्य, सौंदर्य व सजावट ! तेथें

उदंड प्रकाश आहे! अक्षय आनंद आहे! तेथे परम शांति असून अखंड तृप्ति वास करीत आहे! तेथें सर्वत्र स्वच्छता, पवित्रता व परिमळ त्रिकाळ नांदत असून लखलखाट व चकचकाट यांनीं तो दिपून गेला आहे! सर्व सत्य नि मंगल ज्ञानाचें तें प्रत्यक्ष माहेरघरच म्हटलें तरी चालेल. पहावें तिकडे शांति, तृप्ति, समाधान याचें दिव्य साम्राज्य नटलेलें असून, तेथें दुःख नाहीं, शोक नाहीं, ताप नाहीं, क्लेश नाहीं, कष्ट नाहीं, रोग नाहीं, भय नाहीं, दारिद्र्य नाहीं, वियोग नाहीं, विनाश नाहीं !! तेथील प्रसन्न वातावरण पाहून मन पुलकें. अंतःकरण खुलतें व बुद्धि प्रसन्न होते !!! असें हें अहुरमज्दप्रभूचें दिव्य, भव्य, व रम्य स्थान आहे! हा स्वर्ग !!

या स्वर्गाबद्दल सांगावयाचें म्हणजे त्याचे एकंदर चार भाग असून, पहिल्यांत सद्विचार, दुसऱ्यांत सद्वर्तन, तिसऱ्यांत सद्भाषण व चवथ्यांत अखंड प्रकाश यांचें साम्राज्य पसरलेलें आहे. या चवथ्या भागांतच म्हणजे अखंड प्रकाशमय स्थानांतच सर्वश्रेष्ठ, सर्वज्ञानी व सर्वसमर्थ अहुरमज्द-प्रभूचें भव्य निवासस्थान असून, त्याला 'गरोन्मन' असें नांव आहे. अर्थात् तें सर्वांत उंच स्थान आहे. या स्वर्गाचें एकाच वाक्यांत वर्णन करावयाचें म्हणजे तेथें आनंद, सौंदर्य, ऐश्वर्य, प्रकाश व प्रसन्नता यांचें जणुं कांहीं प्रेक्षणीय प्रदर्शनच थाटलेलें आहे असा भास झाल्याशिवाय रहात नाहीं. येथें आलेल्या पुण्यात्म्याला शाश्वत सुख, अखंड तृप्ति व उदंड शांति यांचा परम लाभ होऊन, तो अनिर्वचनीय अशा परमानंदांत नागाप्रमाणें डोलत असतो. वैदिक धर्मांतील परमगति ती हीच! येथें जो आला तो शाश्वत सुखी झाला! त्याचें भाग्य उजळलें! तो धन्य व कृतकृत्य झाला !!! झोरोष्टर धर्मांतील ज्ञानी, पवित्र व पुण्यवंतांची ही अशी सुंदर व स्पृहणीय स्थिति-गति आहे.

## पाप्यांचे अधःपतन

यानतर चिनवत पुलाजवळ आल्यावर पापात्म्याची काय स्थिति होते हें पाहू या चिनवत पुलाजवळ आल्यावर मृत पापात्म्याच्या कृत-कर्मांचा एकदर साधकबाधक आढावा घेण्यात येऊन त्याला पापात्मा ठरविण्यात आल्यावर त्यास नरकाची शिक्षा ठोठावण्यांत येते ही शिक्षा त्यास जाहीर करण्यात आल्यावर त्या बिचाऱ्याचें अवसानच खचतें तो मोठा गळा काढून रडू लागतो ऊर बडवून घेऊं लागतो, ओरडू लागतो, आक्रोश करू लागतो, किंचाळू लागतो, हातपाय आपटू लागतो थै थै नाचू लागतो, दु खातिशयानें वेडा होऊन नाना तऱ्हा करू लागतो

नतर त्यास चिनवत पुलावरून पुढें जाण्यास सागण्यात येतें त्या पुलावरचा त्याचा रस्ता वस्तराच्या धारेसारखा तीक्ष्ण व सूक्ष्म असून त्यावरून तो चालू लागतो त्याला खालीं नरकात घेऊन जाण्यासाठीं अग्रमइन्यूचे दुष्ट व क्रूर राक्षस टपलेलेच असतात तो त्या पुलावरून चालू लागला म्हणजे ते दुष्ट राक्षस त्याच्यावर झडप घालून त्यास खालीं लोटून देतात किंवा त्याच्या भयकर ओरडण्याला व किंकाळ्याना घाबरून तोल सुटून धपकन् खालीं पडून त्या खोल खड्डयात तो गडप होतो! अर्थात् ज्याला नरक म्हणतात, तो हाच होय

## अग्रमइन्यूचा नरक

आता हा अग्रमइन्यूचा नरक झोरोष्टर धर्मात कसा रेखाटण्यात आला आहे, त्याचा थोडा कानोसा घेणें जरूर आहे त्याचें वर्णन आढ-ळतें तें असें - हा अवेस्तोक्त नरक पृथ्वीच्या पोटांत असून तो चिनवत पुलाच्या खालीं आहे तो अत्यत खोल असून अंधकारानें पूर्ण दाटून

गेला आहे. तो भयाण व भेसूर असून, तेथें थडी मी म्हणते तेथें सर्वत्र दुःखाचेंच साम्राज्य आहे तेथें विंचू, साप व इतर विषारी प्राणी याची गर्दी माजली असून, पापी लोकाचें रडणें, कण्हणें, कुथणें हे सदैव चाल लेलें असतें. तेथील पापी जीवाची तळमळ, हळहळ, तडफड नि धडपड सागून पुरवत नाहीं. तेथें द्रुज म्हणजे राक्षस, पिशाच, व इतर क्रूर प्राणी, त्याना सारखा छळमार करीत असतात. तेथील अन्न म्हणजे तरी काय ? नासकें कुजकें शिळें, विटलेलें, आंबलेलें, निंबासारखें कडवट व दुर्गंधयुक्त असें असतें तशातच त्यात रक्त, विष्ठा, पू, शोण, मास, घाण, माती, राख व विष याचें कडवट मिश्रण असून तें खाल्लें म्हणजे पोटात आगीचा डोंबच उठतो तेथें डोळयाला झोंप नाहीं, मनाला चैन नाहीं, जीवाला समाधान नाहीं सारखी हुरहुर नि भगभग नि तळमळ ! ! हा मोठा दुष्ट, क्रूर व चाडाळ अशा राक्षसाप्रणी अग्रमइन्यूचा नरक ! येथें पापी लोकाची चोळवण करता येतें ! असो

## पुनरुत्थान

झोरोष्टर धर्मांत सागण्यासारखी एक महत्वाची व समाधानाची गोष्ट म्हणजे तेथें सर्व जीवाना – पापी व पुण्यवानाना – पुनरुत्थानाचा सुयोग लाभतो पापी जीव हा सदैव नरकातच पिचत राहील, असा भाग नसून, त्याच्या शिक्षेलाहि – दुःख शोकालाहि – कांहीं मर्यादा आहे म्हणजे पुनरुत्थानाची वेळ येईपर्यंतच त्याला नरकवास भोगावा लागतो. ती सुटकेची वेळ आली म्हणजे – आणि ती पुढें मागे कव्हातरी येणारच – म्हणजे त्याच्या नरचर्याची कथा सपून त्याना उद्धाराचा उजाडता

तो प्रकार असा– जेव्हा पुनरुत्थानाचा योग येतो, तेव्हा प्रारभापासून आजपर्यंत मृत झालेले सर्व जीव – मग ते स्वर्गांत असोत वा

नवचान असोन – त्या सर्वांना पुनर्जन्म देणें हें पहिलें कार्य होऊन बसतें. अर्थात् पहिला पुरुष गयोमर्द त्यापासून शेवटचा जो जीव – म्हणजे सोशियोस – त्याच्यापर्यंत सर्वांना त्याच्या त्याच्या पूर्वदेहास पुन्हा उत्पन्न करणें हें पुनरुत्थानाचें पहिलें कार्य आहे. आणि हें अहुरमझ्दच्या आज्ञे– यत्न करण्यात येतें. यावेळीं सर्वांना – स्वर्गातील व नरकातील सर्व जीवांना पुन्हा मृत्युलोकीं यावें लागून प्रत्येकाला त्याचा पूर्वीचा पार्थिव देह प्राप्त होतो. म्हणजे पृथ्वीवर त्याचा आणखी एकदा पुनर्जन्म होतो

हे सर्व पुनर्जन्म लाभलेले लोक एकत्र करण्यात येऊन त्या सर्वांचा मिळूनच पुन्हा एकवार अखेरचा निर्णय करण्यात येतो हें काम खुद्द अहुरमझ्दकडेच असते. या अंतिम निर्णयाच्या वेळीं प्रत्येक जीव आपण मागें केलेली बरी वाईट कर्में आठवतो यावेळीं त्याचा चेहरा पांढरा फटफटीत होतो या नंतर अहुरमझ्द हा स्वतः त्या सर्वांच्या सत्कृत्यांचा व दुष्कृत्यांचा हिशोब घेऊन त्याच्या त्याच्या कृतकर्मानुसार अखेरचा निर्णय करतो. प्रत्येक मनुष्याच्या पूर्वीच्या निर्णयाची त्याला पूर्ण व अचूक जाणीव असतेच. त्याला धरूनच हा निर्णय असतो

आता हे सर्व जीव पार्थिव देह धारण करून पुन्हा पृथ्वीवर प्रकट होतात व आपापल्या आप्तइष्टांस व बंधुमित्रांस ओळखतात. बाप मुलाला, आई मुलीला, भाऊ बहिणीला, नवरा बायकोला, मित्र मित्राला याप्रमाणे एकमेक एकमेकांना पाहतात। ओळखतात. भेटीगाठी घेतात, व मर– णोत्तर परलोकातील आपला अनुभव – सुखदुःखाची कर्मकथा – एकमेकांना सांगतात. हें पुनरुत्थान पूर्वी मनुष्य जेथें मृत झालेला असतो. तेथेंच घडून येतें.

आता त्यान्यात जे पुण्यवान मरणोत्तर स्वर्गांत जाऊन सुखानंदांत नादत होते, ते आता आपल्या पार्थिव देहासह पुन्हा स्वर्गास जातात. व जे पापी होते, त्याना पुन्हा नरकलोकच प्राप्त होतो. तेथें आता ते तेथील दुःख सदेह अनुभवूं लागतात. याप्रमाणें तेथील दुःख, कष्ट व यातना तीन रात्र भोगण्याचें त्याच्या कपाळीं येतें. आता हे जे भोग आहेत ते जीवाचे नसून देहाचे असतात. यावेळी तो देह तप्त लोहरसाच्या लोंढ्यात सापडून व बुडून सारखा धडपडत व तळमळत असतो.

याप्रमाणें स्वर्गातील पुण्यात्मे व नरकातील पापात्मे तीन रात्र सदेह स्वर्गांत व नरकात राहून तेथील सुखदुःख अनुभवल्यावर पुन्हा ते या पृथ्वीवर येतात. त्यावेळीं पृथ्वीवर तप्त धातूंचा लाल व जळजळीत रस पसरलेला असून त्यातूनच त्या दोघानाहि चालून जावें लागतें. या तप्त-रसातून जात असताना त्याचें सगळें पाप जळून निशेष झडून जातें व ते शंभर नंबरी सोन्यासारखें परिशुद्ध व निर्मल होतात. आणि जे पुण्यात्मे असतात त्याना त्या तप्तरसाची बाधा होत नाहीं. त्यातून ते चालत जातात; त्याना कोमट दुधातून चालल्याचा भास होतो.

या प्रकार दिव्यातून पार पडल्यावर त्या पापात्म्यांचा शेवटचा व कायमचा उद्धार होतो. त्या तप्तरसाची शिक्षा अनुभविल्यावर त्याची सर्व पापातून व सर्व दोषातून कायमची मुक्तता होऊन दुःखाचे चटके व हाल अपेष्टाचे झटके पुन्हा भोगण्याचा प्रसग येत नाहीं. येथें त्याचें सर्व नश्चर्य लयाला जातें आणि तें जाता परिशुद्ध, निर्मल व निर्दोष होऊन पुण्यात्म्याप्रमाणेंच तेहि सुखानंदाचा लाभ घेण्यास लायक होतात. आता हें सर्व मानवकुल निर्दोष, निष्पाप, सच्छील व सद्गुणी होऊन अहुर-मज्दप्रभूच्या कृपाकटाक्षास पात्र होतें दुष्ट आता दुष्टच रहात नाहीं.

पापी हा पापी व चांडाळ हा चांडाळ न राहता सर्व जग सारखेंच पुण्यवान व पवित्र बनून राहतें !

यानंतरचा पुढचा क्रम आहे तो असा — मनुष्याचा जीवात्मा हा अमर असला तरी त्याचा स्थूल देह काहीं तसा नाहीं तो नाशवत आहे आता त्यालाहि नाशरहित करण्याकरता म्हणून 'सोहम ओ' हा 'हृदयोश' बैलाचा मेद व पांढरा शुभ्र सोमरस यांचें मिश्रण करून त्यांचें अमृत बनवून तें दिव्य रसायन त्यास प्यावयास देतो तें प्राशन केल्यावर तो पार्थिव देहहि जीवात्म्याप्रमाणेंच अमर होतो ! त्यानंतर असा चमत्कार होतो कीं, मरणसमयीं ते आता या अमृत प्राशनानें तरुण बनतात व जे अकालीं मृत्युमुखीं पडलेले असतात ते आता पंधरा सोळा वर्षांचे नवयुवक बनतात !

यानंतर ज्याच्या त्याच्या प्रियजनाचें पुनर्मीलन होतें नवराबायको एकमेकास भेटतात आईमुलें एकत्र येतात आप्तइष्टांची गाठ पडते. सर्वत्र आनंदीआनंद नांदू लागतो पण यानंतर स्वर्गांत दांपत्य व्यवहारानें नवीन संतति निर्माण होत नाहीं सर्व मानव जात आता सुखानंदात व शांति समाधानात हसत रमत राहतात अर्थात् जिकडे तिकडे आता आनंदाचे फवारे व सुखशांतीचे मधुर वारे वाहू लागतात तेथें स्वर्गांत म्हणजे मझ्द— प्रभूच्या निजधामात भूक नाहीं, तहान नाहीं, दु ख नाहीं, ताप नाहीं, रोग नाहीं, पीडा नाहीं, चिंता नाहीं, भय नाहीं, वियोग नाहीं व विनाश नाहीं असा आहे तो अहुरमझ्दचा दिव्य स्वर्ग ! सर्व जीवांचें शरीर आता अमर बनल्यामुळें त्याला तलवार, बाण, बर्ची, भाला इत्यादि शस्त्रास्त्रें बाध करू शकत नाहींत सर्वत्र आनंदच आनंद ! उल्हासच नि उत्साहच उत्साह !! ही अशी पुनरुत्थानानंतर सर्व जीवात्म्याची आनंद पर्यवसायी सुरम्य व सुखद स्थिति आहे !!!

असणारा भाग पाण्यानें धुऊन स्वच्छ करावयाचा. व कपड्यानी पुसून साफ करावयाचा हें झाल्यावर पूर्ववत गुंडाळावयाची म्हणजे हा पद्यान विधि पूर्ण झाला.
कमरेंतील कुस्ती सोडून तोंडानें काहीं मंत्र पुटपुटून ती झाडून पुनः कमरेंत

हा विधि दिवसातून निदान चार वेळातरी करावयाचा असतो. ते प्रसंग हे— (१) सकाळीं निजून उठल्यावर (२) मूत्रोत्सर्ग केल्यावर (३) जेवावयाच्या अगोदर व (४) प्रार्थनेच्या प्रारंभीं. याप्रमाणें त्या त्या प्रसंगीं हा विधि करावयाचा असून, तो सर्वांना सहज करता येण्यासारखा आहे. वरील चारही प्रसंगीं शुचिर्भूतपणा पाळणें आम्हा हिंदूतहि रोजची वहिवाट आहे हें वाचकाना निराळें सागावयास नको.

## नहान

नहान :— नहान म्हणजे स्नान. हाही देह शुद्धीचा एक धार्मिक प्रकार आहे. पद्याबा — पेक्षा हा जरा उच्च दर्जाचा विधि आहे. तो काहीं विशिष्ट प्रसंगींच करावयाचा असतो. आणि त्याला पुरोहित लागतो. या संस्काराचे चार भाग असून पहिला भाग म्हणजे पद्याब हा होय. याचा विधि वर सागण्यात आलाच आहे. तो करून झाल्यावर डाळिंबाचीं चार दोन पानें तोंडात धरून दातानें चावून चुरडावयाचीं. आणि नग मंतरलेलें गोमूत्र (बैलाचें मूत्र) प्राशन करावयाचें. हा दुसरा भाग झाल्यावर तिसरा भाग म्हणजे 'पतेत' मंत्राचें पठण करणें व अखेरचा चौथा भाग म्हणजे स्नान करणें असा हा नहानाचा शुद्धिसंस्कार आहे

याचा विधि असा :— प्रथम पद्याब करून शुचिर्भूत झाल्यावर यजमान 'बाज' नावाचा मंत्र म्हणून पुरोहितानें दिलेलीं डाळिंबाचीं पानें तोंडात धरून चुरडतो नतर कुस्तीचा विधि उरकून घेतल्यावर

तोंनीं 'पतेत' मंत्र म्हणून स्नानास दारीगरात जातो तेथें गेल्यावर मझ्दप्रभूनें मंत्रास्त्र स्मरण करून अंगातील कपडे काढतो व उजवा हात डोक्यावर ठेवून धरून 'स्त्र ओश वाज'चा काहीं भाग म्हणतो. नंतर पुरोहित त्याला बाहेरून एका लांब पळींतून गामूत्र (बैलाचें मूत) देतो ते त्या गोमूत्रानें अंगाला तीन वेळां चोळल्यावर नंतर थोडी वाळू दण्यात येते त्या वाळून पुन्हा तीन वेळा अंगाला चोळून झाल्यावर नंतर मंत्र म्हणून परिशुद्ध केलेलें पाणी दिलें जाते त्या पाण्यानें तीन वेळा अंग चोळून झाल्यावर मग शुद्धोदकानें स्नान करून अंगात स्वच्छ कपडे घालून राहिल 'स्त्र ओश वाज'चा मंत्रभाग म्हणून शेवटीं कुस्ती विधिपूर्वक कमरला गुंडाळतो. येथें नहानाचा विधि संपूर्ण झाला

**बरेश्नुम संस्कार** — बरेश्नुम हा संस्कार तिसरा असून तो पावित्रतेच्या दृष्टीनें ममत्वाचा आणि उच्च प्रतीचा म्हणविता त्याचें वैशिष्ट्य उपरोक्त दोन संस्काराहून काहीं निराळेंच आहे पहिला पद्याब संस्कार फारच थोड्या वेळात उरकला जातो दुसरा नहान याला जवळ जवळ तास–दीड तास लागत असून त्याला पुरोहिताची गरज आहे तिसरा बरेश्नुम यास नऊ दिवस लागतात पद्याबला पुरोहिताची गरज नाहीं नहानाला एक पुरोहित लागतो व या तिसऱ्या बरेश्नुमला दोन पुरोहित लागतात. पहिले दोन संस्कार घरीं अगर अग्निमंदिरात करण्यात येतात पण हा तिसरा घरात किंवा अग्निमंदिरात न करता तो अगदीं उघड्या जागेवर केला जातो या जागेला 'बरेश्नुमगाह' असें म्हणतात

या संस्काराचा मूळ हेतु वेंदिदाद प्रमाणें असा कीं जो कोणी अमंगल अगर अपवित्र अशा गलिच्छ वस्तूला स्पर्श करील तो अस्पृश्य समजला जाऊन, त्याला या संस्कारानें शुद्ध व स्पृश्य करून घेण्यात येतें

प्रेत हें सर्वांत अमंगल व अपवित्र असें त्या शास्त्रानें मानण्यात येत असल्यामुळें जो त्याला स्पर्श करील, तो अस्पृश्य गणला जाऊन त्याचें या संस्कारानें शुद्धीकरण करून घेण्यांत येत असे. अर्थात् हा नियम प्रेतवाहकांना लागू असे.

प्रथम प्रथम याचा उद्देश शुद्धीकरण एवढाच होता. पुढें त्याचा विकास होऊन प्रेतवाहकांपुरताच मर्यादित न राहता, जे त्यांना शुद्ध करून घेत असत अशा पुरोहितानाहि तो लागू करण्यांत आला. कारण हा संस्कार शारीरिक व मानसिक शुद्धीकरणाला अवश्यच आहे असें मानण्यात येऊं लागल्यामुळे तो शुद्धीचें प्रतीक समजून शुद्धीसंस्कार करणाऱ्या पुरोहितासहि लागूं करण्यांत आला.

हल्लीं अग्निमंदिरात जे पुरोहिताचें उच्च दर्जाचें काम करूं इच्छितात, त्यासाठीं हा संस्कार अगदीं आवश्यक म्हणून हल्लीं गणला जात आहे. हा संस्कार ज्यास झाला त्याला 'बरेश्नुमवाला' असें म्हणतात व तोच उच्च दर्जाचीं धार्मिक कृत्यें — म्हणजे बाज, यस्न, विस्परद व वेंदिदाद हीं कृत्यें फक्त अग्निमंदिरातच केलीं जातात — तीं करण्यास योग्य व लायक समजला जातो. इतरास हीं कृत्यें करण्याचा अधिकार नाहीं त्याला बरेश्नुमवालाच लागतो. पण इतर जीं सामान्य धर्मकृत्यें — म्हणजे नवजोत, विवाह, आफ्रिगान इत्यादि — करण्यास इतर पुरोहितांस अधिकार आहे. हल्लीं जे प्रेतवाहनाचा धंदा करतात त्यांना धंद्याच्या पूर्वी व धंदा सोडल्यानंतर हा संस्कार अवश्य म्हणून सांगितला आहे. हा संस्कार एकंदर दहा दिवसाचा असून त्याला दोन पुरोहितांची गरज आहे. याचा विधि गुंतागुंतीचा व किचकट असल्यामुळें त्याचा तपशील देण्याचें टाळतो. असा या बरेश्नुम संस्काराची एकंदर सर्व साधारण हकीकत आहे.

## मि-शोई संस्कार

हा ' सि-शोई ' संस्कार प्रेताला ज्यांनी स्पर्श केला असेल त्यांच्या साठीं म्हणून आहे यात तीस वेळा पाण्यानें धुऊन, अगशुद्धि करावी लागत याला दोन मागसें लागतात पैकीं त्यात एक पुरोहित असतो. यातील शुद्धीकरणाचीं द्रव्यें व स्नानाचें विधान बहुतेक महान संस्कारा-प्रमाणेंच असतें असे हे झारोष्ट्र धर्मातील देहशुद्धीचे चार प्रकारचे मुख्य संस्कार आहेत

## कालनाम विशेष

झोरोष्ट्रधर्मांत उपासनेसाठीं म्हणून दिवस व रात्र मिळून २४ तासाचा एक दिवस धरला असून, त्याचे एकंदर पाच भाग कल्पिले आहेत प्रत्येक भागात निरनिराळ्या यझताना उद्देशून अग्निमध्यें हवन करावयाचें असतें त्या भागाला ' गाह ' हें नाव असून, त्याचा काल व उपास्यदेवता पुढीलप्रमाणें आहेत

### गाह-नाम

| नाव | काल | देवता |
|---|---|---|
| १ गाह- | हवनकाल-सूर्योदयापासून मध्याह्नापर्यंत | मिथ्रयझताला उद्देशून हवन |
| २ गाह- | रपिथ्विन-मध्याह्न ते अपराह्ण | अशवहिस्त व अग्नि यांच्या प्रीत्यर्थ हवन |
| ३ गाह- | उझयेरिन-अपराह्ण ते नक्षत्रोदय | अपानपात् प्रीत्यर्थ हवन |

| | | |
|---|---|---|
| ४ गाह– | ऐविस्रूथ्रेम–नक्षत्रोदयापासून मध्यरात्रीपर्यंत | रश्नु रजिस्ता प्रीत्यर्थ इयन |
| ५ गाह– | उशहिन–मध्यरात्रीपासून सूर्योदयापर्यंत | |

## सिरोझ

( दिवस – नाव )

| | | | |
|---|---|---|---|
| १) ओरमझ्द | २) बहमन | ३) आर्दिबेहेस्त | ४) शाहरीवर |
| ५) सर्पेदार्मद | ६) खोर्दाद | ७) अमरदाद | ८) दइप आदर |
| ९) आदर | १०) आवान | ११) खोरशीद | १२) माह |
| १३) तीर | १४) गोश | १५) दइपमिहिर | १६) मिहिर |
| १७) स्रोश | १८) रश्न | १९) फर्वर्दीन | २०) बहराम |
| २१) राम | २२) गोवाद | २३) दइपदिन | २४) दिन |
| २५) अर्द | २६) आस्ताद | २७) आस्मान | २८) झाम्याद |
| २९) मह्रेस्पंद | ३०) अनीरान | | |

## जस्ने

सणाची – नावें

| सणाचें नाव | महिन्यातील दिवस |
| --- | --- |
| १ जश्ने फर्वार्दिन – | फर्वर्दिन मासाच्या १९ व्या दिवशीं |
| २ जश्नें अर्दबेहिस्तगान – | अर्दबेहिस्त मासाच्या तिसऱ्या दिवशीं |
| ३ जश्ने खोर्दाद गान – | खोर्दाद मासाच्या सहाव्या दिवशीं. |
| ४ जश्ने तिर्गान – | तिरमासाच्या तेराव्या दिवशीं |
| ५ जश्ने अमरदादगान – | अमरदाद महिन्याच्या सातव्या दिवशीं |
| ६ जश्ने शेरिवारगान – | शेरिवार मासाच्या चौथ्या दिवशीं |
| ७ जश्ने मेहेरगान – | मेहेर मासाच्या सोळाव्या दिवशीं |
| ८ जश्ने आवागान – | आवा मासाच्या दहाव्या दिवशीं |
| ९ जश्ने आदरगान – | आदर मासाच्या नवव्या दिवशीं |
| १० जश्ने दएगान – | दए मासाच्या पहिल्या, आठव्या, पधराव्या व तेवीसाव्या दिवशीं. |
| ११ जश्ने बहमगान – | बहमन मासाच्या दुसऱ्या दिवशीं |
| १२ जश्ने स्पदार्मदगान – | अस्पेंदामर्द मासाच्या पाचव्या दिवशीं. |

## गहंबार

(उत्सव दिन)

१ मइध्योझरेम – हा उत्सव अर्दबेहेस्त मासाच्या अकराव्या दिवसा पासून पधराव्या दिवसापर्यंत चालतो

२ मइध्योइयम – हा उत्सव तिर महिन्याच्या अकराव्या दिवसा– पासून पधराव्या दिवसापर्यंत चालतो

३ पइतिशहेम् — हा उत्सव शेहरिवर महिन्याच्या सव्वीसाव्या दिवसापासून तिसाव्या दिवसापर्यंत चालतो.

४ अयाथ्रेम — हा उत्सव अव्हान महिन्याच्या सव्वीसाव्या दिवसापासून तिसाव्या दिवसापर्यंत चालतो.

५ मद्दिध्याइर्य — हा उत्सव दए मासाच्या सोळाव्या दिवसापासून विसाव्या दिवसापर्यंत चालतो.

६ हमस्पथमएदय — हा उत्सव अस्पेंदामर्द महिन्याच्या शेवटच्या पाच दिवसापर्यंत चालतो.

याप्रमाणे पारसिक धाधवाची कालगणना, सण व उत्सव याची उडती माहिती दिली आहे.

अशी ही झोरोष्टर धर्माची थोडक्यात मूळ उभारणी असून, ती आम्ही येथे यथामति निवेदन करण्याचा प्रयत्न केला आहे ती विचक्षण वाचकवर्गांनी गोड मानून घ्यावी अशी विज्ञप्ति करून महर्षि झोरोष्टर ग्रथाची परिसमाप्ति करतो

